विश्वनाथ काशिनाथ राजवाडे-कृत

# ज्ञानेश्वरीची प्रस्तावना

आणि

# ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे व्याकरण

संपादक

डॉ. शं. गो. तुळपुळे



विश्वनाथ काशिनाथ राजवाडे कृत

# ज्ञानेश्वरीची प्रस्तावना
# आणि
# ज्ञानेश्वरीतील
# मराठी भाषेचे व्याकरण

संपादक

डॉ. शं. गो. तुळपुळे




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

प्रथम आवृत्ती : १९७९
व्दितीय आवृत्ती : २००२

प्रकाशक :
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत, तिसरा मजला,
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग,
दादर, मुंबई - ४०० ०१४.



मुद्रक :
व्यवस्थापक,
शासकीय फोटोझिंको मुद्रणालय व ग्रंथागार,
५, फोटोझिंको पथ, पुणे-४११ ००१.

किंमत :रू. ९०/-

# SYNOPSIS

V. K. Rājavāḍe published his text of the Jñāneśvarī in 1909 as based on a manuscript which he found at Bīḍa and which he claimed as written almost immediately after the passing away of Jñānadeva in 1296. It was thus from his point of view an invaluable document on which to base a study of Old Marāṭhī. Accordingly, he wrote a long Introduction to his edition of the Jñāneśvarī taking a survey of the history of the Marāṭhī language on the basis of the source-material consisting of inscriptional and other records. Though the Vārakarī cult which regards the Jñāneśvarī as its book of religion did not give its recognition to Rājavāḍe's edition of the same, the world of scholars did appreciate his work which gave an impetus to the linguistic study of this monumental work in Marāṭhī: For along with his edition of the Jñāneśvarī Rājavāḍe also published his "Grammar of the Marāṭhī language of the Jñāneśvarī" (1909) which could claim to be the first Historical Grammar of Marāṭhī. Together these two works, namely Rājavāḍe's Introduction to the Jñāneśvarī and his Grammar of the language of the Jñāneśvarī, have proved to be the starting point for any serious study of the Marāṭhī language particularly from the historical point of view. Granting the shortcomings in his work which were due mainly to his rather obstinate nature, it must be said that it is a landmark in the history of linguistic studies not only in Mahārāṣṭra but in India.

The Government of Mahārāṣṭra brought out a revised reprint of Rājavāḍe's edition of the Jñāneśvarī in 1960 but unfortunately without his Introduction being included in it. His Grammar of the Marāṭhī language of the Jñāneśvarī was also out of print for the past several years. It is with the intention, therefore, to make available these two valuable works of Rājavāḍe to the scholars of the Marāṭhī language that the present edition of the same is being published. While doing so care has been taken to provide Rājavāḍe's writings with necessary foot-notes, indices and other aids of study in which they miserably lack. An Introduction bringing out the salient features of Rājavāḍe's present works is prefixed.

# संपादकीय निवेदन

इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांची ' ज्ञानेश्वरी ' व ' ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचे व्याकरण ' हे दोन ग्रंथ इ. स. १९०९ मध्ये प्रसिद्ध झाले. त्यानंतर इ. स. १९६० साली महाराष्ट्र राज्यशासनाने त्यांच्या ' ज्ञानेश्वरी 'चे पुनर्मुद्रण केले; पण ते करताना त्यांनी लिहिलेली विस्तृत प्रस्तावना वगळली. वरील दोन्ही प्रकरणे, म्हणजे प्रस्तावना व व्याकरण, मराठी भाषेच्या ऐतिहासिक अभ्यासाला बहुमोल असून ती दुर्मिळ झाल्याने त्यांची एक संपादित आवृत्ती काढावी या हेतूने प्रस्तुत ग्रंथ प्रसिद्ध होत आहे. राजवाडयांच्या मूळ प्रबंधांना तळटीपा, विषयसूची किंवा शब्दसूची यांची जोड नाही. ती येथे देऊन त्यांचे प्रबंध अधिक उपयुक्त करण्याचा प्रयत्न केला आहे. तसेच त्यांच्या प्रस्तावनेची व व्याकरणाची वैशिष्ट्ये सांगणारा एक विवेचक प्रस्तावही या जोडग्रंथास जोडला आहे. या कामीं ' साहित्य-संस्कृती मंडळा 'ने पुढाकार घेऊन हा ग्रंथ स्वतःचे प्रकाशन म्हणून प्रसिद्ध केला यासाठी मी ' मंडळा 'चा आभारी आहे.

पुणें
ता. ६ जून १९७८ } शं. गो. तुळपुळे

# अनुक्रमणिका

## संपादकीय प्रस्तावना ( पृ. १ ते ४० )

# निवेदन

मराठी भाषा व साहित्य यांचा सर्वांगीण विकास करून त्यांना समृद्ध करणे व साहित्य, इतिहास व कला या क्षेत्रांतील महाराष्ट्राचा थोर वारसा जतन करणे हे महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे उद्दिष्ट आहे. ज्यांच्या साहित्य कृतीमुळे मराठी इतिहास, संस्कृती व वाङ्मय यामध्ये फार मोठी मोलाची भर पडली आहे, अशा प्रख्यात साहित्यिकांची एकोणिसाव्या शतकातील व विसाव्या शतकातील पहिल्या जागतिक युद्धाच्या काळापर्यंतची मराठी साहित्यात झालेली उच्च वाङ्मयीन साहित्यिक व सांस्कृतिक मूल्ये असलेली पुस्तके व त्या वेळेचे साहित्यिक या विषयीचे ज्ञान मराठी वाचकांस उपलब्ध व्हावे म्हणून त्यांचे साहित्य प्रकाशित करावयाचे धोरण महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने ठरविले आहे. अशा तऱ्हेचे साहित्य मंडळ एकतर स्वतः प्रकाशित करते अथवा खाजगी प्रकाशक व साहित्य संस्था यांनी प्रकाशित करावयाचे ठरविले तर मंडळ त्यांना अनुदान देण्याचा विचार करते.

२. मराठी साहित्यिक तसेच साहित्य यांची शैली कालपरत्वे बदलत व विकसित होत गेली आहे. कविता, कथा, लघुकथा यांचा आशय व आकृतिबंध कालाप्रमाणे बदलत गेला आहे. वर्णनात्मक बदल फार मोठया प्रमाणात दिसून येतात. वैचारिक निबंध व प्रबंध यांच्यातील ध्येयवाद व तत्त्वप्रतिपादन यांमध्ये नवीन भर पडली आहे. तसेच जीवनमूल्ये व सामाजिक परिस्थितीतील बदलही प्रकर्षाने जाणवत आहेत. निरनिराळया काळातील साहित्यिकांचा त्या त्यावेळच्या परिस्थित्यनुरूप आपल्या साहित्यावर ठसा उमटलेला दिसून येतो.

३. मंडळाने हा हेतू साध्य करण्यासाठी विष्णुशास्त्री चिपळूणकरांची निबंधमाला नागपूर विद्यापीठाचे माजी कुलगुरू व मंडळाचे माजी सदस्य, डॉ. वि. भि. कोलते यांजकडे संपादनासाठी सोपविली आहे. लोकमान्य टिळकांच्या केसरीतील निवडक लेखांचा संग्रह इंग्रजी व मराठीत संपादन करण्याचे आणि कै. गोपाळ गणेश आगरकरांचे केसरीतील व सुधारकातील निवडक व दुर्मिळ लेखांचे संपादनाचे काम मंडळातर्फे चालू आहे. लोकहितवादी गोपाळराव हरी देशमुख यांच्या समग्र वाङ्मयाचे संपादन झाले आहे. कै. राजारामशास्त्री भागवत यांचे विविधज्ञान विस्तार सुबोध पत्रिका, हिंदुधर्मविवेचक, दिनबंधू, इत्यादी नियतकालिकांत प्रसिद्ध झालेले व आज सहजपणे उपलब्ध नसलेले व महत्त्वपूर्ण निबंधाचे संपादन कार्य मंडळातर्फे चालू आहे. सिस्टर जेराल्डिन यांनी संकलित केलेला " Letters & Correspondence of Pandita Ramabai " हा १८८३ ते १९१७ या काळातील आंतरराष्ट्रीय महत्त्वाचा पत्र-

व्यवहार मंडळाने इंग्रजी भाषेत प्रकाशित केला असून त्याच्या मराठी अनुवादाचे काम प्रा. सौ. सरोजिनी वैद्य यांजकडे सोपविले आहे. डॉ. के. सी. कन्हाडकर यांनी संपादिलेला " बाबा पदमनजी काल व कर्तृत्व " हा ग्रंथ प्रकाशित केला आहे.

मंडळाच्या या योजनेत आजवर " महात्मा फुले समग्र वाङ्मय " , " धर्मरहस्य, " या ग्रंथांच्या द्वितीयावृत्ती प्रसिद्ध झाल्या आहेत. " महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग " , " सेनापती बापट समग्र वाङ्मय, " कै. आचार्य धर्मानंद कोसंबी लिखित " जातककथा भाग " १, २ व ३ या ग्रंथांचे प्रकाशनही झाले आहे. तसेच कै. आचार्य धर्मानंद कोसंबी लिखित " बुद्धलीला सारसंग्रह " , " बुद्ध धर्म आणि संघ, बुद्ध संघाचा परिचय, समाधीमार्ग " इत्यादी ग्रंथांच्या पुनर्मुद्रित आवृत्त्या लवकरच प्रकाशित होत आहेत.

वरील योजनेत प्रस्तुत पुस्तक आम्ही समाविष्ट केले आहे. इतिहाससंशोधक कै. वि. का. राजवाडे यांनी मराठी भाषेचे ऐतिहासिक व्याकरण तयार व्हावे, या उद्देशाने " ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे व्याकरण " हा निबंध लिहिला. त्याचप्रमाणे मराठी भाषेचा इतिहास उपलब्ध व्हावा म्हणून बीड-पाटांगण येथे सापडलेल्या ज्ञानेश्वरीचे मुद्रण-प्रकाशन केले व त्यात निबंधवजा विस्तृत " प्रस्तावना " लिहून त्यात मराठी भाषेचा ऐतिहासिक मागोवा घेतला. हे दोन्ही निबंध आता पुस्तकांच्या बाजारात मिळत नाहीत. ते दोन्ही निबंध पुनः जिज्ञासू वाचकांच्या हाती पडावे म्हणून डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी सविस्तर समीक्षात्मक प्रस्तावना लिहून महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाच्या स्वाधीन केले.

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळाच्या अनेक प्रकल्पांमध्ये मराठीचे पायाशुद्ध अध्ययन व्हावे म्हणून मराठी शब्दकोश, मराठी वाङ्मयकोश व मराठी विश्वकोश हे अत्यंत महत्त्वाचे कोश समाविष्ट केले आहेत. भाषेच्या शास्त्रशुद्ध अध्ययनाचा व्याकरण हा पाया आहे. हा पाया मजबूत होण्यास हे पुस्तक सहायभूत होईल यात शंका नाही. डॉ. तुळपुळे हे प्राचीन मराठीचे नामवंत पंडित आहेत. त्यांनी राजवाडेप्रणीत या दोन निबंधांना उत्कृष्ट प्रस्तावना लिहिली व आवश्यक तेथे संक्षिप्त वा विस्तृत टीपा दिल्या. याबद्दल आम्ही त्यांचे महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाच्या वतीने मनःपूर्वक आभार मानतो.

वाई<br>दिनांक ३१ जुलै, १९७९.<br>९ श्रावण शके १९०१

लक्ष्मणशास्त्री जोशी<br>अध्यक्ष,<br>महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ.

वि. का. राजवाडे-कृत

# ज्ञानेश्वरी–प्रस्तावना ( पृष्ठ ४३ ते ११८ )

* * *

१. येथून पुढील चार क्रमांक मुळात चुकीचे पडले होते.

# ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे व्याकरण[1]



---

१. मूळ प्रतीत अनुक्रमणिका नाही. ती येथे नव्याने दिली आहे. तसेच, मूळ प्रतींतील परिच्छेदांचे क्रमांक अव्यवस्थित असल्याने ते येथे बदलून सरळ केले आहेत.

## सप्तमाह्निक १९२-२०९.

## क्रियाविभक्तिप्रत्ययेतिहास



## अष्टमाह्निक २१०-२३९.

* * *

# ज्ञानेश्वरीची प्रस्तावना

आणि

# ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे व्याकरण

# संपादकीय प्रस्तावना

## राजवाडे-ज्ञानेश्वरी

इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनी त्यांना मराठवाड्यात बीड-पाटोगण येथे मिळालेली ज्ञानेश्वरीची पोथी तिला एक विस्तृत प्रस्तावना लिहून इ. स. १९०९ ( शके १८३१ ) मध्ये प्रसिद्ध केली. त्याबरोबरच ' ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचें व्याकरण ' हा आपला प्रबंधही त्यांनी त्याच वर्षी प्रसिद्ध केला. राजवाड्यांनी ही ज्ञानेश्वरीची 'प्रस्तावना' व तिचें 'व्याकरण' त्यांच्या बुद्धिमत्तेची व व्यासंगाची साक्ष देत असून मराठी भाषेच्या ऐतिहासिक अभ्यासाला त्यांचे वरील दोन्ही प्रबंध अमोल ठरले आहेत. ते प्रसिद्ध झाल्याला आता सत्तर वर्षे होत आली असून खुद्द राजवाड्यांना जाऊनही पन्नास वर्षे झाली आहेत. या कालावधीत मराठी भाषेचा अभ्यास पुष्कळच पुढे गेलेला असला तरी अजूनही राजवाड्यांची ' ज्ञानेश्वरीची प्रस्तावना ' व त्यांचे ' व्याकरण ' या जोडसाधनांचा उपयोग केल्यावाचून अभ्यासकाचे व संशोधकाचे पाऊल पुढे पडत नाही, इतके या दोन प्रबंधांचे महत्त्व आहे. आधुनिक भाषाभ्यासकांचा एक वर्ग राजवाड्यांच्या वरील कृतींकडे काहीशा उपेक्षेने पहात असतो हे खरे असले तरी ही परिस्थिती फार काळ टिकेल असे वाटत नाही. वर्णनात्मक ( Descriptive ) भाषाशास्त्राबरोबर ऐतिहासिक ( Historical )भाषाशास्त्र म्हणून काही असते याची जाणीव जेव्हा आधुनिक अभ्यासकांना होईल– आणि ती हळूहळू होत आहे– तेव्हा या क्षेत्रात राजवाड्यांनी करून दाखविलेल्या कर्तृत्वाची यथार्थ कल्पना येऊन त्यांच्या ग्रंथाचे महत्त्व विद्वानांस अधिकाधिक पटत जाईल यात मुळीच शंका नाही. सध्या आपल्या या ' जुन्या ठेवण्या 'वर काहीसे उपेक्षेचे सावट आले आहे, ही गोष्ट मात्र खरी. हे सावट दूर व्हावे व या प्रतिभावान् भाषाशास्त्रज्ञाचे तेज पुन्हा उठून दिसावे हा प्रस्तुत संपादनामागील एक हेतू आहे.

## अनुकूल-प्रतिकूल टीका

राजवाडे यांनी आपली ' ज्ञानेश्वरी ' प्रसिद्ध केल्यानंतर तिच्यावर अनुकूल-प्रतिकूल टीका बरीच झाली. ती सर्वच येथे विचारात घेण्याचे कारण नसले तरी त्यांपैकी एकदोन नमुने पहाणे मनोरंजक ठरेल. अनुकूल टीकाकारांत ' लोकमान्य केसरीकार ' ( लो. टिळक ? ) होते. त्यांनी आपल्या अभिप्रायात या ग्रंथाचा ' अपूर्व व अमूल्य ' या विशेषणांनी गौरव करून पुढे म्हटले होते :

" प्रस्तुतची ज्ञानेश्वरी म्हणजे खुद्द ज्ञानेश्वरांनी नेवाशास भाषेच्या ज्या स्वरूपात ती सांगितली त्याच स्वरूपात तंतोतंत छापलेला हा महाराष्ट्र वाङ्मयातील बहुमोल ग्रंथ होय. आणीच

एकनाथी ज्ञानेश्वरीने ज्या महाराष्ट्रीय समाजास आज अनेक शतके आपल्या गुणांनी मोहित करून सोडले आहे, त्यांस खुद्द ज्ञानेश्वरांच्या तोंडची ज्ञानेश्वरी मिळणे म्हणजे अपूर्व लाभ होय यात शंका नाही. भगवद्गीतेवरील उत्कृष्ट मराठी टीका, वारकरी पंथाची जननी, मनोहर उपमादृष्टान्तांनी गजबजलेले उत्तम काव्य, आणि सहाशे वर्षांपूर्वीच्या नागर मराठीचा नमुना व मराठीत कागदावर लिहिलेला सर्वांत जुना उपलब्ध लेख, या सर्व दृष्टींनी ज्ञानेश्वरांच्याच अस्सल भाषेत छापलेला हा ग्रंथ महाराष्ट्रीयांच्या आदरास, कौतुकास व आश्रयास पात्र होईल यात संदेह नाही. " ( केसरी, ता. २५-८-१९०८ )

पण अनुकूल टीकेपेक्षा प्रतिकूल टीकेचे महत्त्व अधिक असते. ती करण्यात बडोद्याचे डॉ. विष्णु गोविंद चिपळोणकर प्रमुख होते. त्यांनी ' ज्ञानप्रकाश ' व ' इंदुप्रकाश ' या दोन वृत्तपत्रांतून अनेक लेख लिहून राजवाडी ज्ञानेश्वरीवर टीकेची झोड उठवली. या टीकेत युक्तिवादापेक्षा राळ उडवण्यावरच अधिक भर होता. या चिपळोणकरी टीकेची थोडी कल्पना पुढील उताऱ्यावरून येईल. आपल्या पहिल्याच लेखात ते म्हणतात—

" भाषेच्या तंगड्या इतिहासाच्या गळ्यात व इतिहासाचे पाय व्याकरणाच्या गळ्यात, तसेच संस्कृत शब्दांस प्राकृत व्याकरणाचे नियम व प्राकृत-मराठी शब्दांस संस्कृत व्याकरणातील सूत्रे लावून, एखाद्या विषयाची चिवडाचिवड करून, चिंचेच्या पानावर देऊळ रचण्याची हातोटी म्हणा, कला म्हणा, जी रा. राजवाडे यांस साधली आहे....त्यांची ज्ञानेश्वरी ही या व्याकरणाची जननी असून हे व्याकरण म्हणजे तिचे एक शेंबडे, कुरूप पोर आहे. व या पोराच्या अंगास कोणा भटाभिक्षुकांनी अथवा ग्रामजोशी-कुळकर्ण्यांनी रचिलेल्या व पाथरवट-शिलाटांसारख्या ' अनाडी ' कामकऱ्यांनी कोरिलेल्या एकदोन शिलालेखांतील दहापाच प्राचीन शब्दरूपी-अशुद्ध शब्दरूपी-चिंध्या चिकटवून व या चिंध्या अमुक प्रकारच्या कापडाच्या व तसे कापड अमुक प्रांतात तयार होत असे, असे म्हणून राजवाडे हे त्याच्या आईचे माहेर व आजोळ कोणते हे ठरवीत व ती कोणत्या साली कोणत्या नक्षत्रावर जन्मली ही माहिती सांगत आहेत. "

या चिपळोणकरी टीकेत राजवाड्यांची प्रस्तावना व त्यांचे व्याकरण यातील विधानांचे तपशीलवार खंडन करण्याचा प्रयत्न असला तरी टीकेची एकंदर पद्धती वरीलप्रमाणेच, म्हणजे पूर्वग्रहदूषित व उथळपणाची दिसते. त्या मानाने श्री. शंकर बळवंत सहस्रबुद्धे यांनी मॅन्चेस्टर येथून केलेली टीका * पुष्कळच समतोल आहे. ज्ञानेश्वरीच्या मुद्रित प्रतींमध्ये राजवाड्यांचीच प्रत सर्वांत प्राचीन आहे हे मान्य करून ती ज्ञानेश्वरकालीन आहे हा त्यांचा सिद्धान्त मात्र श्री. सहस्रबुद्ध्यांनी आपल्या समर्पक युक्तिवादाने खोडून काढला आहे. या कामी त्यांना श्री. माड्गावकर यांना बीड-पाटांगण येथेच मिळालेल्या ज्ञानेश्वरीच्या दुसऱ्या प्रतीचा विशेष उपयोग झाला व या दोहींत तीच अधिक जुनी आणि विश्वसनीय होय हे सांगण्यासाठी त्यांनी उपर्युक्त लेख लिहिला.

* विविधज्ञानविस्तार, ४२-१ ( जानेवारी १९११ )

याप्रमाणे राजवाड्यांच्या प्रतीवर उलटसुलट टीका बरीच झाली. तिला उत्तर देण्यासाठी म्हणून त्यांनी ' केसरी 'त १९११ साली एक लेख लिहिला. त्याचा विचार पुढील परिच्छेदात केला आहे.

**' माझी ज्ञानेश्वरी व कित्येक शंकाकार '‡**

प्रथम ' केसरी 'त प्रसिद्ध झालेल्या या लेखात राजवाडे म्हणतात :– .

" ....सबंध ग्रंथ ( ज्ञानेश्वरी व ज्ञानेश्वरीचे व्याकरण ) बाहेर पडून पंधरा महिने लोटले असतील नसतील. त्या अवधीत या ग्रंथावर कित्येकांनी शंका व आशंका यांचा इषद्वर्षाव केला. प्रथम डॉ. चिपळूणकर यांचे ' ज्ञानप्रकाशात 'त व ' इंदुप्रकाशा 'त पाच-पंचवीस लेख प्रसिद्ध झाले. नंतर केसरीत या ग्रंथाचे मार्मिक परीक्षण आले. त्यापुढे हरिभक्तपरायण साखरेबुवा यांनी आपल्या ज्ञानेश्वरीच्या आवृत्तीत काही शंका प्रदर्शित केल्या; आणि आता ' विविधज्ञानविस्तारा '-च्या गेल्या जानेवारीच्या ( १९११ ) अंकात मांचेस्टर येथे गेलेले रा. सहस्रबुद्धे यांची शंका-पंचशती नुकतीच प्रकाशित झाली. " ( पृ. २४ )

वरील सर्वच शंकाकारांविषयी राजवाड्यांच्या मनात एक प्रकारची उपेक्षाबुद्धी असल्याने ते त्यांच्या शंकांचे निरसन करण्याच्या भरीस विशेष पडले नाहीत. नाही म्हणावयास श्री. सहस्रबुद्धे यांनी उपस्थित केलेल्या आक्षेपांना तेवढी त्यांनी उपर्युक्त लेखात थोडक्यात उत्तरे दिलेली आढळतात. पण ती देताना सुद्धा राजवाड्यांचा ' अहं ' जागृत आहेच, असे त्यांच्या पुढील प्रस्तावनेवरून दिसते. ते म्हणतात,

" ....राहता राहिले तिसरे शंकाकार रा. सहस्रबुद्धे. या गृहस्थांनी आपल्या शंका व्यवस्थित रीतीने मांडण्याचा आव घातला आहे, अद्वातद्वा वाचाटपणा केलेला नाही आणि नवी-जुनी भाषा म्हणजे काय ते समजण्याची लायकी ह्यांच्यात येण्यासारखी आहे; सबब त्यांच्या शंकांचे परीक्षण करणे सोयीचे व श्रेयस्कर दिसते. वस्तुतः पाहाता ह्यांच्याही शंकांत म्हणण्या-सारखा तथ्यांश नाही. ज्ञानेश्वरी भाषेचे व्याकरण ह्यांनाही बिलकूल कळलेले नाही. तेव्हा ह्यांच्या शंकांचे निरसन करण्याचा खटाटोप न केला तर म्हणजे काही मोठी विपत्ति ओढवेल अशातला प्रकार नाही. तथापि हे नवशिके आहेत, व्याकरणदृष्ट्या ज्ञानेश्वरीचा तौलनिक अभ्यास करावा अशी यांची प्रवृत्ति दिसते, आणि यांनी आपल्या शंका व्यवस्थित रीतीने व आटोपशीर मांडण्याचा प्रयत्न केला आहे, म्हणून....सदर शंकांचे निरसन करण्यात मी आपला वेळ बऱ्याच नाखुषीने खर्च करतो. " ( पृ. २४–२५ )

याप्रमाणे प्रस्तावना करून राजवाडे यांनी सहस्रबुद्धे यांच्या एकूण नऊ आक्षेपांना उत्तरे दिली आहेत. खरोखर पाहिले तर त्यांनी निरसन असे त्यांच्या तीनच शंकांचे केले आहे. पैकी

‡ राजवाडे लेखसंग्रह, भाग ३ रा, लेख क्र. ४, पृ. २४–३६.

एक व्याकरणदुष्ट प्रयोगविषयक, दुसरी समासदुष्ट प्रयोगविषयक व तिसरी छंदोदुष्ट प्रयोग-विषयक आहे. परंतु या तांत्रिक बाबी आहेत. त्या व सोडल्या तर इतरत्र त्यांचा केवळ वावदूक-पणा दिसून येतो. उदाहरणार्थ, आक्षेपखंडन करीत असताना राजवाड्यांनी केलेली पुढील विधाने पहावी :—

( १ ) " अशी विपरीत परीक्षा साखरे व भिडे कशामुळे करतात ? तर....ऐतिहासिक व्याकरण म्हणजे काय, निरुक्त कशाशीं तोंडीं लावतात व ज्ञानेश्वर कोणती भाषा बोलत असे या बाबींचे अज्ञान साखऱ्यादि मंडळीत पूर्णपणें वसत असल्यामुळें ही मंडळी गारगोटीला हिरा व हिऱ्याला गारगोटी म्हणून आपला गाजरपारखेपणा जगजाहीर करीत आहेत. " ( पृ. २७ )

( २ ) " व्याकरणाचे, समासाचे व छंदाचे दुष्ट व गांवढळ प्रयोग प्राचीनत्वाचे निदर्शक असतात हा सिद्धान्त.... महाराष्ट्र वाङ्मयाला लागू पडणार नाही. का म्हणाल तर आपले हे महाराष्ट्र एक प्राचीन व फार उच्च कोटीला गेलेल्या अशा संस्कृतीचे व वाङ्मयाचे वंशज आहे. आपण वाङ्मयदृष्टीने सुधारलेल्या स्थितीतून सध्या रानटी स्थितीत येत आहो. ज्ञानेश्वर काही निग्रो, रेड इंडियन, नॉर्स नाचाडी, किंवा ज्यूट ॲंग्ल नव्हता. त्याच्यापुढें वैदिक, संस्कृत, महाराष्ट्रीय, अपभ्रंश असे सारस्वत होते. व्यास, वाल्मिकी, कालिदास असे नामांकित कवि त्याने वाचलेले होते. अभिजात सारस्वत म्हणजे काय हे तो जाणत होता. छंदःशास्त्र तो पढला होता....तात्पर्य, दुष्टप्रयोगत्वात् प्राचीनत्व, हा सिद्धान्त ज्ञानेश्वराला लागू पडत नाही. कोणी कदाचित् लावण्यास गेलाच तर तो सहस्रबुद्ध्यांच्याप्रमाणे उपहासास नितान्त पात्र होईल. " ( पृ. ३३ )

वरील उताऱ्यातील मतभेद व कल्पनाविलास ही बाजूस ठेवली तरी हे शंकानिरसन नव्हे हे स्पष्ट आहे. हाच प्रकार लेखभर दिसतो व त्यामुळे या लेखाचे स्वरूप बरेच गढूळ झाले आहे. त्यात मुख्य गोष्ट ही आहे की, इतरांच्या शंकांचे निरसन करण्याच्या प्रयत्नाच्या निमित्ताने राजवाड्यांनी त्यांना स्वतःलाच वाटत असलेल्या एका मूलभूत शंकेचे निरसन करण्याची संधी या लेखाने साधून घेतली आहे. ती शंका म्हणजे आपल्या ज्ञानेश्वरीस विद्वन्मान्यता व सांप्रदायिक मान्यता मिळेल की नाही, ही होय. याबाबत राजवाडे स्वतः फार साशंक होते व ही आपली व्यथा त्यांनी या लेखात बोलूनही दाखवली आहे. तेथे ते म्हणतात की आपली ज्ञानेश्वरी सर्वांत जुनी आहे हे " सहस्रबुद्धे यांचे सार्वत्रिक आश्वासन एकट्यादुकट्या सहस्रबुद्ध्यांनाच तेवढे लागू पडते. मोठ्या दुःखाने सांगावे लागते की, ( ते ) इतरांना लागू पडत नाही. का की, साखरे, विष्णुबोवा जोग, पांगारकर वगैरे सांप्रदायिकांना सहस्रबुद्धे यांचे हे आश्वासन कबूल नाही. त्यांना सांप्रदायिक अशी जी एकनाथी संहिता ती तेवढी मान्य आहे; माझी संहिता मान्य नाही. ह्या अमान्यतेस्तव गेल्या वर्षी पंढरीस यात्रा जमली असता वरील त्रिमूर्तीनी तेथे जमलेल्या फडकऱ्यांस असा नामी उपदेश केला की, राजवाड्यांची संहिता संप्रदायबाह्य आहे, खोटी आहे, सबब ती कोणाही सांप्रदायिकानें घेऊ नये. " ( पृ. २६ ). म्हणून " माझी ज्ञानेश्वरीची

प्रत जुनी आहे असे विधान करणारा रा. सहस्रबुद्धयांसारखा एकतरी मनुष्य वर्षसहा महिन्यांत पैदा झाला ही गोष्ट " राजवाडयांना समाधानकारक वाटते, व त्यातच आपल्या पोथीतील पाठांशी व रूपांशी जुळेल अशी ज्ञानेश्वरीची आणखी एक प्रत माडगावकराना मिळाली या गोष्टीने त्यांचे वरील समाधान दुणावले आहे. ते व्यक्त करताना राजवाडे म्हणतात,

" ....ज्ञानेश्वरीची खरी संहिता मी जेव्हां प्रसिद्ध केली, तेव्हां मला अशी भीती पडली कीं, माझी संहिता खरी मानण्याला प्रत्यंतर प्रमाण कसें सांपडेल ? मला सांपडलेली पोथी एकच जर जगांत असेल व तिला दुसऱ्या कोणत्याही पोथीचा प्रत्यंतर पुरावा नसेल, तर सामान्य लोकांची व कदाचित् विद्वानांची खात्री करावी कशी ? तत्कालीन व तत्पूर्व शिलालेख, ताम्रपट व भोटक लेख यांजवरून ज्ञानेश्वरी भाषा काय असावी तिचा अंदाजच मला चांगला झाला होता व विद्वानांनाही तो पुढेंमागें मान्य झाला असता. परंतु माझ्या पोथींतल्यासारखे पाठ, रूपें वगैरे जींत आहेत तशी पोथी दुसऱ्या कोणास सांपडली असतां, माझ्या संहितेची प्रस्थापना चांगली होईल, असें मला वारंवार वाटे. तो सुप्रसंग सध्या आलेला आहे. माझ्या पोथीसारखीच एक पोथी रा. माडगांवकरांना सांपडलेली आहे.... मुख्य बाब जी सुप्तिङ्रूपांची ती माडगांवकरांच्या पोथींत बहुतेक माझ्या पोथींतल्यासारखीच आहे. त्यामुळें झालें काय कीं, माझी पोथी सर्व छापील पोथींहून....जुनी आहे, अशी साक्ष रा. सहस्रबुद्धयांना, म्हणजे रा. माडगांवकरांना मोकळया मनानें देतां आली. अशा तिन्हाईत साक्षीची वाट मी फार दिवस पहात बसलों होतों. ती माडगांवकरांनी रा. सहस्रबुद्धयांच्या द्वारां 'विविधज्ञानविस्तारां 'तून दिली ह्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें." ( पृ. ३५-३६ ).

सारांश, प्रस्तुत लेखात राजवाडयांनी आक्षेपकांच्या शंकांना समर्पक उत्तरे विशेष कोठे न देता, आपल्या ज्ञानेश्वरीची जुळी बहीण गवसल्यामुळे तिचे खरेपण सिद्ध झाल्याचा आपला आनंदच अधिक व्यक्त केलेला दिसतो, असे म्हणावे लागते.

## राजवाडे यांची ज्ञानेश्वरीची प्रस्तावना

राजवाडे यांनी ज्ञानेश्वरीला लिहिलेली प्रस्तावना मराठी भाषेच्या इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाची असून त्याशिवाय इतरही विषय तीत आले असल्याने तिचा आशय थोडक्यात समजून घेणे अवश्य आहे. सुमारे शंभर पृष्ठांची ही प्रस्तावना एकूण ७१ परिच्छेदांत विभागली असून या परिच्छेदांना क्रमांक दिलेले आहेत. यांपैकी काही परिच्छेदांतून एकाहून अधिक विषय आलेले असून त्यांचा तसा निर्देश पृष्ठाच्या डाव्या बाजूस ठळक अक्षरात केला आहे. मुळातील ही छपाईची योजना प्रस्तुत आवृत्तीत कायम ठेवली असून पुढील विवेचनात कंसातील आकडे परिच्छेदांचे आहेत.

या 'प्रस्तावने 'ला प्रारंभ व्याकरणाच्या व्याख्येने झाला असून व्याकरणाच्या निरनिराळया प्रकारांना कारणीभूत होणारे भाषेचे जे निरनिराळे भेद-प्रांतकृत, जातिकृत, लिंगकृत व कालकृत-

त्यांची चर्चा प्रारंभी केली आहे ( १ ). त्यानंतर प्रांतिक पोटभाषा व जातिपरत्वे होणारे मुख्य भाषेचे अपभ्रंश यांच्यातील फरक स्पष्ट केला असून मराठीचा किरिस्तानी अपभ्रंश व मानभावी अपभ्रंश यांची चर्चा केली आहे ( २ ). यापुढील परिच्छेदात भाषेची कालकृत अवस्थान्तरे सांगितली असून ( ३ ), त्यानंतर नागर अथवा शिष्ट मराठीची व्याख्या केली आहे. "अपभ्रष्ट किंवा प्रांतिक जी नव्हे ती नागर किंवा मराठी समजावी; " ती कृत्रिम नाही, तर सहज व सर्व-लोकप्रिय आहे आणि ऐतिहासिक व्याकरण असे तिचेच शक्य आहे इत्यादी ( ४–८ ). यानंतर वर्तमान शिष्ट मराठीचे साधे व्याकरण, पोटभाषांचे अथवा बोलींचे तौलनिक व्याकरण, आधु-निक सगोत्र समकालीन भाषांचे ( म्ह. मराठी, गुजराथी, हिंदी, बंगाली, इ. चे ) तौलनिक व्याकरण व मराठीचे ऐतिहासिक व्याकरण यांचे स्वरूप सांगून ( ९–१२ ), राजवाडे मराठी भाषेच्या इतिहासाकडे वळले आहेत. प्रथम त्यांनी वाङ्मय, सारस्वत व साहित्य यांमधील भेद स्पष्ट केला असून मराठी सारस्वताच्या शोधामुळे मराठी भाषेचा इतिहास व तिचे ऐतिहासिक व्याकरण लिहिणे शक्य झाले आहे असे सांगितले आहे. मात्र मराठी सारस्वताच्या शोधाप्रमाणे मराठी वाङ्मयाचा ( म्ह. लोककथा, लोकगीते, इ. ) शोध अद्याप मुळीच झालेला नसल्याने प्रांतिक अथवा अपभ्रष्ट मराठीचा इतिहास समजणे कठीण आहे असेही त्यांनी सूचित केले आहे ( १३ ). यानंतर मराठीच्या ऐतिहासिक व्याकरणाची सामग्री किंवा साधने यादीच्या रूपाने दिली असून ( १४ ), त्या आधारे मराठी भाषेचा मूलारंभ शके ४००च्या सुमारास मानला आहे ( १५–१६ ). यापुढील काही परिच्छेद पाली भाषेच्या विवेचनाला दिलेले असून त्यात 'पाली' या शब्दाची व्युत्पत्ती, पाली भाषेची परंपरा व तिचा आणि संस्कृतचा संबंध, पालीचा मूळदेश, अशिष्ट पालीचा दुर्तोंडेपणा, युरोपियनांचे पालीवरील सहेतुक प्रेम इत्यादी विषय आले आहेत ( १७ ). पालीनंतर राजवाडे प्राकृताकडे वळले असून प्राकृत भाषांचे उगम, त्यांचे पौर्वापर्यत्व, त्यांतील माहाराष्ट्रीचे स्थान व तिचे व्याकरणदृष्ट्या अमान्यत्व इत्यादी विषय त्यांनी चर्चिले आहेत ( १८–२३ ). महाराष्ट्रदेशाची वसाहत हा राजवाड्यांचा एक आवडता विषय असून त्याची चर्चा यापुढे आली आहे. प्रारंभीचे दंडकारण्य, त्यात पश्चिमेकडून कोकणात उतरलेल्या आर्यांचा झालेला प्रवेश, या उत्तरणात त्यांच्या भाषेवर झालेले परिणाम, वार्तिककार कात्यायनाच्या वेळेपासून आढळणारे माहाराष्ट्री भाषेचे नामोल्लेख, शातवाहनांच्या राजवटीतील व विशेषतः 'गाथासप्तशती 'मधील माहाराष्ट्री, त्यांनी स्थापिलेला शकसंवत् व त्याचे अ–म्लेंच्छत्व, 'शक' शब्दाचे दोन अर्थ, 'क्षत्रप' शब्दाचे संस्कृतत्व इत्यादी अनेक विषयांना या ठिकाणी स्पर्श झालेला दिसेल ( २४–२९ ). शातवाहनांची राजवट शके १५० पर्यंत चालली व त्यांच्या पश्चात माहाराष्ट्री भाषेवाही पडित काळ आला. उत्तरोत्तर तिचा ऱ्हास होत जाऊन शके १५० ते शके ४५० यामधील तीनशे वर्षांच्या काळात तिचा जो एक अपभ्रंश महाराष्ट्रात नांदू लागला त्यातूनच पुढे मराठी भाषा जन्मली. मंगळवेढे येथील एका ( बनावट व म्हणून त्याज्य ) ताम्रपटाच्या आधारे राजवाड्यांनी शकवर्ष ४०० हा माहाराष्ट्री–अपभ्रंशाचा अंतकाल व मराठीचा जन्मकाल

मानला आहे (३०-३४). यापुढील परिच्छेदात मराठी भाषा सुरू होई तावत्कालपर्यंत भाषांची परंपरा कोष्टकाच्या रूपाने दिली असून अनुषंगाने, कोणत्याही भाषेचा अपभ्रंश होताना काय परिस्थिती असते या प्रश्नाचाही विचार केला आहे ( ३५ ). यानंतर मराठी भाषेच्या स्थित्यंतरांचे एक स्थूल टिपण दिले असून ( ३८-४१ ), मराठीच्या भावी अभ्यासाच्या दिशा दाखविल्या आहेत ( ४२ ).

राजवाड्यांच्या ‘ प्रस्तावने ’चा मुख्य तात्त्विक भाग येथे संपला. यापुढील भागात त्यांनी प्रस्तुत छापलेल्या ज्ञानेश्वरीच्या मूळ पोथीचा इतिहास, स्वरूप व तपशील दिला असून तिची अपूर्वाई परोपरींनी गायिली आहे ( ४३-५० ). त्यांच्या दृष्टीने ही ‘ अमूल्य ’ पोथी शक १२१२ ते १२४० च्या दरम्यान लिहिलेली असून तिची भाषा ही ज्ञानेश्वरांची निर्भेळ मराठी भाषा आहे ( ५१-५३ ). वरील मुकुंदराजी पोथीची ज्ञानेश्वरीच्या एकनाथी व एकनाथोत्तर-कालीन प्रतींशी तुलना हा या ‘ प्रस्तावने ’च्या उर्वरित भागाचा विषय असून ही तुलना करताना एकनाथी संशोधनाचे स्वरूप, कोणत्याही ग्रंथाच्या मूलस्वरूपसिद्धीची पद्धती, क्षेपक-विचार या सारखे काही विषय येऊन गेले आहेत (५४-६३). शेवटी, प्रस्तुत मुकुंदराजी प्रतीची माड-गावकरी प्रतीतील काही पाठांतरांशी पहिल्या अध्यायापुरती स-टीक तुलना करून ( ६४ ), व आठल्ये आणि भिडे यांची ज्ञानेश्वरीची भाषान्तरे कशी सदोष आहेत ते दाखवून ( ६५ ) हे तौलनिक विवेचन संपविले आहे. अखेरीस प्रस्तुत प्रतीतील मूळ गीताश्लोकांचे पाठ गीतेच्या प्रचलित पाठांहून कोठे कोठे भिन्न सापडतात त्यांची एक यादी देऊन व यांपैकी बहुतेक सर्व पाठभेद केवळ उच्चाराचे आहेत हे दाखवून ( ६७ ), आणि ज्ञानेश्वरीत फारसी शब्द नाहीत असा निर्वाळा देऊन ( ६८-६९ ) राजवाड्यांनी ही प्रदीर्घ प्रस्तावना आटोपती घेतली आहे.

## पूर्ववैदिक भाषा आणि मराठी

वरील प्रस्तावना बारकाईने वाचली असता असे दिसून येते की, राजवाड्यांनी आपल्या व्याकरणासाठी पाणिनीय व्याकरणाची चौकट घेतली असली तरी प्रत्यक्ष भाषेचा विचार करताना ते पाणिनीच्याही मागे जाऊ पहातात. ‘ ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावने ’त त्यांनी भाषेच्या परंपरेचा जो तक्ता दिला आहे(परि. ●३५) त्यावरून ते पाणिनिपूर्व आर्ष भाषा व त्यापूर्वीचीहि पूर्ववैदिक भाषा गृहीत धरून मराठीचा या पूर्ववैदिक भाषेशी सांधा जोडू पहातात असे दिसते. अर्थात् हा सांधा जोडताना त्यांनी प्राकृतिकोद्भव व प्रांतिक भाषांच्या मधल्या अवस्था लक्षात घेतलेल्या आहेत हे खरे; तथापि त्यांचे लक्ष्य पूर्ववैदिक भाषेवर, की जिची चाहूल पाणिनीय व्याकरणात किंवा ग्रांथिक संस्कृतात लागत नाही अशा एका प्राचीनतम लौकिक स्वरूपाच्या बोलीवर आहे यात शंका नाही. त्यांच्या मते “ ग्रांथिक भाषा, प्रांतिक भाषा, जातिक किंवा गोत्रिक भाषा, व अपभ्रंश असा चतुर्विध भाषाभेद वैदिक काली होता ” ( परि. ●१७ ), व ज्ञानेश्वरी-मराठीत या चारही भाषांचे दूरतः उमटलेले पडसाद ऐकू येतात. राजवाडे यांचे हे

मत त्यांच्या ज्ञानेश्वरीच्या प्रस्तुत प्रस्तावनेत व व्याकरणात तितके स्पष्टपणे मांडले गेलेले नसले तरी त्याची थोडीफार चाहूल येथे लागतेच. " प्राकृत भाषांचे प्रकृतिविकृतिभावाचे नाते लौकिक संस्कृताशी नसून संस्कृतच्या पूर्वरूपाशी आहे " या सिद्धान्ताचे प्रणयन त्यांच्या मते प्रथम राजारामशास्त्री भागवत यांनी ' प्राकृत भाषेची विचिकित्सा ' या आपल्या निबंधात केले ( परि. ●२७ ). त्या परंपरेने मागे जात जात राजवाडे मराठीचे सर्व ' प्रकृतिविकृतिभाव ' या पूर्ववैदिक बोलीभाषेत शोधू पहातात. या दृष्टीने शशिसूर्यां ( ज्ञा. ७.१२, राजवाडे–पाठ ), हातींपायीं, दोनप्रहरां, यांसारख्या ( त्यांच्या मतें ) द्विवचनाच्या आ किंवा आं प्रत्ययाचा छडा लावताना ' पादयोः पतति ' या शीर्षकाच्या आपल्या एका लेखात ते म्हणतात-- †

" ....त्याची परंपरा संस्कृताच्या पूर्वरूपाशीं, म्हणजे वैदिक भाषेशीं किंवा पूर्ववैदिक भाषेशीं नेऊन भिडविली पाहिजे. पाणिनीय लौकिक संस्कृतांत ' आं ' प्रत्ययाची परंपरा सांपडली तरी वाहवा, न सांपडली तरी वाहवा. कां कीं, मराठीचीं जुनाट मूळें वैदिक भाषेत व पूर्ववैदिक भाषेत जितकीं सांपडण्याचा संभव आहे तितकीं तीं लौकिक संस्कृतांत किंवा महाराष्ट्रीत सांपडण्याचा संभव नाहीं.... वैदिकी प्रक्रियेंत पाणिनि सामान्य प्रत्ययांखेरीज दुसरे कांही विभक्तिप्रत्यय देतो. या अवान्तर विभक्तिप्रत्ययांचा अर्थ असा कीं, छांदस भाषा एक नसून एकाहून जास्त होत्या, किंवा दोनचार प्रांतिक भाषांचा मिलाफ होऊन एक छांदस भाषा बनली होती. उदाहरणार्थ, पंथानः व पंथाः ( प्रथमेचें अनेकवचन ); व्योमन् व व्योमनि ( सप्तमीचें एकवचन ); इ. अशीं सामान्य प्रत्ययांहून निराळे प्रत्यय लागलेलीं रूपें वैदिक भाषेत आढळून आल्याकारणानें पाणिनीला ' सुपां सुलुक् ' इत्यादि सूत्र ( ७. १. ३९ ) रचावें लागलें. " ( पृ. २६१ ).

## ज्ञानेश्वरीचा संस्कृत नवमाध्याय

पण यापेक्षा राजवाडे यांनी ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायाचे जें संस्कृत भाषान्तर केले त्याला त्यांनी लिहिलेल्या टीकेत वरील मत पदोपदी स्पष्ट होते. या दृष्टीने त्यांच्या ज्ञानेश्वरीच्या व्याकरणाला त्यांनी संस्कृतात प्रतिशब्दशः भाषान्तर केलेला हा नवमाध्याय पूरक व उपोद्बलक ठरतो. त्यातून त्यांच्या वरील मताला पोषक अशी काही उदाहरणे पुढे दिली आहेत :—

( १ ) ' जाल ' या भूतकालवाचक धातुसाधिताचे निर्वचन करताना ते त्या ठिकाणी म्हणतात– " अस् चें वर्त. वाचक सात म्हणून होतें. उदा., ' होत सात '. ह्या सात–चें अर्वाचीन रूप ' जात. ' होत जात ( तो–ती–तें ). अस् चे भूत. वाचक ' अस्त ' असें रूप पुरातन पूर्ववैदिक कालीं होतें. अर्वाचीन पूर्ववैदिक कालीं अस्त–चें स्त असे रूप झाले. नंतर वैदिक व पाणिनीय कालीं तें रूप शिष्ट भाषेंतून लोप पावलें. परंतु पाणिनीय व वैदिक कालीन प्रांतिक किंवा जातिक भाषांत स्त हें रूप विद्यमान होतें. त्या प्रांतिक, म्हणजे महाराष्ट्री व मराठी यांच्या पूर्वज संस्कृत-

---

† राजवाडे–लेखसंग्रह, भाग ३, पृ. २६१.

कालीन भाषेंतील स्त-चें प्राकृतांत सत असे निष्ठारूप जालें. सत + ल = जअ + ल = जाल." ( ज्ञानेश्वरी अ. ९ वा, ओ. ३३, पृ. २७–२८ ) वरील व्युत्पादन काल्पनिक व अवास्तव आहे, हे सांगणे नकोच.

( २ ) याप्रमाणेच 'परि भोगाविये अइलीकडे मेरे' या चरणातील ( ज्ञा. ९–५१ ) अइल या शब्दाविषयी ते लिहितात – " आर–आरात्, आरे. आर म्हणजे समीप ( विशेषण ). पाणिनीय संस्कृतांत आरात् व आरे हीं दोनच रूपें ह्या शब्दाची उपलब्ध आहेत. ज्ञानेश्वर तर आर–पासून झालेला आयल ( आर + ल = आयल ) शब्द विशेषणासारखा योजतो. तेव्हा उघड आहे की, पूर्व–वैदिक भाषेंत आर शब्द विशेषणासारखा योजीत व त्याला सर्व विभक्तींचे विकरण होत असे. तें विकरण पाणिनीय संस्कृतांत लोपून हा शब्द अव्ययत्वाप्रत पावला. परंतु प्रांतिक भाषांत विकरणशीलच राहिला. आणि तसाच तो अपभ्रंशरूपानें ज्ञानेश्वरापर्यंत व आपल्या-पर्यंत पोहोंचला " ( ज्ञानेश्वरी, अ. ९ वा, ओ, ५१, पृ. ३७ ).

( ३ ) 'नां' हा निषेधार्थक निपात ( उदा., 'बरि विटे हि नां' ज्ञा. ९. ५२ ). त्यांनी सं. नञ्–पासून व्युत्पादून हा 'नञ्' ग्रांथिक संस्कृतांत आढळत नसला तरी बोलण्याच्या संस्कृतांत व प्रांतिक भाषांत नित्याच्या वापरात होता असे म्हटले आहे ( ज्ञानेश्वरी, अ. ९ वा, ओ. ५२, पृ. ३८ ).

( ४ ) 'केवि' हे अव्यय कद्वत्–पासून ( जसे, जेवि ∠ यद्वत् ) व्युत्पादून राजवाडे म्हणतात, " कद्वत्–कसे–हा शब्द पाणिनीय संस्कृतांत नाही. पूर्ववैदिक भाषेंत व प्रांतिक भाषेंत होता. कत् या सर्व नामापासून कद्वत्. कत् हे सर्वनाम व अव्यय कच्चित् या रूपयांत राहिलें आहे." ( ज्ञानेश्वरी, अ. ९ वा, ओ. ५३, पृ. ३९ )

( ५ ) ज्ञानेश्वरीत 'वस्तु' हे नाम स्त्रीलिंगी आहे. (उदा; ज्ञा ९–५३). याविषयी राजवाडे म्हणतात– " वस्तु शब्द पाणिनीय संस्कृतांत नपुंसकलिंगी आढळतो. परंतु छंदसि दिवस ह्या अर्थी स्त्रीलिंगी योजिलेला सांपडतो. तें च लिंग ज्ञानेश्वर व त्याचे वंशज आपण हि सहजच योजतो. ह्यावरून एवढें निश्चित आहे कीं पाणिनीय संस्कृताच्या परंपरेपेक्षा वैदिक भाषेची व प्रांतिक भाषेची परंपरा मराठीनें उचललेली दिसते." (ज्ञा. आ. ९ वा, ओ. ५३, पृ. ३९). हीच गोष्ट 'स्नान' या संस्कृतांत पुलिंगी व मराठींत नपुंसकलिंगी असलेल्या नामाची आहे असें ते सांगतात. ( ज्ञा. ९–९३ ).

( ६ ) 'पाहे पां दूध पवित्र आणि गोड । पासि चि त्वचेचिया पदरासि आड । परि तें अव्हेरूनि ते **मूड** । अशुद्ध काइ न घेति ।। ' ( ज्ञा. ९.५६ ) या ओवीतील स्थूलाक्षरांकित पाठ वास्तविक 'गूढ' असा असणार. यमकासाठी तो 'मूड' असा झाला. येथे मूढ म्हणजे गोचिड, हे स्पष्ट आहे; पण हा सरलार्थ न स्वीकारता राजवाडे 'मूत' ( म्हणजे चिकटलेले, किडे, इ., अर्थात् गोचिड, मादा, वगैरे ) असा कोशात नसलेला पण त्यांच्या मते 'बोलत्या संस्कृतांत' असलेला शब्द व त्याचा वरील अर्थ ज्ञानेश्वरीच्या आधारे सुचवितात. अर्थात् ही सर्व कवि-

कल्पना होय.

( ७ ) आहाति ( वर्त. तृ. पु. अ. व. ) व असौनि ( भूत कृदन्त ) ही दोन रूपे त्यांनी अनुक्रमे असंति व असित्वा किंवा अस्त्वा या ' पूर्ववैदिक व प्रांतिक रूपां 'च्या पासून निर्वचिली आहेत ( ज्ञा. ९.५८, टीका पृ. ४२ ).

( ८ ) ' तव ' हे पंचमीचे शब्दयोगी अव्यय राजवाडे पूर्वी सं. स्तव ( स्तु – स्तव् = प्रारंभ करणें ) पासून व्युत्पादीत असत. परंतु आता त्यांना ते तात् या ' फक्त अव्ययात राहिलेल्या पंचमीच्या पूर्ववैदिक प्रत्ययापासून व्युत्पादिणे ' अधिक युक्त दिसते. (ज्ञा. ९. २६८, टीका पृ. ११४ ).

( ९ ) ' डावलणे ' या क्रियापदाची व्युत्पत्ती ' डाव ' या विशेषणापासून सरळ असताना राजवाडे त्याचा शोध पूर्ववैदिक व प्रांतिक भाषांत घेऊ पहातात. त्यांचे भाष्य असे :— " दवय् = To Place at a distance. दीर्घ व दूर याबद्दल तर–तम–भावीं दवीयस् व दविष्ट शब्द येतात. ह्या दवीयस् व दविष्ट शब्दांत मूळ ' दव ' शब्द आहे. तो मराठी डाव ( वा-वी-वें ) या शब्दाचा मूळ आहे यांत संशय नाहीं. शिष्ट संस्कृतांत ' दव ' शब्द आतां व पाणिनीकाळीं हि नव्हता; परंतु पूर्ववैदिक व प्रांतिक भाषांत हा शब्द होता. " (ज्ञा. ९·४३३; टीका पृ. १५८). राजवाडे यांचे वरील म्हणणे क्षणभर मान्य केले तरी ' डाव 'चा संबंध दीर्घ व दूर या कल्पनांशी कसा पोचतो ते सांगणे कठिच आहे.

( १० ) ' विणावणी ' ( ज्ञा. ९·१०५ ) या शब्दाचे व्युत्पादन त्यांनी पुढीलप्रमाणे केले आहे :—" मराठींत ऊर्ण्चें जसें विण होतें, तसेंच पाणिनीय काळीं प्रांतिक संस्कृतांत ऊर्ण् चें विर्ण् होत असे, व त्या विण् पासून वेणि–णी हा शब्द झालेला आहे. वे, वी, ऊय् ह्या धातूं-पासून मराठींत ओवणें, वोवणें हा धातु झाला आहे, व ऊर्ण् या धातूपासून विणणें हा धातु झाला आहे. " ( टीका, पृ. ६३ )

राजवाड्यांच्या निर्वचनाच्या वरील उदाहरणांतून त्यांच्या कल्पनाशक्तीचा प्रत्यय आला तरी ही कल्पनाशक्ती पुष्कळदा वास्तवाला सोडून स्वैर भराऱ्या मारण्यात आनंद मानते हेहि दिसून येते. त्यांनी आपल्या मनाशी एक पूर्ववैदिक भाषा कल्पिली व तिचा धागा ते ज्ञानेश्वरीच्या मराठीत शोधू लागले. या धाग्याला पाणिनीच्या व्याकरणात व ग्रांथिक संस्कृतात आधार नाहीं हे त्यांना ठाऊक होते व म्हणूनच त्यात नसला तरी कोशनिविष्ट व ग्रंथनिविष्ट न झालेल्या ' बोलत्या संस्कृतात ' तो आहे अशी कल्पना करून त्यांनी हे सर्व व्युत्पादन केले व मराठीची परंपरा थेट पूर्ववैदिक भाषेपर्यंत नेऊन भिडवली. यात कल्पनेबरोबर एक प्रकारचा दुरभिमानहि आला व त्यामुळेच त्यांचे वरील मत विद्वन्मान्य होणे कठिण झाले. *

---

* यातच भर राजवाड्यांच्या ' हठात् व्युत्पादना 'ची पडली. उदा; आरोगणें–णा हे

[ टीप– पुढील पानावर चालू ]

## मराठी भाषेचा जन्मकाळ

ज्ञानेश्वरीच्या आपल्या ' प्रस्तावनें ' त ' शिष्ट मराठीच्या ऐतिहासिक व्याकरणाच्या रचनेची सामग्री ' या मथळयाखाली राजवाडयांनी प्राचीन लेखांची जी यादी परि. ●१४ वर दिली आहे त्या यादीच्या अग्रभागी शक ४१० तील मंगळवेढे-ताम्रपट व शक ६५८ तील चिकुर्डे–ताम्रपट हे दोन लेख आहेत. त्यांपैकी पहिल्या, म्हणजे मंगळवेढे–ताम्रपटाच्या आधारे, त्यांनी शक ४०० ( सुमारे ) हा मराठी भाषेचा जन्मकाळ म्हणून निश्चित केला आहे व त्या-प्रमाणे या ताम्रपटाचा आणि त्यावरून सिद्ध होणाऱ्या मराठीच्या जन्मकाळाचा उल्लेख ते आपल्या ' प्रस्तावनें ' त वारंवार करतात. परंतु वरील दोन्ही ताम्रपट आज उपलब्ध नसून शिवाय ते संपूर्णतः बनावट आहेत हे आता बहुतेक सर्वांना मान्य आहे. त्यांतील भाषेचे नवीन वळण डॉ. गुणे † यांनी निर्विवादपणे सिद्ध केले असल्याने हे लेख भाषेचा जन्मकाळ ठरविण्याच्या दृष्टीने प्रमाण मानता येत नाहीत. त्यामुळे प्राकृताचा अपभ्रंश शके ४५० पर्यंत चालून पुढे नष्ट झाला आणि त्याच सुमारास मराठी भाषा उदय पावली हे राजवाडयांचे मतही निराधार ठरते. आज तरी वस्तुस्थिती अशी आहे, की मराठीचा जन्मकाळ इसवीसनाच्या आठव्या शतकामागे नेता येत नाही. ' मरहट्टे ', म्हणजे मराठे, व त्यांची भाषा यांचा पहिला उल्लेख आठव्या शतकाच्या अखेरीस उद्योतन सूरीने लिहिलेल्या ' कुवलयमाला ' या ग्रंथात सापडतो,* हे प्रसिद्ध आहे. त्यात मरहट्टयांचे वर्णन " दिण्णले गहिल्ले उल्लविरे ", म्हणजे ' दिण्णले गहिल्ले ' अशी भाषा बोलणारे असे केले आहे. हा मराठी भाषिकांचा व त्यांच्या भाषेचा प्राचीनतम उल्लेख होय, आणि तो आठव्या शतकाच्या अखेरचा आहे. राजवाडयांनी विक्रमादित्य सत्याश्रयाच्या ज्या ताम्रपटाचा उल्लेख केला आहे* तो ताम्रपट ‡ सुद्धा शक ६०२ चा, म्हणजे इसवी सनाच्या सातव्या शतकाच्या अखेरचा आहे. त्यात ' पन्नास ' हे शुद्ध मराठी वळणाचे संख्या-विशेषण आले आहे. सारांश, मराठी भाषेचा उगमकाळ जास्तीत जास्त सातव्या शतकापर्यंत मागे नेता येईल. तो त्याच्याहि मागे नेण्यास आधार नाही. राजवाडयांनी सुद्धा तो पाचव्या शतकापर्यंत मागे नेण्याचा प्रयत्न केला याचे कारण त्यांनी शक ४५० हा अपभ्रंशाचा अंतकाल

---

[ टीप– मागील पानावरून चालू ]

शब्द एकदा सं. अ–रोगणम्–पासून ( ज्ञा. ९·१०२ ), तर एकदा सं. आरोचनम्–पासून ( ज्ञा. ९·३८२ ) व्युत्पादून या शब्दाचा ' भक्षणे ' असा ' काही तरी ' अर्थ अलीकडील लोक करतात अशी त्यांनी टीका केली. पण हाच अर्थ बरोबर आहे याची साक्ष महानुभावीय ग्रंथांतून पदोपदी मिळते.

† मराठी भाषेचा कालनिर्णय ( भा. इ. सं. मं. षष्ठसंमेलनवृत्त, पृ. २८–४० ).

* पाटण येथील शक ११२८ चा मराठी शिलालेख, ( प्रभात १.५ )

‡ Indian Antiquary, Vol. VI, p. 77.

मानला हे होय. त्यामुळे त्यांना मराठीचा जन्मकाळ मागे ओढणे क्रमप्राप्त झाले. तसा तो ओढूनसुद्धा थोडी पोकळी राहिलीच. ती मग त्यांना "पूर्वभाषा असतानाच उत्तरभाषा अपभ्रंश म्हणून सुरू होते" असा न्याय सांगून त्यानुसार "महाराष्ट्री–अपभ्रंश चालू असतांच मराठी सुरू झाली व तो मेल्यावर त्याची जागा मराठीने व्यापिली" असे म्हणून भरावी लागली ( ज्ञा. प्रस्तावना, पृ. ५८ ). एकूण, थोडा कच्चा आधार आणि थोडा दुराग्रह यांचा मिलाफ होऊन त्यामुळे मुख्य सिद्धान्त खचला. परंतु त्यामुळे या एकूण विवेचनास विशेष बाध येत नाही. असो. ज्ञानेश्वरीच्या 'प्रस्तावने'चा इतका विचार करून आपण तिच्या व्याकरणाकडे वळू.

**आद्य मराठी ऐतिहासिक व्याकरणकार**

मराठी भाषेचे 'पंचवार्तिक' या नावाचे पहिले व्याकरण महानुभाव पंथातील पं. भीष्माचार्य यांनी इसवी सनाच्या चौदाव्या शतकात रचिले. मराठीच्या एका बोलीचे, गोमंतकीचे, फा. स्टीफन्स यांनी लिहिलेले व त्यांच्यानंतर आणखी काही पाद्री मंडळींनी त्यात भर घालून वाढविलेले 'Arte da Lingua Canarim' हे व्याकरण इ. स. १६४० मध्ये प्रसिद्ध झाले. आणि मराठी भाषेचे पाणिनी म्हणून ज्यांचा गौरव होतो त्या दादोबांनी आपले मराठी व्याकरण इ. स. १८३६ मध्ये रचून पूर्ण केले. मराठी भाषेची वरील तीन व्याकरणे व्याकरणाच्या त्या त्या क्षेत्रात पहिली आहेत यात काही शंका नाही. पं. भीष्माचार्यांचे तात्त्विक म्हणून, फा. स्टीफन्स यांचे प्रादेशिक बोलीचे म्हणून, व दादोबांचे वर्णनात्मक म्हणून या तीन व्याकरणांना पहिलेपणाचा मान मिळतो हे साहजिकच आहे. हा मान मराठीच्या ऐतिहासिक व्याकरणाच्या शाखेत इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांच्याकडे जातो. त्यांचे 'ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे व्याकरण' हे मराठी भाषेचे ऐतिहासिक पद्धतीने रचिलेले पहिले व्याकरण असून ते त्यांनी संपादित केलेल्या ज्ञानेश्वरीबरोबरच शके १८३१ ( इ. स. १९०९ ) मध्ये प्रसिद्ध झाले. त्याच्या प्रारंभी 'प्रकाशकाची सूचना' या मथळ्याखाली जो दीडपानी मजकूर आहे त्यात म्हटले आहे की, "प्रस्तुत व्याकरण ज्ञानेश्वरीचा व्याकरणशुद्ध अर्थ करण्याचे एक साधन होईल. कित्येक लोक ( ज्ञानेश्वरीचा ) सध्या जो अर्थ करीत असतात तो कसा अशुद्ध असतो, हे या व्याकरणाचे साहाय्याने स्पष्ट होणार आहे." ( पृ. १ ) वरील अपेक्षा किती प्रमाणात सफल झाली ते सांगणे कठिण असले तरी इतके खरे की हे व्याकरण म्हणजे राजवाड्यांच्या ज्ञानेश्वरीविषयक व्यासंगाचे व संशोधनाचे एक परिपक्व फळ असून वरील 'सूचने'च्या शेवटी म्हटल्याप्रमाणे ते "भाविक व शास्त्रप्रवण महाराष्ट्रास अर्पण" करून त्यांनी एक महत्कार्य साधले. चिं. वि. वैद्य आपल्या परीक्षणाच्या प्रारंभीच म्हणतात त्याप्रमाणे, राजवाडे यांचे हे व्याकरण "मराठी भाषेच्या वाङ्मयाच्या ( ? ) इतिहासांत एक क्रांतिकारक व अत्यंत महत्त्वाचें केंद्रस्थान होईल, असें म्हणावयास हरकत नाहीं." ¶

¶ चिं. वि. वैद्य यांचे "निबंध आणि भाषणें", पृ. ९७.

## पूर्वप्रयत्न

अशा प्रकारचा प्रयत्न यापूर्वी बीम्स व हॉर्न्ले यांनी काही प्रमाणात केला होता असे सांगून राजवाडे यांनी आपल्या ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावनेत त्या दोघांवरही काहीशी कडक टीका केली आहे. तेथे ते म्हणतात :

" बीम्स § व हॉर्न्ले ‡ ह्यांनी आधुनिक प्राकृतिकोद्भव भाषांचें तौलनिक व्याकरण लिहितांना ऐतिहासिक व्याकरणाच्या प्रांतांतही अतिक्रमण करण्याचा आव घातलेला आहे. म्हणजे ह्या दोघां वैय्याकरणांनीं रचलेलीं व्याकरणें तौलनिक व ऐतिहासिक अशीं मिश्र आहेत. तौलनिक व्याकरण व ऐतिहासिक व्याकरण असा दिक्कालावच्छिन्न द्विधाभेद त्यांच्या ध्यानांत आलेला नाहीं, हें खरें आहे. परंतु त्यांच्या हातून असा मिश्र प्रकार झालेला आहे, हें सहज ओळखतां येतें. बीम्स व हॉर्न्ले ह्यांचा मुख्य गुरु जो बॉप्प त्यानेंहि आपल्या व्याकरणाला तौलनिक म्हटलें आहे....मराठी, बंगाली, हिंदी, अवधी, पंजाबी, सिंधी, गुजराथी वगैरे भाषांतील पुराणग्रंथसंग्रह त्यांच्या कालीं अनुपलब्ध असल्यामुळे, बीम्स व हॉर्न्ले ह्यांच्या व्युत्पत्तीचा भाग बराच अपुरा व काल्पनिक राहिलेला आहे. आधुनिक प्राकृतिकोद्भव भाषांचें मूळ ज्या प्राकृत भाषा त्यांनी थेट मंडुकप्लुतीनें घेण्याशिवाय दुसरें गत्यंतर ह्या दोन्ही वैय्याकरणांना राहिलें नाहीं. मराठींतील एखाद्या आधुनिक शब्दाची किंवा प्रत्ययाची पूर्वपरंपरा पहाण्याची इच्छा झाल्यास, त्यांना एकदम प्राकृताच्या घाटावर जावें लागतें, मध्यें विसावा घेण्यास जागा सांपडत नाहीं. म्हणजे महाराष्ट्री, शौरसेनी, मागधी, अपभ्रंश वगैरे प्राकृत भाषा व मराठी, बंगाली वगैरे प्राकृतिकोद्भव भाषा ह्यांची वस्तुतः ते तुलना करीत असतात. प्राकृत भाषांचा अंत व सद्यांचा काल ह्या दोहोंमधील हजार-बाराशें वर्षांत रूपांची कशी चढामोड झाली, हें त्यांना माहीत नसतें. त्यामुळें, संशयस्थानीं अशी व्युत्पत्ति असेल किंवा असावी, असें संशयित समाधान करून घेतल्याशिवाय त्यांना दुसरी तोड राहिली नाहीं." (ज्ञानेश्वरीची प्रस्तावना, पृ.१२).

राजवाडे यांची वरील टीका सर्वच समर्थनीय आहे असे नाही. कारण बीम्स व हॉर्न्ले यांच्या व्युत्पादनात कल्पनेचा अंश बराच आहे हे मान्य करूनसुद्धा त्यांना ऐतिहासिक दृष्टिच नव्हती असें म्हणतां येत नाही. शिवाय राजवाडे यांनी त्या दोघांविरुद्ध घेतलेला जो मुख्य आक्षेप की ते प्राकृतावरून थेट मराठीवर उतरतात, त्यामधील भाषेच्या अवस्था लक्षात घेत नाहीत, तोच आक्षेप थोड्या अधिकच प्रमाणात राजवाड्यांच्यावरही घेता येईल; कारण राजवाडे तर कित्येकदा मधली प्राकृताचीही पायरी गाळून संस्कृतावरून थेट मराठीवर येतात. परंतु समग्र

---

§ A Comparative Grammar of the Modern Aryan Languages of India, Vols. I, II and III.

‡ A Grammar of Gaudian Languages, 1880.

मराठीं भाषेचे नसले तरी तिच्या प्रारंभीच्या अवस्थेचे विश्वसनीय साधनांच्या आधारे ऐतिहासिक व्याकरण रचण्याचा मान राजवाड्यांकडे जातो हे त्यांच्या विरोधकांनाही मान्य करावे लागेल.

महाराष्ट्रातील विद्वानांनी केलेल्या अशा प्रकारच्या प्रयत्नांत त्यांनी कृष्णशास्त्री गोडबोले व डॉ. भांडारकर या दोघांचा निर्देश केला असून तोहि सौम्यपणाने केला आहे. पैकी कृष्ण-शास्त्र्यांचा प्रयत्न, राजवाड्यांच्या मते, प्राचीन ग्रंथसंग्रहाच्या अभावी लंगडा पडलेला असून डॉक्टर भांडारकरांनी बीम्स वगैरेंच्या काही क्लृप्त्या नामी खोडल्या असल्या तरी त्यांनी स्वतंत्र ‘ ऐतिहासिक ’ व्याकरण रचण्याचा आव घातलेला नसल्यामुळे त्यांची विद्वत्ताप्रचुर व्याख्याने राजवाड्यांच्या दृष्टीने टीकेचा विषय होऊ शकत नाहीत. याप्रमाणे या क्षेत्रातील पूर्व-प्रयत्नांचा धावता आढावा घेऊन ते म्हणतात,

“ तात्पर्य, सांगण्याचा मुद्दा एवढाच की, मराठी भाषेचे ऐतिहासिक व्याकरण अद्याप रचावयाचे आहे· ” ( ज्ञा. श्री प्रस्तावना, परि. ●१२ )

## राजवाडे–कृत व्याकरणाची पार्श्वभूमिका

प्राचीन मराठीचा विचार राजवाडे यांच्या मनात अनेक वर्षे घोळत होता व त्याविषयी ते अधूनमधून टिपणवजा लेख लिहीतही होते. पण त्याला खरी चालना त्यांच्या हाती ज्ञानेश्वरीची मुकुंदराजी प्रत आली तेव्हा मिळाली. या प्रतीच्या अभ्यासाचे फलित म्हणजेच त्यांचे ‘ ज्ञाने-श्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण. ’ त्याचा इतिहास सांगताना ‘ सुबन्तविचार ’ या निबंधाच्या समारोपात ते म्हणतात—

“ गेलीं वीस वर्षे मराठी भाषेचे उगम मी शोधीत आहें. जसजसे जुने लेख सांपडत गेले तसतसे त्या लेखांतील भाषेचें पृथःकरण मी करीत असें. * कांहीं वर्षे लोटल्यावर असे आढळून आलें कीं वर्तमान मराठींतील बरींच रूपें जुन्या मराठींतून निघालेलीं आहेत. इतक्यांत मुकुंदराजी ज्ञानेश्वरीचा मला शोध लागला. त्या ज्ञानेश्वरींतील भाषेचा व इतर त्या कालीं सांपडलेल्या जुन्या लेखांचा अभ्यास करतां असें आढळून आलें कीं वर्तमान मराठी भाषा ज्ञानेश्वरी मराठी भाषेपासून सर्वस्वी निघालेली आहे. त्यावरून असा एक कामचलाऊ सिद्धान्त बांधला कीं वर्तमान मराठी भाषा तत्पूर्वकालीन ज्ञानेश्वरी मराठी, अपभ्रंश, महाराष्ट्री, संस्कृत व वैदिक ह्या भाषांपासून परंपरेने निघालेली आहे. नंतर ह्या कामचलाऊ सिद्धान्ताची परीक्षा करूं लागलों. ही परीक्षा करतांना पिशेल ह्या जर्मन गृहस्थाच्या प्राकृत व्याकरणाचा † मला बराच उपयोग झाला. ह्या गृहस्थानें त्याच्या वाचनांत आलेलीं एकोन एक प्राकृत रूपें सशास्त्र पद्धतीनें एका ठिकाणीं संकलित केलीं आहेत. ह्या ग्रंथांत दोन ठिकाणीं मला

---

* (उदा., “ पाटण येथील शक ११२८ तला मराठी शिलालेख.” प्रभात, वर्ष १, अं. ५).

† Grammatik der Prakrit Sprachen, इ. स. १९००.

दोष दिसून आला.........बाकी ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण लिहितांना, पिशेलच्या ग्रंथाचा मला चांगला उपयोग झाला....जर पिशेलचा ग्रंथ उपलब्ध नसता, तर वररुचि, कात्यायन, हेमचंद्र वगैरे प्राकृत वैयाकरणांच्या ग्रंथांचें व इतर उपलब्ध प्राकृत ग्रंथांचें व शिलालेखांचें पृथक्करण व संकलन करून पिशेलचेंच काम मला करावें लागतें. असा प्रयत्न करण्याचा प्रारंभहि मी केला होता. इतक्यांत पिशेलचा ग्रंथ प्रसिद्ध झाला. ह्या ग्रंथावरून जुन्या मराठीची आणि अपभ्रंश व महाराष्ट्री यांची सांगड उत्तमोत्तम लागते, असें दिसून आलें. तथापि ज्ञानेश्वरी मराठी भाषेचें व्याकरण लिहिल्यावर मला असें आढळून येऊं लागलें कीं केवळ पिशेलनें दिलेल्या अपभ्रंशांतील व महाराष्ट्रयादि प्राकृत भाषांतील रूपांवरून मराठींतील सर्व रूपांची सांगड लागत नाहीं. तेव्हां, वर्तमान मराठी रूपांची व जुन्या मराठी रूपांची तुलना मी पाणिनीय संस्कृताशीं करून काय निष्पन्न होतें तें पाहूं लागलों. तें पाहतांना असें प्रत्ययास आलें कीं मराठींतील एकोनएक लहान व मोठया लकबा भगवान पाणिनीच्या अष्टाध्यायींत नमूद आहेत, व पिशेलचें प्राकृत व्याकरण अनेक बाजूंनीं दोषग्रस्त आहे. पिशेलनें प्राकृत रूपें एका ठिकाणीं संकलित केलीं; परंतु पाणिनीय शास्त्र त्याला अवगत नसल्यामुळें, त्याच्या हातून प्राकृत रूपांचें वर्गीकरण यथास्थित झालें नाहीं....ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण लिहितांना मीं फक्त प्राकृत भाषांच्याकडे लक्ष दिलें. त्यानें एवढेंच झालें कीं मराठी व्याकरणांतील अत्यंत स्थूल अशा शेंकडों बाबींचे उगम कळले. परंतु शेंकडों स्थूल व सूक्ष्म बाबी तशा च अशोधित राहिल्या. त्यांचे उगम पाणिनीय शास्त्राच्या साहाय्यानें प्रस्तुत प्रबंधांत शोधून काढून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे." ( पृ. ८६-८७ )

वरील प्रदीर्घ उतारा राजवाडे यांनी दामल्यांच्या 'शास्त्रीय मराठी व्याकरण' या ग्रंथावर केलेल्या संशोधनात्मक टीकेतून उद्धृत केला आहे. त्यांच्या मनांतून हे विवेचन एकदा करावयाचेच होते. ते करण्यास दामल्यांचे व्याकरण निमित्तमात्र झाले, इतकेच. राजवाडे यांच्या वरील निवेदनावरून एक गोष्ट स्पष्ट होते की ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे ऐतिहासिक व्याकरण सिद्ध करताना त्यांची दृष्टी पाणिनीपर्यंत पोचलेली नसून अजून ती प्राकृतापर्यंतच मर्यादित होती. पुढे दामल्यांच्या व्याकरणाचे परीक्षण करण्याच्या निमित्ताने वर्तमान व प्राचीन मराठी रूपांची तुलना पाणिनीय संस्कृताशी करताना मराठीतील प्रत्येक बाबीचा धागा पाणिनीपर्यंत जाऊन पोचतो हे ध्यानात आल्यावर त्यांनी "मराठीतील एकोनएक लकबा भगवान पाणिनीच्या अष्टाध्यायींत नमूद आहेत" हा आपला आवडता सिद्धान्त बांधला.

## ऐतिहासिक व्युत्पत्तिकार

राजवाडे यांची वरील भूमिका लक्षात घेता त्यांना, त्यांच्याच भाषेत बोलावयाचे तर, ऐतिहासिक व्युत्पत्तिकार म्हणता येईल. ऐतिहासिक व्युत्पत्ती आणि काल्पनिक व्युत्पत्ती यांमधील फरक स्पष्ट करताना एका ठिकाणी ते म्हणतात :

" ऐतिहासिक व्युत्पत्तीची गति भूतावरून वर्तमानावर अनुलोम असते. यास्काच्या निरुक्तातील काल्पनिक व्युत्पत्तीप्रमाणे वर्तमानावरून भूतावर, अशी असेल, अशीहि असेल व अशीदेखील असेल, अशा प्रकारची धरसोडीची, प्रतिलोम, अनिश्चित व अकिंचित्कर नसते. ....यास्काच्या काळीं वेदभाषा ( व ) पूर्ववैदिक भाषा.... यांचा मागमूसही राहिला नव्हता. तेव्हा वैदिक शब्दांची अनुलोम व निश्चित व्युत्पत्ति ऊर्फ इतिहास देण्याला यास्काचार्यांना साधनच नव्हते. अशा कचाट्यात व्युत्पत्ति करण्याचे काम यास्काला करावयाचे असल्यामुळे एका च शब्दाच्या दहा दहा प्रतिलोम व्युत्पत्त्या करून असमाहित समाधान मानून स्वस्थ बसणे त्याला अपरिहार्य झाले, किंवा असाहि विकल्प करता येईल की, ज्या पूर्ववैदिक भाषेपासून वैदिकभाषा निघाली तीतून वैदिक शब्दांची व्युत्पत्ति लावण्याचे साधे व सरळ कृत्य यास्काला इतिहास-पद्धतीच्या अज्ञानास्तव माहीत नव्हते. काहीहि असो, मराठी व्युत्पत्तिकाराला ही यास्कीय दुर-वस्था ग्राशीत नाही. कारण मऱ्हाठीच्या पूर्वीच्या अपभ्रंश व महाराष्ट्री या दोन भाषा मराठी व्युत्पत्तिकाराला ऊर्फ शब्देतिहासकाराला ऊर्फ भाषेतिहासकाराला साहाय्य करण्यास अद्यापहि अवशिष्ट आहेत. शिवाय संस्कृत व वैदिक या सख्ख्या किंवा चुलत भाषाहि उपलब्ध आहेत. सबब प्रतिलोम अनिश्चित व्युत्पत्ति करण्याचे संकट मराठी भाषेच्या व्युत्पत्तिकारावर कोसळण्याचा संभवसुद्धा नाही. सुदैवानें ह्या बाबतीत यास्कापेक्षा मराठी भाषेच्या इतिहासकाराचा रस्ता सरळ आहे.... तत्रापि दुसऱ्या एका बाबीत मराठी निरुक्तकाराचा रस्ता अडचणींच्या घोर व निबिड अरण्यातून जातो. पूर्ववैदिक वाङ्मय बिलकुल नसल्यामुळे यास्काला ग्रंथवाचनाचे व वैदिक शब्दांचे पूर्ववैदिक पूर्वशब्द धुंडण्याचे श्रम नव्हते. मराठी निरुक्तकाराला महाराष्ट्री, संस्कृत व वैदिक ह्या तीन-चार भाषांतील अफाट वाङ्मयाच्या निबिड अरण्यातील कोणत्या महाराष्ट्री, संस्कृत किंवा वैदिक झुडुपापासून आपल्याजवळील कोणत्या मराठी धलप्या कातलेल्या आहेत याचा बिनचूक पत्ता लावावयाचा असतो. भलती धलपी भलत्याच झाडाची असावी, किंवा एकच धलपी अनेक झाडांची असावी, किंवा अनेक धलप्या एकच झाडाच्या असाव्यात, अशी त्रिविध शंका मराठी निरुक्तकाराला गांगरवून सोडते. यास्काप्रमाणे असेहि असेल, तसेहि असेल, असे धर-सोडीचे उत्तर देऊन भागत नाही. उत्तर निश्चित हवे असते, कारण ते शक्य आहे हे माहीत असते. ....तात्पर्य, मराठी निरुक्ति यास्कीय निरुक्तीसारखी स्याद्वादी नाही, अद्वैतवादी आहे." ( राजवाडे लेखसंग्रह, पृ. ९७–१०० ).

याच लेखात पुढे पाणिनीनेही कालाकडे म्हणजे इतिहासाकडे दुर्लक्ष केले होते, किंबहुना 'ऐतिहासिक दृष्टीला त्याने मुद्दाम मारून टाकिली होती' अशी विधाने राजवाड्यांनी केली आहेत. आता यास्काचे व्युत्पादन अनुलोम पद्धतीचे नसून प्रतिलोम पद्धतीचे आहे व यास्क काय किंवा पाणिनी काय, या दोघांनाही ऐतिहासिक दृष्टी नव्हती किंवा असली तरी त्यांनी तिचा उपयोग केला नाही, हे राजवाड्यांचे म्हणणे जरी विवाद्य असले तरी त्यांना स्वतःला ती दृष्टी होती व तिचा त्यांनी सर्वत्र अवलंब केला यात मात्र शंका नाही. किंबहुना यास्क व

पाणिनी यांच्याहून स्वतःचे निराळेपण ( आणि मोठेपणही ) दाखविण्याच्या हेतूने राजवाडे वरील विवेचन करीत आहेत असे वाटते.

## भाषेची कालकृत अवस्थान्तरे व ऐतिहासिक व्याकरण

भाषेची कालकृत अवस्थान्तरे कशी होतात ते सांगताना राजवाडे म्हणतात—

" जातिपरत्वानें भाषेंत अपभ्रंश उत्पन्न होतो आणि प्रांतपरत्वानें प्रांतिक भाषाभेद झालेले असतात. परंतु कालाचा भाषेवर जो संस्कार किंवा विकार होतो त्यानें अपभ्रंश किंवा भाषाभेद यांनून एकहि कार्य होत नाहीं. कालपरत्वें भाषेला वृद्धत्व, तारुण्य, बाल्य अशा भिन्न अवस्था येतात; परंतु तिचें स्वत्व कांहीं नाहींसें होत नाहीं. भाषा तीच; अवस्थान्तरें मात्र, निरनिराळीं. शक ९०५ तील चामुंडरायाची* मराठी भाषा, शक १०५१ तील सोमेश्वराची† मराठी भाषा, शक ११२८ तील चंगदेवाची‡ मराठी भाषा, शक १२१२ तील ज्ञानदेवाची मराठी भाषा, शक १५०० तील एकनाथाची मराठी भाषा किंवा शक १८०० तील विष्णुशास्त्र्यांची भाषा पाहिली असतां भाषा मराठीच आहे हें अशिक्षित मनुष्यहि ओळखूं शकतो. इतकेंच कीं, कांहीं रूपें बरींच जुनीं आहेत, असें त्याच्या दृष्टयुत्पत्तीस येतें. व्यक्ति तीच; वस्त्रें तेवढीं निराळीं. पुरुष एकच; बाल्यतारुण्यवार्द्धक्यादि अवस्थान्तरें मात्र अनेक....हीं अवस्थान्तरें व त्यांचें ज्ञान वर्तमान नागर मराठी भाषेच्या व्युत्पत्तीला वैशद्य आणण्यास अत्यंत उपयुक्त आहेत. " ( ज्ञा. प्रस्तावना, परि. ●३ )

भाषेची ही कालकृत अवस्थान्तरें म्हणजे तिचे ऐतिहासिक व्याकरण रचण्याची मुख्य साधने होत. या साधनांच्या आधाराने व त्यांच्या अभ्यासाने भाषेचे ऐतिहासिक व्याकरण कसे सिद्ध करता येते ते त्यांनी पुढे सांगितले आहे.

राजवाड्यांच्या मते " शिष्ट मराठी भाषेतील स्वर, वर्ण, शब्द, प्रत्यय व अव्ययें ह्यांची आदिपासून, म्हणजे मराठी भाषेच्या उत्पत्तीपासून, आतांपर्यंत रूपें कसकशीं होत आहेत, ह्याचें उद्‌घाटन शिष्ट मराठीच्या ऐतिहासिक व्याकरणांत केलेलें असतें. ह्या व्याकरणालाच मराठी भाषेची व्युत्पत्ति, शब्दसिद्धि, निरुक्ति वगैरे नामान्तरें आहेत. " (ज्ञा. प्रस्तावना, परि. ●१२). अशा व्याकरणाच्या साधनांविषयी ते पुढे म्हणतात :

" कोणत्याहि भाषेचें ऐतिहासिक व्याकरण तयार व्हावयाला, त्या भाषेंतील आदिपासून आतांपर्यंत बराच, निदान कामापुरता तरी, ग्रंथसमूह किंवा लेखसोपान सांपडला पाहिजे

* श्रवणबेळगोळ शिलालेख. ( हा लेख शके ९०५ चा नसून त्यानंतर सुमारे सवाशे वर्षांनी कोरलेला असावा असे डॉ. हुल्ट्झ इ. चे मत आहे. )

† ' अभिलषितार्थचिंतामणि ' किंवा ' मानसोल्लास ' ग्रंथातील मराठी पदे.

‡ पळसदेव शिलालेख, शके १०७९.

त्याच्या अभावीं व्युत्पत्तीचें काम केवळ कल्पनेवर चालेल. तसेंच, नुसती लेखपरंपरा सांपडून म्हणण्यासारखें कार्य होत नाहीं; तर, ती लेखपरंपरा त्या त्या कालची अस्सल पाहिजे. अशी लेखपरंपरा व ग्रंथसंपत्ति ज्या भाषेची उपलब्ध होते, तिची निरुक्ति, किंवा व्युत्पत्ति, किंवा ऐतिहासिक व्याकृति सुकर व निश्चित होते. " ( ज्ञा. प्रस्तावना, परि. ●१२ )

अशा प्रकारे अस्सल साधनांच्या आधारे तयार केलेले मराठी भाषेचे ऐतिहासिक व्याकरण अद्याप रचावयाचे आहे असे म्हणून, ' त्या रचनेच्या साहाय्यार्थ ' ज्ञानेश्वरीची प्रस्तुत आवृत्ति आपण काढीत आहो असे राजवाडे यांनी म्हटले आहे. अशा प्रकारचे प्रयत्न यापूर्वी बीम्स * व होर्न्ले† आणि अल्पस्वल्प प्रमाणात कृष्णशास्त्री गोडबोले यांनी करून पाहिले, परंतु ' प्राचीन ग्रंथसंग्रहाच्या अभावी ते लंगडे पडले ' असाही आपला अभिप्राय त्यांनी दिला आहे.

## प्रस्तुत व्याकरणाचे स्वरूप व त्याच्या मर्यादा

मराठी भाषेचे ऐतिहासिक व्याकरण लिहिण्याचा विचार राजवाडे यांच्या मनात पूर्वीपासून होताच. ती प्रत्यक्षात उतरविण्याची संधी त्यांना बीड-पाटांगण येथे मिळालेल्या ' ज्ञानेश्वरी 'च्या प्राचीन पोथीने आणून दिली. अर्थात् त्यांचे प्रस्तुत व्याकरण 'ज्ञानेश्वरी'च्या त्या पोथीवर आधारलेले आहे. तसेच ते ऐतिहासिक व्याकरण असले तरी ते समग्र मराठी भाषेचे ऐतिहासिक व्याकरण नसून ज्ञानेश्वरीपुरते मर्यादित आहे. तत्कालीन ताम्र–शिला–लेखांचा त्यांनी क्वचित् आधार घेतला असला तरी तो तितक्यापुरताच आहे. तसेच त्या काळातील इतर ग्रांथिक साहित्यही त्यांनी विचारात घेतलेले नाही. महानुभावपंथीय साहित्याचा तर त्यात कोठे उल्लेखही नाही. अर्थात् त्यावेळी ते विशेष ज्ञातही नव्हते. सारांश, राजवाडे यांच्या प्रस्तुत व्याकरणाचे ऐतिहासिक स्वरूप व महत्त्व मान्य करून सुद्धा त्याच्या मर्यादा लक्षात ठेवल्या पाहिजेत. ते यादवकालातील एका विशिष्ट ग्रंथातील भाषेचे व तेही त्याच्या एका विशिष्ट हस्तलिखित पोथीवर आधारलेले व्याकरण आहे. साहजिकच त्याचा व त्याच्या या आधारभूत पोथीचा संबंध पाहणे अवश्य आहे; कारण ज्ञानेश्वरीची ही पोथी म्हणजे त्या व्याकरणाचा प्राण असल्याप्रमाणे आहे. तिचे संपादन करताना राजवाडे यांनी जी शताधिक पृष्ठांची सविस्तर ' प्रस्तावना ' लिहिली ती या दृष्टीने अभ्यसनीय आहे. त्या प्रस्तावनेत त्यांनी प्रारंभी व्याकरणाची व्याख्या ‡ करून कोणत्याही भाषेचे व्याकरण स्थल, काल व लोक या उपाधींनी

* Comparative Grammar of Modern Indo-Aryan Languages, Vols. I, II, III; 1872–79.

† Grammar of Gaudian Languages, 1880.

‡ " विवक्षित लोक, विवक्षित भाषा, विवक्षित स्थलीं व विवक्षित कालीं कोणत्या पद्धतीनें बोलतात व ( लिहिणें माहित असल्यास ) लिहितात, हें ज्या नियमसरणीनें म्हणजे शास्त्राने स्पष्ट केलेलें असतें, त्यास त्या भाषेचें तत्स्थलीन, तत्कालीन व तल्लोकीय व्याकरण म्हणतात. " ( ज्ञा. प्रस्तावना, परि. ●१ )

कसे व्याप्त असते ते दाखवून त्यापैकी ' शिष्ट मराठीची ऐतिहासिक व्याकरणक्षमता ' स्पष्ट केली आहे. § अशा प्रकारच्या व्याकरणासाठी लागणारे एक जुने व अस्सल साधन ज्ञानेश्वरीच्या पाटांगणप्रतीच्या रूपाने शके १८२५ त ( म्हणजे इ. स. १९०३ ) राजवाड्यांच्या हाती आले व ते त्यांनी इ. स. १९०९ मध्ये ग्रंथरूपाने प्रसिद्ध केले. त्यांच्या मते ज्ञानेश्वरीचा ही पोथी इ. स. १२९० पासून १३१८ पर्यंतच्या काळात लिहिलेली असून तिच्यातील भाषा इ. स. १२९० तील, म्हणजे प्रत्यक्ष ज्ञानेश्वरांच्या वेळची, निर्भेळ नागरी मराठी भाषा आहे. या पोथीचे वर्णन करून राजवाडे म्हणतात :

" ह्या पोथींतील भाषा-जी ज्ञानेश्वर बोलला, जी ज्ञानेश्वरानें नेवाशांतील शिलेवर लिहिली व जी शके १२१२ त नागर मराठे बोलत-तीच साक्षात् आहे. ( पोथीचा ) कागद भिकार असता, अक्षर गिचमीड असतें,....आणि भाषा जर ह्या पोथींतल्याप्रमाणें साक्षात् शक १२१२ तील नागर मराठी असती, तरी देखील, ह्या एकाच असामान्य गुणाच्या बळावर, अशा पोथीचा सकौतुक आदर करणें भाग पडलें असतें.....पंढरपूर ‡ येथील शक ११९५ तील शिलालेखांतल्यासारखी किंवा पाटण † येथील शक ११२८ तील शिलालेखांतल्यासारखी भाषा ह्या पोथीची आहे. तेव्हां....निव्वळ भाषेच्या स्वरूपावरून ही पोथी थेट ज्ञानेश्वरांच्या वेळची आहे, असें तज्ज्ञांना सहज ताडतां आलें असतें....ही पोथी म्हणजे मराठी भाषेंतील कागदावर लिहिलेला अत्यंत जुना असा पहिला लेख होय. सुदैव कीं, हा लेख पाठपोट ६४४ पृष्ठें आहे व सबंध शाबूत आहे. " ( ज्ञा. ची प्रस्तावना, परि. ●५३ )

याप्रमाणे कमीत कमी ओवीसंख्या असलेली, प्रक्षिप्त ओव्या नसलेली, शुद्ध पाठ देणारी व फारसी शब्दांचा वापर चुकूनही न करणारी अशी ही ज्ञानेश्वरीची प्राचीनतम उपलब्ध प्रत ' मराठी भाषेच्या व्युत्पत्तीला, व्याकृतीला व इतिहासाला अत्यंत उपयोगी पडेल असा भरंवसा ' वाटल्याने राजवाडे यांनी तिचे संपादन-प्रकाशन मोठया उत्साहाने केले व तिला आधारभूत करून ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे व्याकरणही रचले.

## विश्वसनीय साधन

या व्याकरणासाठी राजवाडे यांनी स्वीकारलेले स्व-संशोधित साधन, म्हणजेच त्यांना बीड-पाटांगण येथे मिळालेली ज्ञानेश्वरीची हस्तलिखित प्रत, पुष्कळच विश्वसनीय आहे. ही प्रत राजवाडे म्हणतात त्याप्रमाणे ज्ञानेश्वरीच्या निर्मितीनंतर-पांचपंचवीस वर्षांत लिहिलेली असेल

---

§ ( ज्ञानेश्वरी-प्रस्तावना परि. ●१-८ ). " कारण, गेल्या सातशे वर्षांत प्रौढ व ललित ग्रंथरचना जेवढी म्हणून झाली तेवढी सर्व शिष्ट मराठींत झाली आहे. " परि. ●७.

‡ पंढरपूर येथील चौऱ्यायशीचा लेख ('प्राचीन मराठी कोरीव लेख', सं. तुळपुळे, क्र. ३४)

† पाटण येथील यादव सिंघणाचा शिलालेख ( उपर्युक्त, क्र. २१ )

वा नसेल; पण ती एकनाथ-पूर्व आहे हे निश्चित, व ज्ञानेश्वरांनंतर लौकरच, म्हणजे शकवर्षांच्या तेराव्या शतकात केव्हातरी तयार झालेली असणे संभवनीय आहे. या पोथीवर असे म्हणण्यापेक्षा § तिच्या मुद्रित प्रतीवर आक्षेप पुष्कळ घेतले गेले व त्यांपैकी काहींचे निरसनही राजवाड्यांनी एक स्वतंत्र लेख ¶ लिहून केले. त्याबरोबर काही विद्वानांनी राजवाडी ज्ञानेश्वरीचे प्राचीनत्व मान्य केले इतकेच नव्हे तर ते भाषाहष्ट्या सिद्ध करून दाखविण्याचा प्रयत्न केला. अशा विद्वानांत प्रसिद्ध संस्कृतज्ञ कै. गो. कृ. मोडकशास्त्री * व महानुभाव-साहित्य-संशोधक कै. ह. ना. नेने ‡ हे दोघेजण प्रमुख होते. त्यांनी स्वतंत्र लेख लिहून राजवाडी ज्ञानेश्वरीचे पुराणत्व तिच्यात आढळणाऱ्या प्राचीन शब्दरूपांच्या आधारे सप्रमाण सिद्ध केले. त्यातही नेने यांनी त्या रूपांची ज्ञानेश्वरीच्या समकालीन महानुभावीय ग्रंथांतील रूपांशी तुलना करून त्या दोहींचे प्राचीनत्व तौलनिक अभ्यासाने सिद्ध करण्याचा प्रयत्न केला, तो विशेष महत्त्वाचा म्हटला पाहिजे. उदाहरणार्थ, राजवाडी ज्ञानेश्वरीतील उनि किंवा औनि प्रत्ययान्त धातुसाधितांचा ‡‡ उलगडा महानुभावांच्या आद्य चरित्रग्रंथातील तशा प्रकारच्या रूपांवरून † झाला व ही रूपे भूतकालाप्रमाणे कधीकधी भविष्यकालही दर्शवितात हे कळले. मूळ राजवाडी प्रत उपलब्ध नसल्यामुळे तिच्या अस्तित्वाविषयीही लोक शंका घेऊ लागले होते व ही शंका इतक्या थराला गेली होती की मुळात काहीही नसताना राजवाड्यांनी ज्ञानेश्वरीच्या मुकुंदराजी प्रतीची ही सृष्टी शून्यातून, आपल्या प्रतिभेच्या बळावर उभी केली व तिचा अखेरपर्यंत पाठपुरावा केला असेही कोणी म्हणू लागले. संपूर्ण ज्ञानेश्वरी अथपासून इतिपर्यंत स्वतःच्या कल्पनाशक्तीने भाषेच्या तत्कालीन स्वरूपात नव्याने लिहून काढणे हा राजवाड्यांच्या असामान्य प्रतिभेचा एका दृष्टीने गौरव होता व हे अशक्यप्राय कार्य करण्याची धमकही त्यांच्यात होती, हे खरे; परंतु वस्तुस्थिती तशी नव्हती. ज्ञानेश्वरीची एक फार जुनी अशी प्रत त्यांच्या हाती खरोखरच आली होती याचा प्रत्यंतर पुरावा कालान्तराने उपलब्ध झाल्यावर वरील सर्व शंका आपोआपच दूर झाल्या. हा प्रत्यंतर पुरावा म्हणजे कै. माडगावकर यांना त्यांची 'ज्ञानदेवी' प्रसिद्ध झाल्यानंतर मिळालेली ज्ञानेश्वरीची प्रत. या प्रतीचे

§ कारण मूळ पोथी राजवाड्यांव्यतिरिक्त फार थोड्या जणांनी पाहिली होती व पुढे तर ती राजवाड्यांनी उद्वेगाच्या भरात नष्ट केली असा प्रवाद आहे.

¶ "माझी ज्ञानेश्वरी व कित्येक शंकाकार" (राजवाडे लेखसंग्रह, भाग ३, पृ. २४-३६).

* भाइसंमं. त्रैमासिक, १५.१; १६.१.

‡ भाइसंमं. त्रैमासिक, १६.१; संशोधनलेखसंग्रह, भा. १.

‡‡ उदा., "आम्ही पूर्णकाम **होउनि** । जरि आत्मस्थिती **राहुनि**" (ज्ञा. ३.६४). यांतील पहिले रूप भूतकालाचे व दुसरे भविष्यकालाचे वाचक आहे.

† उदा., "आम्ही बांधौनि ( = बांधूं ) : आम्ही दोहौनि ( = दोहूं )" लीळाचरित्र-एकांक, ३८.

राजवाडी प्रतीशी ( अर्थात् मुद्रित प्रतीशी ) विलक्षण साम्य असून ती त्या प्रतीच्या उपलब्धि-स्थानी, म्हणजे बीड–पाटोगण येथेच मिळाली. तिची माडगावकर यांनी तेलकागदावर करून ठेवलेली अस्सल प्रत प्रा. न. र. फाटक यांच्या संग्रही होती व ती पाहिल्यावर तिची 'जुळी बहीण' जी राजवाडे–प्रत तिच्या अस्तित्वाविषयी शंका उरली नाही. म्हणूनच महाराष्ट्रराज्य-शासनाने इ. स. १९५६ मध्ये नेमलेल्या ज्ञानेश्वरी–संपादन समितीनेही राजवाडे–प्रत प्रमाण समजून तिचीच सुधारलेली आवृत्ती काढण्याचे अंगीकारले व त्याप्रमाणे ती सिद्ध करून इ. स. १९६१ मध्ये प्रसिद्ध केली. तात्पर्य, राजवाडे यांनी आपल्या व्याकरणासाठी आधारभूत केलेली ज्ञानेश्वरीची प्रत विश्वसनीय असून मराठी भाषेचे ऐतिहासिक व्याकरण सिद्ध करण्याच्या कामी ती विशेष उपयुक्त आहे याविषयी आता सर्वसाधारणपणे मतैक्य दिसते.

## भाषेच्या जुनेपणाची काही गमके

राजवाडे-संपादित ज्ञानेश्वरीच्या प्रतीत ती भाषादृष्ट्या जुनी, म्हणजे एकनाथपूर्वकालीन, असल्याची काही गमके आढळतात ती अशी :

( १ ) ज्यांतील पूरक नाम, सर्वनाम किंवा विशेषण आँ-प्रत्ययसाधित तृतीयान्त असते असा विशिष्ट भावे प्रयोग; उदाहरणार्थ,

जेणें **कृतकार्यां** होइजे ( ज्ञा. १.२५ ); तुवां **शरीरपरां** नोहावें ( ३.१८५ ); अमरीं **भाटां** होइजे ( ६.४५४ ); तेणें भलतिये **जातिचेयां** होइजे ( ८.९ ); तिहिं **मनुष्यां** होइजे। मृत्युलोकिं ( १४.२७० ); इ.

वरील प्रकारच्या रचनेसंबंधी राजवाडे यांचे म्हणणे असे, की 'जेणें कृतकार्यां होइजे' ही ज्ञानेश्वरीतील रचना 'येन कृतकार्येण भूयेत' या संस्कृत रचनेचा अनुवाद असून भावे प्रयोगाच्या मूळ संस्कृत रचनेला धरून मराठीतही उद्देश्य व पूरक ही दोन्ही तृतीयान्त आहेत याविरुद्ध मोडकशास्त्री यांचे म्हणणे असे, की ज्ञानेश्वरी–मराठीत भावे प्रयोगातील पूरक आँ–प्रत्ययान्त प्रथमा असते व अशा रूपांना तृतीया गणणे हे चिंत्य होय. मोडकशास्त्र्यांना उत्तर श्री. नेने यांनी दिले असून त्यांनी ज्ञानेश्वरीतील वरील रूपांचे तृतीयाऽत्व त्यांची समकालीन अशा महानुभावीय काव्यांतील रूपांशी तुलना करून प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला आहे. प्राचीन मराठीत एँ किंवा एनि या प्रत्ययांनी सिद्ध होणाऱ्या तृतीयेच्या रूपांबरोबर आँ–प्रत्ययान्त तृतीयाही आढळते ( उदा; डोळां, वेगां, श्रोतां, नवरसां, इ० ) हे दाखवून त्यांनी त्यांचे आँ–कारान्त क्रियाविशेषणां ( उदा; अवचितां, निवान्तां; उगेयां; इ० ) पासून भिन्नत्व स्पष्ट केले आहे. सारांश, मोडक–नेने‡ वादाचा विषय वरील भावे प्रयोगरचनेतील पूरक शब्दाची

‡ हा वाद 'राजवाडे–ज्ञानेश्वरीचे पुराणत्व' या मथळ्याखाली भा. इ. सं. मं. च्या त्रैमासिकात ( १५.१; १६.१ ) आला आहे.

रूपे प्रथमान्त मानावी की तृतीयान्त मानावी इतकाच आहे. ही रूपे सदा ऑं–कारान्त असतात व भाषेच्या जुनेपणाची ती एक अचूक खूण होय याविषयी त्या दोघांचे राजवाड्यांशी मतैक्य आहे. ( उत्तरकालीन मराठीत ही रूपे अ–कारान्त झाली; उदा०, 'तिहिं मनुष्यां होइजे' १४.२७०, या राजवाडे–प्रतीतील पाठाच्या जागीं बंकटीयादि प्रतींत 'मनुष्य' असे रूप आढळते. हे भाषेचे अर्वाचीकरण होय. )

( २ ) **काही विभक्तिरूपें** :—प्रथमपुरुषी सर्वनामाची तृतीयेची मियाँ व म्याँ अशीं दोन्ही रूपे मराठींत कालभेदाने आढळतात. पैकी राजवाडे–प्रतींत 'मियाँ' व बंकट–प्रतींत 'म्याँ' रूप येतें. अर्थात् भाषेचे जुनेपण 'मियाँ' या रूपात दिसते; कारण सं. मया या रूपाला तेच अधिक जवळ आहे. तसेच तृतीयेचा 'ने' हा आधुनिक प्रत्यय बंकट वगैरेंच्या प्रतींत असला तरी राजवाडे–प्रतीत तो नाही. ( उदा., 'मनू आपण अनुष्ठिली । मग इक्ष्वाकूसी उपदेशिली', ४.१७, यातील 'मनू' हे तृतीयेचेच पण जुने रूप आहे. )

( ३ ) **सामान्यरूपाचा अभाव** :—ज्ञानेश्वरीच्या काळातील मराठीत नामाच्या किंवा सर्वनामाच्या सामान्यरूपाविषयी अनियमितपणा बराच होता. नामाला विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय लागण्यापूर्वी कधी त्याचे सामान्यरूप होई, कधी ते होत नसे, तर कधी विभक्ति-रूपालाच शब्दयोगी लागे. हे तिन्ही प्रकार, विशेषतः तिसरा, ज्ञानेश्वरीत आढळतात व आढळले पाहिजेत. त्यांतील एखादा न आढळला तर तेवढ्यापुरती ती प्रत विश्वसनीय नव्हे. या दृष्टीने मोडकांनी दिलेले 'तुआंविण' हे राजवाडे–प्रतीतील उदाहरण ( १.२३४ ) लक्षणीय आहे. येथे 'विण' या शब्दयोगी अव्ययाचे पूर्वी 'तुआँ' हे तृतीयेचे रूप आहे. पण तेच माडगांवकर, बंकट वगैरेंच्या प्रतींतून 'तुजविण' असे सामान्यरूपयुक्त रूप येते. म्हणजे येथेही भाषेचे अर्वाचीकरण झाले.

( ४ ) '**मी बोलिलाँ**' ( २.५२ ) यासारखी ऑं–प्रत्ययान्त प्रथमपुरुषी कर्तरिरूपे, उत्तरकालीन प्रतींतून ती 'मी बोलिलों' अशी अर्वाचीन होतात. ज्ञानेश्वरकालीन महानुभाव–ग्रंथांतूनही वरीलप्रमाणे ऑंकारान्त रूपें आहेत ( उदा., 'मी हाटवटीए होउनि **आलाँ** :' गो. चरित्र, २७ ).

( ५ ) 'आकाशा होउनि वाड' ( १३.११३५ ) याचे पाठान्तर बंकट इ.च्या प्रतींत 'आकाशाहूनि वाड' असे होते. यावरून मोडकशास्त्री म्हणतात की राजवाडे–प्रतीच्या काळी 'हून' हा पंचमीचा प्रत्यय घडला जात होता. त्यांच्या या म्हणण्यास ज्ञानेश्वरकालीन महानुभावीय ग्रंथांतून आधार मिळतो ( उदा., 'गुंडोचां माथां होउनि प्रकासु नीगतु असे :' गो. चरित्र, ४ ).

( ६ ) तियें मुकुटीं कुसुमें सुगंधें । **शोभते** भलीं ॥' ( १.१८ ), 'इयें अशेषेंही भूतें । पैं माझां ठाइं **बिंबते** ।' ( ९.६६ ), 'आता दुःखकल्लोळीं **झळंबते** । तिन्हीं भुवनें ।' ( ११.३१४ ) यांसारख्या रूपांचे अस्तित्व. वरील जाड ठशातील 'शोभते, बिंबते व झळंबते ही

रूपे राजवाड्यांच्या मते वर्तमाने लट्‌ची आत्मनेपदी आहेत. त्यांचे व्युत्पादन राजवाडे पुढील-प्रमाणे करतात :—

१. ( सं. ) रत्नं शोभते = ( महा. ) रअणँ सोमए = ( ज्ञा. म. ) रत्न शोभे.

२. ( सं. ) रत्नानि शोभन्ते = ( महा. ) रअणाइँ शोभन्ते = ( ज्ञा. म.) रत्नें शोभते/तें.

ही रूपे प्रस्तुत काळी, म्हणजे सध्या, वर्तमान कृदन्ताची ' शोभते ' वगैरे जी एकवचनी रूपे होतात त्यांसारखी दिसतात व त्यामुळेच राजवाडे–ज्ञानेश्वरीचे एक टीकाकार शं. ब. सहस्रबुद्धे ¶ यांनी " नपुंसकलिंगी बहुवचनी कर्त्याला एकवचनी क्रियापद ज्ञानेश्वर लावी " असे म्हणून ज्ञानेश्वरीच्या भाषेवर घेडगुजरीपणाचा आक्षेप घेतला होता. त्याला सविस्तर उत्तर राज-वाड्यांनी एक स्वतंत्र लेख † लिहून दिले. त्यात त्यांनी वरील रूपांचे प्राचीनत्व दाखवून ती आत्मनेपदी रूपे होत असे स्पष्टपणे म्हटले आहे. पण अशोकाच्या शिलालेखात अंशतः दिसून त्यानंतर लुप्त झालेले आत्मनेपद एकदम ज्ञानेश्वरीत कसे उपटले याचे उत्तर राजवाड्यांनी दिलेले नाही.त्यामुळे वरील रूपे आत्मनेपदी न मानता ती अनियमित मानावी लागतात.

( ७ ) राजवाडे–प्रतीतील पुढील शब्दांची कंसात दिलेली रूपे एकनाथोत्तरकालीन प्रतींतून आढळता :—

कलभा < सं. कलह ( कळंभा, ६.१६ ); एकएकातें ( एकमेकातें, १.१६३ ); धूम-रजाची पिंजरी ( धुम्ररजाची–, ९.१२४ ); घरणी ( गृहिणी, १४.८६ ); पांचाखरी ( पंचाक्षरी, २.८५ ); अवस्वरीं ( अवसरीं, ६.१५२ ); इ. शब्दरूपांचे हे जुनेपण राजवाडे–प्रतीच्या विश्वसनीयतेचे एक प्रमाण आहे.

## आर्य-भारतीय पद्धतीने रचिलेले व्याकरण

राजवाडे आपल्या व्याकरणाच्या नवमाह्निकाच्या शेवटीं म्हणतात :

" दादोबानें आपलें व्याकरण इंग्रजी व्याकरणावरून रचिलें आहे. संस्कृत, महाराष्ट्री व अपभ्रंश ह्यांच्या व्याकरणावरूनच मराठी व्याकरण रचिलें पाहिजे. इंग्रजी डेली प्रेयर्‌मधील प्रयोग संध्येंतील न्यासांना लावण्यासारखेंच दादोबाचें कृत्य होतें. पाणिनीसारखा सूर्य सोडून, इंग्रजी कंदील घेतल्यामुळें दादोबा जागोजागीं उपहसनीय झाला आहे. "

राजवाड्यांची वरील टीका प्रखर असली तरी ती पूर्णतः समुचित नाही. कारण ते म्हणतात त्याप्रमाणे दादोबाने आपले व्याकरण इंग्रजी व्याकरणावरून रचिले हे खरे असले तरी त्यामागे तशीच सबळ कारणे होती. एक तर दादोबांची ही कृती इ. स. १८३६ मधील, म्हणजे अव्वल इंग्रजीच्या काळातील असून त्यावेळी मराठीच्या ऐतिहासिक

---

¶ विविधज्ञानविस्तार, जानेवारी १९११.

† माझी ज्ञानेश्वरी व कित्येक शंकाकार, पृ. २८–३०. ( राजवाडे लेखसंग्रह, भा. ३ ).

व्याकरणाच्या साधनांचा अभावच होता म्हटल्यास चालेल. त्यावेळी भाषेचे वर्णनात्मक व्याकरणच शक्य होते व ते रचण्याचे काम दादोबांनी पुष्कळ बरे केले. दुसरी गोष्ट म्हणजे त्यांनी इंग्रजीच्या व्याकरणपद्धतीचे अंधानुकरण केले नसून अवश्य तेथेच तिचा वापर केला आहे. नामविभक्तिप्रकरणी त्यांना नामाच्या आठ विभक्त्यांची नांवे इंग्रजींतीलप्रमाणें Nominative, Accusative, Instrumental इ. अशी अर्थसूचक ठेवता आली असती; पण तसे न करता त्यांनी ती पाणिनीय पद्धतीप्रमाणे प्रथमा, द्वितीया, तृतीया इ अशी क्रमवाचकच ठेवलीं आहेत. त्यांनी फरक केला व परिभाषा इंग्रजी व्याकरणाच्या वळणावर नेली ती आख्यातविभक्तीच्या बाबतीत नेली. तेथे मात्र पाणिनीय लकारांची नावे न वापरता त्यांनी वर्तमान, भूत, भविष्य इ. इंग्रजी परिभाषाच वापरली. पण चिं. वि. वैद्य * यांनी दाखविल्याप्रमाणे मराठीतील क्रियापद-प्रक्रिया संस्कृताहून इतकी भिन्न व इंग्रजीशी इतकी जुळती आहे की ती स्पष्ट करण्यासाठी दादोबांनी संस्कृत परिभाषा सोडून इंग्रजी व्याकरणाचा आधार घेतला हे सरळच झाले. त्याबद्दल त्यांना बोल लावणे योग्य नाहीं. उलट राजवाड्यांनी मात्र आख्यातप्रकरणी पाणिनीय दशविध लकारांच्या चौकटीचा अवलंब करून त्या चौकटीत ज्ञानेश्वरीतील क्रियापदरूपांना हट्टाने बसविण्याचा प्रयत्न केला. त्यांचा हा प्रयत्न अनेक ठिकाणी फसल्याचे आपणास दिसून येईल. उदाहरणार्थ, लङ् सारखा भूतकाळ किंवा लुट् किंवा लृट् सारखे भविष्यकाळ ते ज्ञानेश्वरी-मराठीवर लादूं पाहतात, पण प्रत्यक्षात ते तसे नसल्याने त्यांनी स्वीकारलेली ही चौकट त्या ठिकाणी ढिली पडते. शिवाय, वैद्यांनी दाखविण्याप्रमाणे, दादोबा व डॉ. भांडारकर यांनी रूढ केलेल्या काही प्रघातांस स्वतः राजवाडेही प्रसंगी बळी पडले आहेत. आख्यातविभक्तीतील प्रथम पुरुष, द्वितीया पुरुष व उत्तम पुरुष ही संस्कृतातील पुरुषांची नावे व क्रम सोडून उलटा क्रम व निराळी नावे दादोबांनी प्रथम इंग्रजी धर्तीवर दिली आणि डॉ. भांडारकरांनीं आपल्या संस्कृतच्या पाठ्यपुस्तकांत तीच पद्धत स्वीकारली. यामुळे ती इतकी रूढ झाली की पाणिनीय पद्धतीचा आग्रहाने अवलंब करणाऱ्या राजवाड्यांनी सुद्धा पुरुषांची नावे जरी जुनीच वापरली तरी त्यांचा जुना क्रम त्यानी सोडला व सप्तमाह्निकात सर्वत्र उत्तम पुरुष, मध्यम पुरुष व प्रथम पुरुष या दादोबा-प्रणीत इंग्रजी क्रमानें ज्ञानेश्वरी-मराठीच्या आख्यातविभक्तीची पाहणी केली. त्यांचे हे करणे गैर झाले असे नव्हे; पण रूढीचा किंवा सवयीचा प्रभाव किती असतो त्याचे हे एक गमक आहे, इतकेच. व्याकरणाची पद्धती किंवा परिभाषा यांना तसेच पाहिल्यास विशेष महत्त्व नाही. हा व्यावहारिक सोयीचा भाग आहे व ती सोय जी चांगल्या रीतीने पाहील ती पद्धती, ती परिभाषा चांगली. अर्थात् राजवाड्यांनी पाणिनीय परिभाषेचा किंवा संस्कृत व्याकरणपद्धतीचा अवलंब केला एवढ्यामुळे त्यांचे ज्ञानेश्वरीचे व्याकरण श्रेष्ठ वा कनिष्ठ ठरत नाहीं.

* निबंध आणि भाषणे, पृ. १३४.

## मराठीचे ' संस्कृत ' व्याकरण

मराठी भाषा अपभ्रंशोत्पन्न आहे असे राजवाडे म्हणत असले तरी ज्ञानेश्वरीचे प्रस्तुत व्याकरण सिद्ध करताना त्यांचे मुख्य लक्ष प्राकृत–अपभ्रंशावर नसून ते संस्कृतावर, अर्थात् पाणिनीय संस्कृतावर व वैदिक भाषेवर आहे हे पदोपदीं दिसते. त्यांच्या या सांस्कृतिकतेला, म्हणजे संस्कृताकडील प्रवृत्तीला, प्रारंभ प्रकरणांच्या नामकरणापासूनच होतो. व्याकरणशास्त्राच्या संस्कृत पद्धतीस अनुसरून त्यांनी आपल्या ग्रंथातील प्रत्येक प्रकरणाला ' आन्हिक ' म्हटले आहे. ' आदेशेतिहास ' (वर्णविकार) व निपातेतिहास ( अव्यये ) ही प्रकरणांची नावेही त्यांचे संस्कृतपरिभाषाप्रेमच दाखवितात. ' अजन्त ' (म्ह. स्वरान्त) शब्द व ' हलन्त ' ( म्हणजे हृकारान्त) शब्द ही परिभाषाही त्याच नमुन्याची आहे. ती विशेष जाणवते ती क्रियापदांचे भिन्न काळ व अर्थ यांच्या नामकरणात. तेथे त्यांनी दादोबांनी रूढ केलेली परिभाषा न वापरता लट्, लिट्, लोट् इ. दशविध ल–कारांची पाणिनीय परिभाषा निरपवादरीत्या वापरली आहे. त्यामुळे त्यांचे हे व्याकरण पाणिनीय परिभाषेशी परिचय नसणाऱ्या वाचकाला दुर्गम होते. ऐतिहासिक दृष्ट्या पहाता पाणिनीय परिभाषाच योग्य आहे यात शंका नाही; कारण चिं. वि. वैद्य † म्हणतात त्याप्रमाणे ' या परिभाषेने ऐतिहासिक संबंध कायम राहून तो आपल्या डोळ्यांसमोर सदोदित असतो. ' पण तेवढ्यामुळे क्रियापदांचे काळ व अर्थ यांची वाचक परिभाषा इंग्रजीच्या व्याकरणावरून घेतल्याबद्दल राजवाड्यांनी दादोबांना दोष दिला आहे ते मात्र बरोबर नाही. कारण वैद्यांनी म्हटल्याप्रमाणे ' मराठीतील क्रियापदाची वाढ संस्कृत, म्हणजे मूलभूत रूपापासून इतकी भिन्न झाली आहे की, तिचा स्वतंत्र विचार केल्यास हरकत पडणार नाहीं. ' ही वाढ पुष्कळ अंशीं इंग्रजी भाषेतील क्रियापदांच्या प्रक्रियेशी जुळणारी असल्याने तिचे स्वरूप विशद करताना दादोबांनी इंग्रजीतील परिभाषेचा अवलंब केला हे साहजिकच झाले. राजवाडे मात्र त्यांच्या स्वभावानुसार पाणिनीय परिभाषा कटाक्षाने योजतात व तिचा पुरस्कारही करतात.

परंतु राजवाड्यांची ही संस्कृत-प्रवृत्ती परिभाषेपुरती मर्यादित राहिलेली नाही. तिने त्यांच्या या व्याकरणाचा गाभाच व्यापला आहे. ज्ञानेश्वरीच्या भाषेची प्रत्येक बाब थेट संस्कृतापर्यंतच नव्हे तर त्याही पूर्वीच्या, म्हणजे पूर्ववैदिक भाषेपर्यंत नेऊन भिडविण्याचा त्यांचा अट्टाहास आहे. " ज्ञानेश्वरी-मराठीपर्यंत सर्व बाबींची परंपरा अव्याहत लागली आहे " असे ते समारोपात म्हणतातही. या आग्रहामुळे किंवा दुराग्रहामुळे, प्राकृतकाळी लोप पावलेल्या द्विवचनाचे व प्रत्ययी चतुर्थी विभक्तीचे ज्ञानेश्वरीपुरते त्यांनी पुनरुज्जीवन केले आहे. तसेच, धातूंची सिद्धी विशद करताना त्यांचे परस्मैपद व आत्मनेपद आणि सेट् व अनिट् हे संस्कृतातील भेद त्यांनी ज्ञानेश्वरीच्या मराठीतही कल्पिले आहेत. त्याप्रमाणेच, प्राकृतात लुप्त झालेले लुट् व लृट् हे अनुक्रमे

---

†. निबंध आणि भाषणें, पृ. १३४.

प्रथम व द्वितीय भविष्यकाळ, लङ् हा भूतकाळ, लिङ् हा विध्यर्थ आणि लृङ् हा संकेतार्थ यांचा त्यांनी ज्ञानेश्वरीत जीर्णोद्धार केला आहे. परंतु तसे करण्याला सबळ आधार नाही.

याचे एक उदाहरण ग्रंथाच्या प्रारंभीच दिसते. तेथे ' वर्णेतिहास ' प्रकरणी स्वरांचे वर्गीकरण करताना राजवाड्यांनी प्लुत अथवा त्रिमात्रक, उदात्त, अनुदात्त व स्वरित हे वैदिक भाषेतील स्वरप्रकार ज्ञानेश्वरीच्या भाषेतही आहेत असे सूचित केले आहे ( परिच्छेद क्र. ४ ). यावर चिं. वि. वैद्यांची रास्त टीका ‡ अशी, की " हे स्वर वैदिक भाषेच्या वाढीच्या वेळेसच नाहीसे होत चालले होते. वैदिक ब्राह्मणग्रंथांत–विशेषतः गद्यात–हे स्वर नाहीत, पाणिनीय किंवा पातञ्जल संस्कृतात तर ते नाहीतच; प्राकृतातही ते नाहीत. मराठीने ही जुनी तऱ्हा पुन्हा चालू केली नसावी असा आमचा समज आहे. " अशी टीका होणार या अपेक्षेनेच जणू राजवाड्यांनी आपल्या विवेचनात " ज्ञानेश्वरी स्वरात वाचीत व वाचतात " असे समर्थनपर कारण देऊन " आर्षभाषेप्रमाणे ज्ञानेश्वरी भाषेलाही स्वर आहेत व आर्षकालापासून आतापर्यंत उदात्त, अनुदात्त व स्वरित अशा स्वरांत बोलण्याची परंपरा कायम आहे " असे आपले मत निःशंकपणे मांडले आहे. विसर्गाविषयीही ते असेच म्हणतात : "विसर्ग अपभ्रंशात नाही; ज्ञानेश्वरीत आहे." पण ज्ञानेश्वरीत आहे म्हणजे सर्वत्र आहे असे नव्हे, तर केवळ तत्सम शब्दांत आहे; तद्भवांत विसर्ग नाही. अर्थात् ज्ञानेश्वरींत विसर्ग आहे हे राजवाड्यांचे म्हणणे अतिव्याप्त असून ते त्यांच्या सांस्कृतिक बुद्धीचे, म्हणजे ज्ञानेश्वरीभाषेचा संबंध साक्षात् संस्कृताशी जोडण्याच्या प्रवृत्तीचे द्योतक मानावे लागते. त्यांची ही प्रवृत्तिच त्यांना चतुर्थीच्या तेँ किंवा थेँ या प्रत्ययावरील वैकल्पिक अनुस्वाराच्या शोधार्थ पाणिनीच्या ' अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकः । ' या सूत्रापर्यंत जाण्यास लावते. वास्तविक पहाता, वैद्य म्हणतात त्याप्रमाणे, प्राकृतात अनेक स्वर विकल्पाने अनुनासिक होतात हा राजवाड्यांनीच दिलेला आधार या बाबतीत पुरेसा होता.

## आग्रह –आणि दुराग्रह

राजवाड्यांच्या स्वभावात जो आग्रह आणि क्वचित् दुराग्रहही होता त्याचे प्रतिबिंब त्यांच्या प्रस्तुत कृतीतही पडलेले पुढील काही उदाहरणांवरून दिसेल.

' तियें मुकुटीं कुसुमें सुगंधें । शोभतें भलीं ' ( १.१८ ) यातील ' शोभतें ' यांसारखीं रूपें वास्तविक पहाता अ–नियमित म्हटली पाहिजेत. राजवाडे–ज्ञानेश्वरीचे एक टीकाकार श्री. सहस्रबुद्धे यांनी त्यांना ' चमत्कारिक ' म्हटले, कारण त्यांना त्यांत अनेकवचनी कर्ता व एकवचनी क्रियापद असा प्रकार दिसला. त्यांना उत्तर देऊन राजवाड्यांनी ही रूपे ' चमत्कारिक '

---

‡ निबंध आणि भाषणें, पृ. ११२.

वाटलीं तरी तीं तशीं नसून तीं आत्मनेपदीं, व्युत्पत्तिसिद्ध रूपे आहेत असे आग्रहपूर्वक प्रतिपादिले. परंतु हें इतक्यावरच थांबले नाही. ज्ञानेश्वरीच्या भाषेत अनियमितपणा येईल ही कल्पनाही त्यांना असह्य वाटली व त्यांनी तळमळीने लिहिले—†" ज्ञानेश्वर म्हणजे काही वैदु नव्हे किंवा पारशी नव्हे. ज्ञानेश्वर हे विद्वान् ब्राह्मणांच्या कुळांत जन्मले असून व्याकरणादि शास्त्रें, संस्कृतादि भाषा व वेदादि ग्रंथ मार्मिकपणें पढलेले होते. त्यांच्या माथीं असले वैदूचे प्रयोग मारणें शुद्ध वेडगळपणा आहे....ज्ञानेश्वरांच्या समंच ज्ञानेश्वरींत वैदूला शोभेल असा एकही व्याकरणदुष्ट प्रयोग नाहीं. आणि ज्या ज्ञानेश्वरीच्या पोथींत असले प्रयोग असतील ती पोथी चुकलेली व भेंडगुजरी आहे."

'शशिसूर्यां जो प्रकाशु' ( ७.३२ ) असा पाठ घेऊन त्यातील 'शशिसूर्यां' या पदातील द्विवचनाचा पुरस्कार राजवाड्यांनी या व्याकरणात केलाच आहे ( परिच्छेद क्र. ८ ). त्याचा पाठपुरावा त्यांनी अन्यत्रही केला. या दृष्टीने त्यांचा 'पादयोः पतति' या मथळ्याचा लेख * उल्लेखनीय आहे. त्यात त्यांनी 'हातांपायां' ( पडणे ), 'दोन प्रहरां', 'दुपारां' आणि 'बे' ( बे एकें बे; बे दुणें चार., इ० ), < सं. द्वे, या चार उदाहरणांनी मराठीतील द्विवचनाच्या अस्तित्वाची जाणीव करून दिली आहे. वरील चार रूपे एकवचनाची वा अनेकवचनाची नसून ती द्विवचनाची आहेत असे प्रतिपादन करून ती तशी न मानणारे डॉ. गुणे व रा. भि. जोशी यांच्यासारख्यांना उद्देशून राजवाडे वरील लेखात म्हणतात—

" ....जोशी हो कीं गुणे हो, जर्मनी (त) शिकलेला असो कीं कोंकणांत पढलेला असो, त्याने मराठींत भाषेच्या निरुक्तीसंबंधानें जीं काहीं विधानें करावयाचीं तीं जरा जपून केलीं पाहिजेत. जोशी, गुणे, भारदे वगैरे इसमांचें होतें काय कीं, ज्या विषयासंबंधीं ते लिहावयाला निघतात त्याचा आगापिच्छा त्यांना बिलकुल माहीत नसतो. बाब कोणती, तिचें स्वरूप काय, तिचा विस्तार केवढा, तिची परंपरा कशी, इत्यादि तपशिलाचें स्वप्नही या लोकांना नसतें. जीभ उचलावी आणि टाळयाला लावावी किंवा लेखणी घ्यावी आणि यदृच्छेने वेळीं सुचेल तें खरडावें, असाच मासला या लोकांचा दिसतो...." ( पृ. २६२ ).

राजवाडे यांची वरील टीका अनर्गल व पूर्वग्रहदूषित तर आहेच, पण शिवाय ती निराधारही आहे. विशेषतः डॉ. गुणे यांच्या 'भाषाशास्त्रप्रवेशिका' ( An Introduction to Comparative Philology) या ग्रंथाविषयीं " जर्मन पंडितांचा आश्रय सोडून मराठी भाषेच्या प्रांतांत जेव्हा सारांशकार ( डॉ. गुणे ) प्रवेश करतो, तेव्हा त्याचे अज्ञान तात्काळ उघडकीस येतें " हा त्यांचा अभिप्राय ( पृ. २६२ ) अत्यंत अनुदारपणाचा आहे. शिवाय त्यात विशेष तथ्यही नाहीं. कारण डॉ. गुणे यांनी केलेले मराठी भाषेचे विश्लेषण अशास्त्रीय आहे असे म्हणणे

---

† राजवाडे–लेखसंग्रह, भाग ३, पृ. ३१.

* राजवाडे–लेखसंग्रह, भाग ३, पृ. २५९–२६३.

धाडसाचें होईल. पण लिहिण्याच्या अभिनिवेशात राजवाडे हे सर्व विसरतात व स्वमताचाच आग्रह धरतात. हा त्यांचा स्वभाव आहे, हेच खरे. पण हाच स्वभाव त्यांना क्वचित् अस्वाभाविकपणे वागावयास लावतो. याचे एक उत्तम उदाहरण म्हणजे प्राकृतातील चतुर्थी विभक्तीच्या प्रकरणी त्यांनी केलेला वररुचीसारख्या प्राकृत वैय्याकरणांचा उपहास व पिशेलसारख्या पाश्चात्य वैय्याकरणाचा पुरस्कार. राजवाड्यांच्याकडून तरी हे सर्वस्वी अनपेक्षित होते. पण प्राकृतात चतुर्थी होती या स्वमताच्या पुष्टयर्थ त्यांना या ठिकाणी पिशेलचा आधार घ्यावा लागला आहे खरा. ते म्हणतात, " प्राकृतात चतुर्थी नाहीं, असा दडपेबाजीचा नियम प्राकृत वैय्याकरण देतात. परंतु चतुर्थीच्या एकवचनाचीं रूपें पिशेलनें दहावीस दिलीं आहेत. त्यावरून....प्राकृत वैय्याकरणांची दृष्टि पाणिनीप्रमाणें सर्वंकष नव्हती असें म्हणावें लागतें...." ( परि. ●८ ). राजवाड्यांचे हे पिशेल–पिसे पाहून चिं. वि. वैद्यांना सुद्धा आश्चर्य वाटले आहे. पण ते स्पष्टपणे म्हणतात ‡ की " आद्य प्राकृत व्याकरणकार वररुची ' द्विवचनस्य बहुवचनम् ', ' चतुर्थ्याः षष्ठी ' अशीं सूत्रें देतो, त्यांचा अनादर करून पिशेलच्या दहावीस उदाहरणांवर आमचा भरंवसा बसावयाचा नाहीं. "

## परस्परविरुद्ध विधाने

विवेचनाच्या ओघात क्वचित् काही परस्परविरोधी विधाने राजवाड्यांनी केली आहेत. त्यांच्या हयातीत त्यांच्या ज्ञानेश्वरीची व व्याकरणाची द्वितीय आवृत्ती निघती तर कदाचित त्यांनी ती दुरुस्त केलीही असती. परंतु दुर्दैवाने तसे झाले नाही व त्यांच्या पुढील विधानांतील परस्परविरोध तसाच राहून गेला :—

( १ ) ' ज्ञानेश्वरींत द्विवचन नाहीं ' असें परि. ६ त वर म्हणून पुढें परि. २० त ' ज्ञानेश्वरींत दहापांच स्थलीं अकारान्त पुल्लिंगी नामांच्या द्विवचनाचीं रूपें येतात ' असें सांगून त्यांचे सोदाहरण विवेचनही केले आहे.

( २ ) अशीच धरसोड चतुर्थी विभक्तीविषयी झाली आहे. ' चतुर्थी महाराष्ट्रीत व अपभ्रंशांत क्वचित् आढळते ' असे परि. ४ मध्ये म्हणून पुढे परि. ८ त ' प्राकृतांत चतुर्थी नाही असा दडपेबाजीचा नियम प्राकृत वैय्याकरण देतात; परंतु चतुर्थीच्या एकवचनाची रूपे पिशेलने दहावीस दिली आहेत, त्यांवरून प्राकृत वैय्याकरणांचीं दृष्टि पाणिनीप्रमाणें सर्वंकष नव्हती ' अशी टीका केली आहे. राजवाड्यांची ही टीका त्यांच्या पहिल्या विधानाला तर विरोधी आहेच; पण शिवाय ती त्यांच्या स्व–भावालाही विरोधी आहे. कारण ती करताना त्यांनी स्वकीयांचा पक्ष सोडून पिशेलसारख्या परकीयांचा पक्ष व तोही चुकीने स्वीकारला आहे. याच पिशेलविषयी त्यांनी अन्यत्र " पर्वती आणि प्रचंड गड यांच्यामध्ये जे अंतर ते पिशेल व पाणिनि यांच्यामध्ये

‡ निबंध आणि भाषणे, पृ. ११७.

आहे" असे म्हटले आहे. §

( ३ ) विभक्तिप्रत्यय लागण्यापूर्वी होणाऱ्या नामाच्या सामान्यरूपाचा आरंभ द्वितीयेपासून होतो हे स्वमत मांडताना राजवाडे परि. ९ मध्ये म्हणतात :– "आधुनिक वैय्याकरण....सामान्यरूपाचा आरंभ तृतीयेपासून करतात तो चुकीचा होता." पण तेच राजवाडे पुढे इकारादि तिन्ही लिंगी नामांची रूपे म्हणून जी देतात ती पाहता त्यांच्या सामान्यीकरणाला आरंभ द्वितीयेपासून नव्हे तर तृतीयेपासून झालेला दिसतो. ( उदा., डोळा, विंचू, पाणी, इ. ) सारांश, वैद्य ¶ म्हणतात त्याप्रमाणे, द्वितीयेपासून सामान्यरूप होते ही राजवाड्यांची समजूत त्यांनीच दिलेल्या इतर नामांच्या रूपांना विरोधी आहे.

( ४ ) नामांच्या अनेकवचनी सामान्यरूपांवरील अनुस्वाराचा शोध घेताना राजवाड्यांनी अशीच धरसोड केली आहे. एकदा ते म्हणतात की, "हा अनुनासिक आगंतुक, म्हणजे प्राकृतेतर आर्यभाषांतून किंवा भाषांच्या संसर्गानें, मराठींत आला असला पाहिजे." असे म्हणून या ठिकाणी त्यांनी पल्हवी किंवा जुने फारसी या भाषेतील 'आन्' या अनेकवचनी प्रत्ययाचा आधार व्युत्पत्तीदाखल घेतला आहे ( परि. ●९ ). परंतु पुढे परि. ४२ त " हा अनुनासिक फारसीचा संसर्ग होण्याच्या पूर्वी मराठीत आला; अर्थात् संस्कृतांतील षष्ठीच्या व द्वितीयेच्या आन्-पासून याची उत्पत्ति आहे" अशी विधाने करताना त्यांनी आपल्या पूर्वीच्या विधानांतील फारसी 'आन्' प्रत्ययाचा आधार सोडून दिलेला दिसतो.

( ५ ) प्रथमेप्रमाणे द्वितीयेची रूपे बनविण्याची लकब मराठीने अपभ्रंशापासून उचलली, माहाराष्ट्रीपासून नाही, असे सांगून राजवाडे पुढील व्यापक विधान करतात :–"अपभ्रंशाने ज्या ज्या पद्धति सुरू केल्या त्या त्या मराठीनें चालू ठेविल्या" ( परि. ●५ ). पुढे वर्तमाने लट्च्या, म्हणजे वर्तमानकाळाच्या संदर्भात मात्र " लट्मध्यें मराठीनें अपभ्रंशाला सोडून महाराष्ट्रीचें जास्त अनुकरण केले आहे. लिङ्, लोट् व लङ् मध्येंहि महाराष्ट्रीचेंच मराठीनें अनुकरण केलेले आढळतें" असे ते म्हणतात ( परि. ●४४ ). यातील विरोध स्पष्ट आहे.

( ६ ) याशिवाय, आपले व्याकरण इंग्रजी व्याकरणावरून रचल्याबद्दल दादोबांना दोष देऊन ( परि. ●७८ ) स्वतः क्रियापदाच्या पुरुषांच्या नावांचा क्रम १. उत्तम पुरुष, २. मध्यम पुरुष, व ३. प्रथम पुरुष असा इंग्रजी व्याकरणपद्धतीप्रमाणे ठेवण्यात राजवाडेही काही प्रमाणात त्या दोषाचे धनी झाले आहेत.

वरील सर्व विसंगतींचें एक समर्थन शक्य आहे. ते म्हणजे, राजवाड्यांनी हे व्याकरण लिहून हातावेगळे केल्यावर त्यानंतर त्यांचा हात त्यावरून फिरला नसावा. तसा तो फिरता तर वरील विसंगती त्यात कदाचित् राहिल्या नसत्या.

---

§ सुबन्तविचार ( भाइसंमं. शकें १८३४, पृ. ८७. )

¶ निबंध आणि भाषणे, पृ. १२७.

## अशास्त्रपूत टीका

वैय्याकरण हा भाषेचे शास्त्र सिद्ध करणारा शास्त्रकार असतो. शास्त्रकाराने आपल्या-पुढील वस्तूकडे स्वच्छ दृष्टीने पहावे. त्यात पूर्वग्रह, अतिरिक्त स्वाभिमान, मदमत्सर, वैयक्तिक निंदा किंवा अवहेलना यासारखे मनोविकार आड येऊ नयेत. राजवाडयांना या गोष्टीची जाणीव नाही असे नाही. त्यांनी स्वतःच एका ठिकाणी शास्त्रविवेचनात दिसून येणाऱ्या पूर्वग्रहदूषित व अश्लाघ्य टीकेचा निषेध केला आहे. बीम्सच्या व्याकरणाविषयी लिहिताना ते ज्ञानेश्वरीच्या ' प्रस्तावने 'त म्हणतात :—" बीम्सच्या ग्रंथांत दुसरा एक अपूर्व व अक्षम्य अथवा गांवढळ दोष आहे. तो हा कीं, ठाईं ठाईं रागद्वेषादि विकारांचें अप्रस्तुत प्रदर्शन हा ग्राम्य ग्रंथकार करतो. " ( परि. ●११ ) पण राजवाडयांनीही नेमके हेच केले आहे. त्यांच्या स्वभावाची घडणच अशी होती की, लिहिण्याच्या भरात त्यांना वरील तत्त्वाचा विसर पडे व मग त्यांच्या हातून वरील सर्व दोषांनी युक्त अशी कडक जहरी टीका प्रतिपक्षावर केली जाई. याची उदाहरणे त्यांच्या सर्वच लिखाणात सापडतात. प्रस्तुत ग्रंथांतील त्यांच्या टीकेचे काही मासले पुढे दिले आहेत :—

( १ ) ज्ञानेश्वरीच्या ' प्रस्तावने 'त मराठीच्या स्वकल्पित किरिस्तानी व मानभावी अपभ्रंशावर केलेली टीका ( परि. ●२ ) अशिष्ट असून शिवाय अयोग्य आहे. कारण गोव्यातील किरिस्तांव ग्रंथकार किंवा देशावरील मानभाव ग्रंथकार आपापल्या अपभ्रंश ( ? ) भाषेला पोटभाषेच्या योग्यतेला आणण्याच्या हेतूने ग्रंथरचना करीत होते हे राजवाडयांचे म्हणणे बरोबर नाही. ते त्या त्या ठिकाणी रूढ असलेल्या ' देशी ' भाषेत लिहीत होते हेच खरे. शिवाय, ' मानभावी अपभ्रंश ' असा निराळा आहेच कोठे ? ज्ञानेश्वरीची मराठी आणि मान-भावांच्या ' साती ग्रंथां 'ची मराठी एकच नाही काय ? तात्पर्य, राजवाडयांची वरील टीका सर्वस्वी अनुचित आहे.

( २ ) " बीम्स म्हणतो त्याप्रमाणे ' च ' चीं चिया, चिये, चेनि ही रूपे वृत्तसुखार्थ बनविलेली नाहीत....ह्या त्या सिद्धीला वाटतील ती मनःकल्पित कारणे देण्यात बीम्स व होर्न्ले ह्यांचा हातखंडा आहे ! ! ! Philology म्हणजे भाषेच्या शरीराचे शास्त्र होय. जुने मराठी ग्रंथ न शोधल्यामुळे त्या भाषेचे इंद्रियविज्ञान, शारीरज्ञान त्यांना पारखे झाले, आणि अनेक बाबींत खऱ्याला सोडून कुडयाला जाण्याचा पंथ त्यांनी स्वीकारला. " ( ज्ञा. व्या; परि. ●७ )

( २ ) " प्राकृतांत चतुर्थी नाही, असा दडपेबाजीचा नियम प्राकृत वैय्याकरण देतात. " ( ज्ञा. व्या; परि ●८ )

( ३ ) " अपभ्रंशांत ' घोडअहे गणु ' असें षष्ठीचें एकवचन ( अनेकवचन ? ) होतें. त्यावरून प्रथमेचें अनेकवचन ' घोडे ' असें झालें असें तो ( होर्न्ले ) म्हणतो. परंतु, हे सर्व गप्पाष्टक आहे. " ( ज्ञा. व्या; परि. ●४२ ).

( ४ ) " पाणिनीसारखा सूर्य सोडून, इंग्रजी कंदील घेतल्यामुळे दादोबा जागोजागीं उपहसनीय झाला आहे. " ( शा. व्या; परि. ●७८ )

राजवाडयांची वरील टीका शास्त्रीय ग्रंथात न शोभणारी तर आहेच; पण शिवाय काही ठिकाणी ती असत्यावर आधारलेली आहे. उदाहरणार्थ, ' अनेकवचनविषयक अनुनासिकाचा छडा बीम्स किंवा होर्न्ले ह्या दोघांतून एकानेहि लाविला नाही; इतकेच नव्हे तर हा प्रश्नच त्यांनी काढला नाहीं ' असे राजवाडे म्हणतात ( परि. ●९ ), तेव्हा त्यांना 'Anuswara which evidently points back to the ण of the Prakrit genitive ' या बीम्सच्या विधानाचा विसर पडलेला दिसतो. इतकेच नव्हे तर तो छडा लावताना त्याने णाम्, आन् व आनि या तिन्ही प्रत्ययांकडे बोट दाखविले आहे व त्यात फारसीचा आन् प्रत्यय निष्कारण ओढण्याची चूक केलेली नाही हेही राजवाडे सांगत नाहीत. तसेच, होर्न्लेंच्या अनेकवचनविषयक विवेचनाला ते ' गप्पाष्टक ' म्हणतात तेव्हा ' भक्तजन ', ' बायकामंडळी ' यांसारखे मराठी प्रयोग पाहून त्या गप्पाष्टकातील सत्यांशाची जाणीव होते. दादोबांप्रमाणे आपणही काही वेळ पाणिनीसारख्या सूर्याला सोडून इंग्रजी कंदील हाती घेतला याची जाणीव टीकेच्या भरात राजवाडयांना राहात नाही. षष्ठीच्या ' च ' प्रत्ययाची बीम्सची मीमांसा ते त्याज्य ठरवितात हे ठीकच आहे; पण तसे करताना त्याने प्रथम या ' च ' चे व्युत्पादन सं. ' त्य ' पासून केले असल्याने त्याचे ऋण सांगण्यास मात्र ते विसरतात.

राजवाडयांच्या टीकेचा भर बीम्स, होर्न्ले व थोडया प्रमाणात दादोबा यांच्यावर आहे. त्या मानाने डॉ. भांडारकरांविषयी ते संभाळून लिहितात. वरील तिघांच्या कृतींचे येथे समर्थन करावयाचे नाही; पण त्यांनी आपापली व्याकरणे केव्हा व कोणत्या परिस्थितीत लिहिली ते पाहिल्यावाचून त्यांना दोषार्ह ठरविता येणार नाही. पैकी बीम्सचे तौलनिक (ऐतिहासिक नव्हे ) व्याकरण इ. स. १८७२ ते ७९ या काळातील असून त्यात विवेचिलेल्या सातही आर्यभाषा त्याला पूर्णपणे अवगत होत्या असे म्हणणे धाडसाचे होईल. त्याच्या प्रस्तावनेत " while awaiting for some Bopp or Grimm to arise ' असे म्हणून त्याने आपल्या अभ्यासाच्या व प्रयत्नाच्या मर्यादा मान्यही केल्या आहेत. तीच गोष्ट काही प्रमाणात होर्न्ले व ग्रियरसन यांचीही आहे. त्यांपैकी कोणीच निर्दोषत्वाची बढाई मारलेली नाही. दादोबांचे व्याकरण तर त्याही पूर्वीचे, म्हणजे इ. स. १८३६ तील असून त्यांची झेपही फार मर्यादित आहे. वास्तविक पाहता राजवाडयांनी त्यांची मराठी भाषेचे पहिले व्याकरणकार म्हणून पाठ थोपटावयास पाहिजे होती. पण स्व-भाव आड आला आणि तसे न करता उलट त्यांनी दादोबांना धारेवर धरले.

## राजवाडे यांचे भाषाविषयक कर्तृत्व

डॉ. केतकरांनी राजवाडयांवरील आपल्या लेखात त्यांच्या भाषाविषयक कामगिरीचा गौरव

करताना म्हटले आहे : " राजवाड्यांच्या अनेक कामगिऱ्यांपैकी सर्वांत अधिक मोठी कामगिरी कोणती हे ठरवून त्यांचे वर्णन करावयाचे झाले तर त्यांस भाषाशास्त्रज्ञ म्हणावे लागेल आणि त्यांची गणना अत्यंत मोठ्या वैय्याकरणात करावी लागेल. हेमचंद्र आणि वररुची यांचे प्रयत्न राजवाड्यांच्या प्रयत्नाच्या दृष्टीने काहीच नाहीत. इतिहासाचार्य किंवा इतिहाससंशोधक हे नाव राजवाड्यांस देण्यात आपण त्यांच्या कार्याचे अज्ञान दाखवू. त्यांच्या बौद्धिक कार्याचे गुरुलघुत्व माझ्या मते ( १ ) भाषाशास्त्रज्ञ ( २ ) वैयाकरण, (३) शब्दसंग्राहक व (४) इतिहाससंशोधक या अनुक्रमाने आहे. " डॉ. केतकरांचा वरील अभिप्राय यथार्थ आहे असे राजवाड्यांचे भाषाविषयक लेखन पाहून वाटते. या क्षेत्रातील त्यांच्या अभ्यासाचा परिपाक म्हणजे त्यांची ज्ञानेश्वरीची ' प्रस्तावना ', ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे व्याकरण व तिङन्त विचार आणि सुबन्त विचार यांसारखे शोधनिबंध. त्यांतून, विशेषतः त्यांच्या शोधनिबंधांतून, त्यांचे काही व्याकरण-विषयक विचार उद्धृत करण्यासारखे आहेत. त्यावरून त्यांच्या दृष्टिकोनाची कल्पना येईल :-

" व्याकरणशास्त्र हे समाजशास्त्राचे व इतिहासशास्त्राचे व मानववंशशास्त्राचे मोठे उपकारक आहे. समाजशास्त्रात, इतिहासशास्त्रात व मानववंशशास्त्रात तौलनिक व ऐतिहासिक व्याकरणशास्त्राच्या साहाय्याने अनेक गोष्टींचा उलगडा होत असतो व तो इतर कोणत्याहि शास्त्रांच्या साहाय्याने जसा व्हावा तसा समर्पक होत नाही. " ( सुबन्तविचार, पृ. ९० ).

" व्याकरण हे प्रायोगिक शास्त्र नाही; आवलोकनिक शास्त्र आहे. " ( लेखसंग्रह, भा. २, पृ. १२ ).

" व्याकरण म्हणजे बोलूनचालून फोड. या फोडीचे शास्त्र, फोड होणे शक्य नाही तेथपर्यंत न्यावयाचे असते. जेथे अन्वय लागत नाही, जेथे लिंगवचनविभक्ति कळत नाही, तेथे व्याकरणशास्त्र इतर शास्त्रांप्रमाणे थांबते. " ( लेखसंग्रह, भा. २, पृ.२७ ).

व्याकरणक्षेत्रातील राजवाड्यांचे कार्य बहुविध आहे. विशेषतः वर्णन आणि निरुक्त या दोन शास्त्रांत ते विशेष प्रभावी आणि प्रज्ञायुक्त वाटते. राजवाडे जसे व्याचिकीर्षु तसेच नैरुक्तही होते. तसेच मराठी भाषेच्या सीमान्त धातूंचे संशोधन व संकलन करून त्यांनी जो धातुपाठ सिद्ध केला तोही त्यांच्या बुद्धिवैभवाची साक्ष देतो. मराठी भाषेचे पाणिनी दादोबांना म्हणतात, राजवाड्यांना म्हणत नाहीत. अर्थात् पाणिनी व दादोबा यांत महदंतर असून त्यांच्यातील साम्य त्यांच्या त्या त्या भाषेतील प्रथमकर्तृत्वापुरतेच आहे. जसे पाणिनीने संस्कृताचे तसे दादोबांनी मराठीचे व्यवस्थापन करण्याचा पहिला मान मिळविला. राजवाड्यांचे कर्तृत्व वरील दोघांच्याहून निराळे आहे व एका दृष्टीने सरसही आहे. त्यांच्याच शब्दांत* सांगावयाचे तर " पाणिनि वेदभाषेचें व प्रचलित संस्कृत लोकभाषेचें व्याकरण रचीत होता; लोकभाषेचें ऐतिहासिक व्याकरण रचीत नव्हता. " राजवाड्यांचा दृष्टिकोण अधिक व्यापक आहे. ते भाषेच्या केवळ

---

* राजवाडे–लेखसंग्रह, भा. २, पृ. २८.

वर्णनात्मक विवेचनावर संतुष्ट नाहीत. त्यापलीकडे किंवा मागे जाऊन भाषेचा इतिहास शोधावा ही त्यांची खरी भूक आहे. भाषेच्या इतिहासाची त्यांची कल्पनाही व्यापक आहे. ' प्राकृतिक भाषांचा व वाङ्मयाचा इतिहास ' या आपल्या निबंधात ते म्हणतात :—

" मराठी भाषेचा इतिहास म्हणजे काय ? हा इतिहास म्हणजे एक बंडच आहे. त्याचे अनेक भाग व उपकरणे आहेत....भाषा म्हटली म्हणजे तिचे खालील अवयव सर्वमान्य असतात : ( १ ) उच्चार, ( २ ) उच्चाराच्या खुणा ऊर्फ अक्षरे, ( ३ ) शब्द, ( ४ ) वाक्य, ( ५ ) आगम, आदेश, प्रत्यय इत्यादी, ( ६ ) स्वर व आघात. हे सहा अवयव मातृभाषेतून अपत्यभाषेत कोणत्या रूपान्तरांनी उतरले व अपत्यभाषेच्या जन्मापासून अद्यतन दशातीपर्यंत त्यां रूपान्तरांत कोणकोणते फेरफार झाले या बाबींची नियमबद्ध हकीकत सांगणे म्हणजे मराठी भाषेचा इतिहास लिहिणे. मातृभाषेला दुसरी अपत्ये व चुलतेमामे असल्यास त्या सोदरांच्या व चुलत्यामामांच्या रूपांहून विवक्षित अपत्याचे रूप कोणत्या बाबीत समविषम आहे व का आहे याचाही ऊहापोह भाषेच्या इतिहासात करण्यापासून त्या भाषेचे रूप ठळकपणे व वैशिष्ट्याने ध्यानात येण्यास मार्ग होतो. तसेच ज्या समाजात, संस्कृतीत व हवापाण्यात मातृभाषा जन्मली व वाढली त्या समाजाहून, संस्कृतीहून किंवा हवापाण्याहून निराळ्या परिस्थितीत अपत्यभाषा जन्मल्यामुळे व वाढल्यामुळे अपत्याचे रूप कसे व किती बदलले वगैरे प्रश्नही याच इतिहासात पडतात. " ( राजवाडे लेखसंग्रह, पृ. १०१ ).

वरील उतारा स्पष्टपणे सांगतो की इतर युरोपीय भाषाशास्त्रज्ञांप्रमाणे राजवाड्यांच्या मतेही भाषेचे ऐतिहासिक व्याकरण व भाषेचा इतिहास या एकाच अर्थाच्या संज्ञा होत. भाषेचे पृथक्करण आणि भाषेचा इतिहास यांपैकी पाणिनीने पृथःकरण अनुपम केले असले तरी " वैदिक भाषेतून संस्कृत भाषेत शब्द येताना त्यांच्यांत फेरबदल कोणत्या नियमांनी झाले हे सांगण्याचे स्वप्नसुद्धा त्याच्या ग्रंथात नाहीं " असे पुढे राजवाडे म्हणतात. तसेच " हे काल-दुर्लक्ष्य त्याने मुद्दाम केले....व कालाकडे म्हणजे इतिहासाकडे दुर्लक्ष्य केल्यामुळे पाणिनीच्या निरुपम कृतीत मोठाच दोष घुसला आहे " असेही त्यांचे स्पष्ट मत आहे ( उपर्युक्त, पृ. १०२–१०३ ). येणेप्रमाणे मराठी भाषेचा इतिहास रचावयाचा म्हणजे ( १ ) कोश ऊर्फ निघंटू, ( २ ) निरुक्त , ( ३ ) व्याकरण, ( ४ ) आदेशपत्रिका, व ( ५ ) वाक्येतिहास ऊर्फ साहित्याचा इतिहास असे पाच ग्रंथ सिद्ध करण्याची आवश्यकता त्यांनी सांगितली आहे. यांपैकी राजवाड्यांनी ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे ऐतिहासिक व्याकरण तर रचिलेच, पण एकूण मराठी लोकभाषेच्या ऐतिहासिक व्याकरणाची त्यांनी पूर्वतयारी करून ठेवली. त्यांची भाषाविषयक स्फुट टिपणे म्हणजे या पूर्वतयारीचाच भाग होत. आणि हे सर्व कार्य त्यांनी अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत केले. सरकार, संस्थानिक किंवा विद्यापीठे यांपैकी कोणाचाही आधार नसताना, विद्वान त्याविषयी उदासीन असताना, विरोधक टपून बसलेले असताना आणि सर्वसामान्य वाचकवर्ग विन्मुख असताना राजवाड्यांनी मराठी भाषेचे जे शास्त्रकार्य केले त्याला

इतिहासात तोड नाही. परिस्थितीपुढे वाकणे त्यांच्या स्वभावातच नव्हते. ' सुबन्तविचार ' या निबंधात सद्यःकालीन परिस्थितीविषयी ते म्हणतात : " ही स्थिती काही उत्साहविघातक नाही. संकट यावे तर असेच यावे. ह्या संकटातच आपल्या कर्तबगारीची खरी परीक्षा आहे. " ( पृ. ८८ ) उपर्युक्त परीक्षेला राजवाडे उतरले व त्यांनी महाराष्ट्राच्या हाती अस्सल ज्ञानेश्वरी-बरोबर तिचे व्याकरणही दिले हे त्यांचे मोठेपण.

## देशभक्तीचा बाणा

राजवाडे हे देशासाठी फकिरी पतकरून इतिहास व भाषासंशोधन करणारे राष्ट्रभक्त होते. त्यांची देशभक्ती आणि संशोधनप्रेम यांत अधिक उत्कट काय होते ते सांगणे कठिण आहे. त्यामुळेच त्यांच्या राष्ट्रीय स्वरूपाच्या लिखाणात त्यांच्यातील संशोधक जागा असलेला दिसतो, आणि संशोधनपर लेखनातही त्यांचा राष्ट्रीय बाणा उठून दिसतो. येथे या दुसऱ्या प्रकाराची थोडी उदाहरणे पाहावयाची आहेत.

वास्तविक पाहाता ज्ञानेश्वरीची प्रस्तावना काय किंवा तिचे व्याकरण काय, हे दोन्ही विषय केवळ संशोधनाचे किंवा विद्वत्तेचे. त्यांच्या विवेचनात देशभक्तीच्या भावनेला विशेष अवसर नाही. परंतु राजवाड्यांचा मनःपिंडच देशभक्ताचा असल्यामुळे त्यांच्या संशोधनपर लिखाणातही वरील भावना नकळत प्रकट होते. या दृष्टीने त्यांनी बीम्सच्या व्याकरणातील उतारा देऊन त्यावर केलेले एकवाक्यी भाष्य ( " भोसल्यांच्या वेळी आंवढ्यातले लोक पोटे बांधून कामे करीत होते ! ! ! " परि. ●११ ), युरोपियन विद्वानांचे मात्सर्य व करंटलक्षण यांवर उठविलेली झोड ( परि. ●१५ ), त्यांच्या पालीवरील मतलबी प्रेमाचा केलेला दंभस्फोट ( परि. ●१७ ), ' बाटेगिरीच्या कल्पना पसरविण्यात भूषण मानणाऱ्या शोधकां 'चा केलेला उपहास (परि. ●२९) इत्यादि ' प्रस्तावने 'तील स्थळे उल्लेखनीय आहेत. व्याकरणात तर प्रतिपक्षाचा आणि विशेषतः युरोपियन वैयाकरणांचा व दादोबांचा समाचार घेताना त्यांच्या लेखणीला विलक्षण धार येते आणि त्या भरात ते लिहू नये ते लिहून जातात. शास्त्रीय लेखनात रागद्वेषादि विकारांचे प्रदर्शन नको असे आवर्जून सांगून ते स्वतःच अशा प्रकारचे प्रदर्शन करण्यात रमून जातात. मग त्यांना ज्ञानेश्वरीच्या कोणा संपादकाने दर प्रतीकाच्या व पदाच्या नंतर ज्ञानेश्वरी टीका ओव्यांचे तुकडे पाडून दिली तर ते ' आधुनिक चोंबले ' वाटतात ( ज्ञा. प्रस्ता., परि. ●६६ ) आणि कोणी मराठीच्या लेखनपद्धतीत सुधारणा सुचविली तर त्यांच्या दृष्टीने तो ' वैयाकरणंमन्य ' ठरतो (ज्ञा. व्या., परि. ●४५ ). परंतु हा राजवाड्यांचा स्वभाव आहे. तेवढा वगळल्यास त्यांच्या सर्वच लिखाणात जी राष्ट्रभक्तीची प्रखर भावना आढळते तीच येथेही दिसून येईल. त्यांच्या मनातून मराठी भाषेची उज्ज्वल पूर्वपरंपरा सांगून तिचा साद्यन्त इतिहास कथन करावयाचा होता व तिच्याभोवती बसू पाहणारी इंग्रजी व्याकरणपद्धतीची चौकट दूर सारून तिला तिचेच ' जुने ठेवणे ' असलेल्या पाणिनीय व्याकरणाच्या आकृतिबंधात बसवावयाची होती. ' परत्व ' होत

असलेल्या आपल्या मायभाषेला ते 'स्वस्थ' करू पाहात होते. त्यासाठी त्यांचा हा सारा आटापिटा होता. म्हणूनच ज्ञानेश्वरीच्या आपल्या पोथीची एक जुळी बहीण माडगावकरांना गवसली हे कळल्यावर त्यांना परमानंद झाला व तो त्यांनी बोलूनही दाखविला. त्यांचे नाणे खरेच होते; पण नाणे नुसते खरे असून चालत नाही, त्याचे खरेपण जगाच्या बाजारात सिद्ध व्हावे लागते. तसे ते व्हावे एवढ्यासाठी राजवाड्यांनी या प्रदीर्घ 'प्रस्तावने'चा प्रपंच केला आणि नंतर त्या खऱ्या ठरलेल्या नाण्याचे पैलू जगाला दाखवले. साहजिकच एका विशिष्ट ध्येयाने प्रेरित झालेल्या या भाषाशास्त्रज्ञाचे काही रागलोभ त्यांच्या लिखाणात दिसून आले तर त्यात आश्चर्य नाही. पण त्या रागलोभांच्या मागे एक प्रकारची पोटतिडीक आहे हे विसरून चालणार नाही. ही पोटतिडीक स्वदेश, स्वधर्म आणि स्वभाषा या तिहींविषयी आहे. तसेच ती व्यक्त होताना कोठे तडजोडीची भाषा नाही. सारे काम रोखठोक आहे. त्यांचा प्रतिपक्षी साधा 'चुकत' नाही, तर 'तोंडघशी पडतो!' पण राजवाड्यांसारख्यांच्याकडून असा पराभव व्हावयाला सुद्धा काही पूर्वपुण्याई लागत असणारच !

## भाषाशैली

भाषाशास्त्रीय लेखनात शैलीची अपेक्षा किंवा चर्चा करणे हे केव्हाही अयोग्यच. कारण जे बोलूनचालून शास्त्रीय लिखाण आहे त्यात शैलीचे गुण कोठून सापडणार? पण राजवाडे यांची स्वतःची अशी एक खास शैली होती आणि ते काहीहि लिहोत, त्यांची ही शैली त्या लेखनात अचूकपणे प्रगट होई. त्यांच्या मनातील आवेश लेखनात ओजोगुणाच्या रूपाने अवतरे व त्यासरशी ते अतिशय धारदार आणि भेदक असे काही लिहून जात. भाषेच्या इतिहासासारखा, व्याकरणासारखा विषय त्यांनी वैयाकरणाला योग्य अशा मितव्ययानेच हाताळला आहे व त्यांची विवेचने वाचताना वैयाकरणाला प्रिय असणाऱ्या 'अर्धमात्रालाघवा'चा वरचेवर प्रत्यय येतो. पण त्यातसुद्धा त्यांची मार्मिकता दिसून येते. आपल्या विवेचनाच्या शेवटी कित्येकदा ते एखादा सार्वभिक सिद्धान्त सहज सांगून जातात; उदाहरणार्थ,

( भाषेच्या कालकृत अवस्थान्तराविषयी ) "व्यक्ति तीच; वस्त्रें तेवढीं निराळीं. पुरुष एकच, बाल्यतारुण्यवार्द्धक्यादि अवस्थान्तरें मात्र अनेक." ( ज्ञा. प्रस्ता., परि. ●३ )

"उदार, ललित, अभिजात व नागर गद्यपद्यबंध जो निर्माण होतो त्याला सारस्वत अशी अनन्यसामान्य संज्ञा आहे." ( ज्ञा. प्रस्ता., परि. ●१३ )

"अशिष्ट लोकांच्या ठायी जुन्याला चिकटण्याचा व नव्याला धरण्याचा परस्परविरोधी दुतोंडी गुण असतो." ( ज्ञा. प्रस्ता., परि. ●१७ )

"पूर्वभाषा असतांनाच उत्तरभाषा अपभ्रंश म्हणून सुरू होते," व "उत्तरभाषा लोकमान्य होत असतांना पूर्वभाषा काही काल टिकाव धरून रहाते." ( ज्ञा. प्रस्ता., परि. ●३५ )

" अपभ्रष्ट भाषा या शब्दाऐवजीं सुलभोच्चारप्रवण भाषा अशी परिभाषा योजल्यास, हा वादच मिटतो. " ( ज्ञा. व्या., परि. ●३ )

" परंपरा व इतिहास हे निरुक्तीचे दोन नेत्र होत. तद्व्यतिरिक्त ही आंधळी होय. " ( ज्ञा. व्या., परि. ●५ )

" Philology म्हणजे भाषेच्या शरीराचे शास्त्र होय. " ( ज्ञा. व्या., परि. ●१७ )

क्वचित् मधूनच राजवाड्यांच्या कल्पनेला पंख फुटतात आणि मग तिला मराठी व्याकरणातील ' चान्त षष्ठी ' चे विवेचन चालू असताना, या ' च ' ने वैय्याकरणांना दिलेले नाना प्रकारचे गोते पाहून, मी मी म्हणणाऱ्या नावाड्यांना वादळात भिंगरीसारखे गरगर फिरविणाऱ्या एरियलची आठवण होते. (ज्ञा. व्या., परि. ●१६ ) अत्युक्ती हाही राजवाडी शैलीचा एक विशेष असून तो " मराठीतील शब्दप्राचुर्याची बरोबरी पृथ्वीवरील इतर कोणत्याही भाषेला करतां यावयाची नाहीं " ( ज्ञा. प्रस्ता., परि. ●८ ) यासारख्या विधानातून जाणवतो. उपहास व उपरोध यांचा रंग तर पदोपदी उधळलेला आहे. त्याचे ' व्याकरणा ' तील काही मासले यापूर्वी पाहिलेच आहेत. पुढे ' प्रस्तावने ' तून एकदोन देतो :—

" युरोपियन लोक वनस्पतिशास्त्र जितक्या बारकाईने रचतात, तितक्याच बारकाईने हिंदू लोकांनी व्याकरणशास्त्राची रचना केलेली आहे. त्यामुळे पृथक्करणान्ती त्यांना जे असंख्य व सूक्ष्म भेद सहज दिसतात ते युरोपियनांच्या अश्रद्धेचे विषय होतात. बाब अज्ञानोजृंभित हेकाडपणाची असल्यामुळे लक्ष्य देण्यासारखी नसून, नितान्त तिरस्करणीय आहे. " ( परि. ●६ )

" युरोपातील तीनचारशे वर्षांतल्या उपटसुंभ राष्ट्रांना भारतवर्षाच्या थोर, प्रौढ व संभावित पुरातनत्वाचा हेवा वाटतो, हे त्यांच्या लघुमनाचे द्योतक आहे. बकाल करंट्यांना गर्भश्रीमंतीचा हेवा वाटावा, ह्यात काही नवल नाही ! शास्त्रीय शोधात मात्सर्याचा आवेश आणणे मायावी असुरांनाही लज्जास्पद होय. " ( परि. ●१५ )

राजवाड्यांची शब्दयोजनाही पाहण्यासारखी आहे. सध्याचे भक्तिमार्गी लोक त्यांना ' गचाळ ' वाटतात, ओव्यांचे पदच्छेद करून ज्ञानेश्वरी छापणे हे त्यांच्या दृष्टीने आधुनिक ' चोचले ' ठरतात, आणि एखादा सिद्धान्त त्यांच्या मताने ' कमजोर ' न होता उलट ' शिरजोर ' च होतो. राजवाड्यांची भाषा खास मऱ्हाठी वळणाची आहे. तिला स्वकीय शब्दांचे प्रेम असले तरी परकीय शब्दांचे वावडेही नाही. त्यामुळे ते हाताशी येणारा शब्द वापरून मोकळे होतात; तो शब्द वाङ्मयीन आहे की नाही हा विचार ते करीत बसत नाहीत. साहजिकच त्यांच्या भाषेत एक प्रकारचा आवेश किंवा रोखठोकपणा आला आहे. थोडक्यात, त्यांची भाषा त्यांच्याप्रमाणे आहे.

## थोडे गुणदोषविवेचन

राजवाड्यांच्या ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावनेचे व व्याकरणाचे एकूण स्वरूप वरीलप्रमाणे आहे.

ही दोन्ही प्रकरणे स्थूलमानाने ज्ञानेश्वरीसंबंधीच असली तरी त्यांचे विषय भिन्न आहेत. पहिले इतिहासवजा असून दुसरे उघडच वैयाकरणिक आहे. असे असले तरी काही गुणदोष या दोन्ही प्रकरणांना समान आहेत. त्याशिवाय प्रत्येकाचे काही स्वतंत्र गुणदोष आहेत ते निराळेच. या दोन्ही प्रकारांची थोडक्यात चर्चा करून या प्रस्तावनेचा समारोप करावयाचा आहे.

गुणांच्या बाजूस सर्वप्रथम म्हणजे राजवाड्यांची असामान्य प्रतिभा. ज्ञानेश्वरीच्या एका जुन्या पोथीचे निमित्त करून मराठी भाषेची पूर्वपरंपरा शोधण्याचे व त्या भाषेचे ऐतिहासिक व्याकरण रचण्याचे जे त्यांनी योजिले त्यातच त्यांची प्रतिभाशक्ती दिसून येते. हे विषय त्यांच्या मनात बरेच दिवस घोळत होते व ज्ञानेश्वरीच्या पाटांगणी प्रतीचे निमित्त करून त्यांच्या प्रतिभेने त्यांना आकार दिला. संशोधनविषयाच्या निवडीत प्रतिभेचा भाग जरूर असतो व त्याचा उपयोग करूनच राजवाड्यांनी आपल्या मनातील अनेक वर्षांच्या कल्पनेला मूर्त स्वरूप दिले. ही प्रतिभा जशी विषयाच्या निवडीत तशीच त्याच्या उद्घाटनातही दिसून येते. प्रतिपाद्य विषयाचे संपूर्ण स्वरूप साकल्याने डोळ्यापुढे असल्याशिवाय त्याचे उद्घाटन इतक्या व्यवस्थितपणे व अचूकपणे झाले नसते. तपशिलाबाबत बोलावयाचे तर पूर्ववैदिक भाषेपासून ज्ञानेश्वरीच्या भाषेपर्यंत जुळवून दाखविलेली साखळी, मराठीतील षष्ठी विभक्तीच्या चान्त विशेषणांचा व नामांच्या 'सामान्यरूपा'चा केलेला उकल, पाणिनीच्या दशविध 'ल' कारांचा मराठीच्या आख्यातविभक्तीत घेतलेला शोध, मराठी निपातांचे केलेले निरुक्त इत्यादि गोष्टी केवळ प्रतिभासाध्य म्हणून दाखविता येतील. हे डॉ. भांडारकरांनासुद्धा साधले नाही; मग इतरांविषयी बोलावयासच नको. अनेक वर्षांच्या तपश्चर्येने व त्याहीपेक्षा एक प्रकारच्या आंतरिक प्रेरणेने राजवाड्यांना जणू दिव्य दृष्टी लाभली होती आणि तिच्या प्रकाशात त्यांनी ही अवघड वाट चोखाळली. ती वाट मळलेली नव्हती; नवीनच होती. ती किती अवघड आहे ते त्यांनी 'प्राकृतिक भाषांचा व वाङ्मयाचा इतिहास' या आपल्या लेखात पुढील शब्दांमध्ये सांगितले आहे : "निरुक्तीचें हें कृत्य हुकमी नाहीं. वैदिक, संस्कृत, महाराष्ट्री, अर्धमागधी वगैरे ग्रंथ वाचता वाचता पूर्वभाषांतील शब्दांची पश्चात्कभाषांतील म्हणजे मराठीतील शब्दांशी सांगड घालून घ्यावयाची असते. ही हातोटी केवळ अनुभवानें येणारी आहे. हजारो चुका कराव्या, शेकडोंदा भलत्या पूर्वशब्दाची भलत्याच मराठी शब्दांशी लग्ने लावून द्यावीं व नंतर खरीं वधूवरें सापडली असता खोटीं लग्ने निर्लज्जपणें मोडून टाकावीं, असे टक्केटोणपे खाता खाता शब्दशास्त्राचे जोसपण अंगी बाणत असते, एऱ्हवी नाही. यद्यपि जोसपण अंगी बाणले तत्रापि मराठीतील वाटेल त्या शब्दाचे महाराष्ट्री किंवा संस्कृत गणगोत कोणीही जोशी ताडकन् व बिनचूक सांगू शकत नाही. पूर्वभाषेतील ग्रंथ वाचीत असताना स्मृति, उपस्थिति व कल्पकता या त्रयींची ज्या मानाने कृपा होईल त्या मानाने मराठी शब्दांच्या संस्कृत गणगोताचे टिपण करून ठेवावयाचे असते. अशी टिपणे ज्याने दोन-चार तपे केली त्याला निरुक्ताचार्याच्या पदवीवर न्यायानें हक्क सांगता येतो." (रा. लेखसंग्रह, पृ. १००–१०१). या पदवीवर स्वतः राजवाड्यांचा हक्क कितपत पोचतो हा प्रश्न बाजूस ठेवला तरी वरील अ-ह्लित व म्हणून

प्रतीत होईल. सबब, कांहीं पाठ दोन्ही प्रतींतील घेऊन तुलना करतों.

| अध्याय पहिला ओवी | मुकुंदराज | माडगांवकर | माडगांवकरांच्या टिपांतील पाठान्तरें | |
|---|---|---|---|---|
| ४ | रेखा | देखा | देखां | (१) |
| ४ | टेव | ठेव | ० | (२) |
| ५ | तिये | तें | तियें-तीं | (३) |
| ६ | पद्यबंध | पदबंध | ० | (४) |
| ७ | तिया | त्या | ० | (५) |
| ९ | व्यासादिकांचिया | व्यासादिकांची | व्यासादिकांचिया | (६) |
| ९ | तिया | ते | ० | (७) |
| १० | विसंवादें | विसंवाद | विसंवादें | (८) |
| १३ | सत्तर्कवादु | सत्कारवादु | ० | (८अ) |
| २४ | जालेयां | जालियां | जालेयां | (९) |
| २५ | कृतकार्यां | कृतकार्या | कृतकार्य | (१०) |
| २८ | कलाकौतुकां | सकळां कौतुकां | सकळकौतुका | (११) |
| ३० | वसैठ | वसौठ | विशिष्ट | (१२) |
| ३२ | आविष्करौनि | आविष्करोनि | आदिकरूनि | (१३) |
| ३३ | महाकाव्या रा | हा ॐकाव्यां रावो | शास्त्रां | (१४) |
| ३५ | सिहाणें | शाहणें | ० | (१५) |
| ३५ | प्रेम | प्रमेय | ० | (१६) |
| ४० | सुखाडलें | सुरवाडलें | ० | (१७) |
| ४१ | नागरां | नागरा | नागरां | (१८) |
| ४२ | आगली | आगळी | ० | (१९) |
| ६२ | देआवें | द्यावें | परिसणेया | (२०) |
| १०९ | काज | कां जें | ० | (२१) |
| ११३ | जूझती | जुंझती | ० | (२२) |
| ११५ | तेया | तया | ० | (२३) |
| ११९ | ॐइचिलें | वरचिलेनि | ० | (२४) |
| १२५ | रायाचेयाबोला | राजयाचिया बोला | राजाचेया | (२५) |
| १५६ | रासौभा | सडा | ० | (२६) |
| १६६ | बाणवारि | बाणवरि | ० | (२७) |
| १७० | सकलै | सकळ | ० | (२८) |

| | | | |
|---|---|---|---|
| १७१ | आपणपेयां आपणयां | आपणयांतें | (२९) |
| २६४ | आतां इया वेन्हि जें जिआवें । | आतां यावरी जें ज्यावें । जिआवें । | |
| | तेयापासौनि हें बरवें | तयापासौनि हें बरवें । | |
| | जें शब्दें संडौनु साहावे । | जें शब्दें सांडूनि साहावे । | (३०) |
| | बाण एयांचे ॥ २६४ ॥ | बाण यांचे ॥ २६५ ॥ | |

स्पष्टीकरण :—

( १ ) माडगांवकर, कुंटे, साखरे, वगैरेंच्या प्रतींत देखा, देखां असा पाठ आहे. ह्या पाठानें बरोबर अर्थ लागत नाहीं. अंगिकभाव हें नाम आहे. तें अवयव किंवा स्मृति या शब्दांशीं जोडतां येत नाहीं. व्याकरण आड येतें. साखऱ्यांच्या प्रतींत कांहीं तरी गडबडगुंडा केला आहे. २ ऱ्या ओंवीपासून १९ व्या ओंवीपर्यंत रूपक आहे. त्यांत,

| | |
|---|---|
| १ देव = गणेश | १२ पदें = रत्नें |
| २ शब्दब्रह्म = गणेशमूर्ति | १३ मती = पल्लवसडका |
| ३ वर्ण = वपु | १४ षड्दर्शनें = साहाभुजा |
| ४ स्मृति = अवयव | १५ तर्क = परशु ( १ भुजा ) |
| ५ रेखा = अंगिकभाव | १६ न्याय = अंकुश ( २ ,, ) |
| ६ अर्थशोभा = लावण्याची टेव | १७ वेदान्त = मोदक ( ३ ,, ) |
| ७ पुराणें = मणिभूषणें | १८ भग्नदंत = बौद्धमतसंकेतु ( ४ ,, ) |
| ८ पद्यपद्धति = खेवणें | १९ वरदहस्त = सत्तर्कवाद ( ५ ,, ) |
| ९ पद्यबंध = अंबर | २० अभयहस्त = धर्मप्रतिष्ठा ( ६ ,, ) |
| १० साहित्य = वाणें | २१ शुंडादंड = विवेक |
| ११ काव्यनाटकें = क्षुद्रघंटिका | २२ समग्रदंत = संवाद |
| २३ सूक्ष्मेक्षणु = उन्मेष | २७ उपनिषदें = कुसुमें |
| २४ दोन्ही-मिमांसा = दोनी कान | २८ अकार = चरणयुगुल |
| २५ मुनि = अलि | २९ उकार = उदर |
| २६ द्वैताद्वैत = दोनीं गंडस्थळें | ३० मकार = मस्तक |

असें हें गणेशदेवाचें रूपक आहे. त्यांत नंतर उपमानांना जशीं उपमेयें आहेत, तसें, देखा हा पाठ ३ ऱ्या ओंवींत घेतला असतां, अंगिकभाव ह्या उपमानाला उपमेय उपलब्ध होत नाहीं. तेव्हां, रेखा हा च मुकुंदराजाच्या प्रतींतील पाठ प्रशस्त आहे. रेखा ह्मणजे काव्यरचना. अंगिक ह्मणजे इंद्रियांसंबंधीं, अवयवांसंबंधीं. भाव ह्मणजे अवयवांच्या द्वारा विकारांचें प्रदर्शन. हा रेखा शब्द नवव्या अध्यायाच्या २१५ व्या ओंवींत व सहाव्या अध्यायाच्या १८ व्या ओंवींत आला आहे.

जें साहित्य आणि शांती। हे रेखा दिसे बोलती ॥ अध्याय ५, ओवी २१५ ॥
नवल बोलतियें रेखेची वाहाणी। अध्याय ६, ओवी १८ ॥

ह्या दोन्ही स्थलीं रेखा ह्या शब्दाचा अर्थ काव्यरचना असा आहे. रेखा हा पाठ घेऊन, पहिल्या अध्यायांतील ह्या चौथ्या ओवीच्या प्रथमार्धाचा अर्थ असा :—

गणेशा ! स्मृती ह्या तुझे अवयव आहेत व काव्यरचना ही तुझ्या मनांतील विकारांची व विचारांची अवयवद्वारा प्रदर्शक आहे.

माडगांवकरांच्या टीपांत हि हा पाठ नाहीं. मजजवळील सोनारी प्रतींत रेखा असा च पाठ आहे.

( २ ) माडगांवकरादि प्रतींत ठेव असा पाठ आहे. तो पाठ घेऊन अर्थ असा होतो. तेथ ह्मणजे अवयवरूप ज्या स्मृती त्यांच्या ठायीं, अर्थशोभा ही लावण्याचा साठा आहे. स्मृतींचा जो अर्थ तो लावण्याचा साठा कसा समजावयाचा ? आतां मुकुंदराजाच्या प्रतींतील ढेव पाठ घेऊन काय अर्थ होतो तो पहा. ढेव ह्मणजे नखरा. तेथ ह्मणजे आंगिकभावरूप जी काव्यरचना तिच्या ठायीं, अर्थशोभा ही सौंदर्याच्या नखऱ्याप्रमाणें आहे. काव्य ह्मणजे प्रतिभोत्पदित ग्रंथरचना.

( ३ ) माडगांवकरांचा तें हा पाठ व्याकरणदृष्टया दुष्ट आहे: 'त' ह्या सर्वनामाचें नपुंसकलिंगीं प्रथमेचें एकवचन तें. 'तें' हें 'मणिभूषणें' ह्या नपुंसकलिंगीं प्रथमेच्या अनेकवचनाचें विशेषण होऊं शकणार नाहीं. 'त' ह्या सर्वनामाचें नपुंसकलिंगीं प्रथमेचें अनेकवचन ज्ञानेश्वरकालीं 'तियें' असें होत असे. तेव्हा 'तियें' हा पाठ शुद्ध आहे व तो च मुकुंदराजाच्या प्रतींत आहे. माडगांवकरांनीं टीपेंत पाठभेदांत 'तियें' हा शुद्ध पाठ दिला आहे व 'तें' हा अशुद्ध पाठ मूळांत स्वीकारला आहे.

( ४ ) पद्यबंध व गद्यबंध असे दोन प्रकारचे बंध साहित्यशास्त्रांत सांगितले आहेत. पैकीं पद्यबंधांना रंगीत छताची उपमा ज्ञानेश्वरांनीं दिली आहे. पदबंध ह्या सामाजिक शब्दाला कांहीं अर्थ च नाहीं. पदबंध हा जर एकप्रकारचा बंध ह्मणजे प्रबंध समजला, तर दुसऱ्या प्रकारचा बंध कोणता ? प्रत्ययबंधाचा ! तात्पर्य, पदबंध हा अपपाठ आहे. माडगांवकरांच्या टिपांत हि हा किंवा इतर कोणता हि पाठभेद दिलेला नाहीं.

( ५ ) 'त' ह्या सर्वनामाचें स्त्रीलिंगी प्रथमेच्या अनेकवचनाचें रूप 'तिया' असें ज्ञानेश्वरकालीं होत असे. सबब, 'त्या' हा अपपाठ आहे, कारण व्याकरणदुष्ट आहे.

( ६ ) व्यासादिकांच ह्या विशेषणाचीं प्रथमेचीं रूपें अशीं होत :—

| | | | |
|---|---|---|---|
| पु. | प्र. | ए. | व्यासादिकांचा |
| न. | प्र. | ए. | व्यासादिकांचें |
| स्त्री. | प्र. | ए. | व्यासादिकांची |
| पु. | प्र. | अ. | व्यासादिकांचे |
| न. | प्र. | अ. | व्यासादिकांचीं |
| स्त्री. | प्र. | अ. | व्यासादिकांचिया |

मती ह्या अनेकवचनी रूपाचें विशेषण व्यासादिकांचिया हें अनेकवचनी रूप आहे. "व्यासादिकांची" हें एकवचनी रूप व्याकरणदुष्ट आहे. माडगांवकरांच्या प्रतींत ही सबंद ओंवी बाकडीतिकडी व अशुद्ध छापिली आहे.

( ७ ) 'तिया' हें पल्लवसडका या अनेकवचनी स्त्रीलिंगी शब्दाचें विशेषण आहे. सबब, 'ते' हें रूप दुष्ट.

( ८ ) तृतीया एकवचन हवें. हात विसंवाद धरीत नाहींत, तर विसंवादानें शस्त्रें धरतात. विसंवादें ह्मणजे एकमेकाच्या विरुद्ध. षड्दर्शनपैकीं प्रत्येक दर्शन इतर दर्शनाच्या विसंवादी ह्मणजे विरुद्ध आहे, असा ज्ञानेश्वरांचा आशय.

( ८ अ ) सत्कारवाद कोणता ? विसंवादी तर्क वर उल्लेखिला च आहे. येथें सत्तर्काचें मंडण आहे.

( ९ ) जालियां हें रूप व्याकरणदुष्ट आहे. जाल्यां हें रूप येथें शुद्ध आहे.

( १० ) कृतकार्यवान् = कृतकार्यां.§ कृतकार्यां हें रूप व्याकरणदुष्ट. वान् प्रत्ययान्त सर्व संस्कृतरूपें ज्ञानेश्वरींत प्रथमेच्या एकवचनीं पुलिंगी आंकारान्त होतात.

( ११ ) मुकुंदराजी पाठ स्पष्ट व चांगला आहे, हें दिसलें च आहे.

( १२ ) वसति+स्थ = वसइ+ठ = वसैठ ( विशेषण ), वसैठा–ठी–ठें. वसैठा असें पुल्लिंगी रूप ह्या च अध्यायाच्या २२८ व्या ओंवींत आलें आहे. वसौठ हें रूप व्युत्पत्तिदुष्ट आहे.

( १३ ) करउन–नि–नियां–नु अशीं अपभ्रंशांतील रूपें. त्यांचीं करून–नियां–नु, अथवा करौन–नि–नियां–नु अशीं रूपें ज्ञानेश्वरकालीं होत. करोन–नि–नियां–हीं ओयुक्त रूपें ज्ञानेश्वर-कालीं अस्थानक होत. ओयुक्त रूपें पुढें तीनशें वर्षांनीं प्रचारांत आलीं.

( १४ ) मुकुंदराजी पाठ प्रशस्त आहे, हें उघड आहे.

( १५ ) जीव् = जीवाण ( वर्तमानकालवाचक धातुसाधित )
शिक्ष् = शिखाण = सिहाण, णा–णी–णें.
शहाणें हें रूप ज्ञानेश्वरोत्तरकालीन आहे, ज्ञानेश्वरकालीन नाहीं.

( १६ ) मुकुंदराजी पाठ प्रशस्त दिसतो च आहे.

---

§ 'कृतकार्यवान् = कृतकार्यां' हें समीकरण बरोबर नाहीं. याविषयी मोडकशास्त्री म्हणतात, "त्यांचे ( म्ह. राजवाडे यांचे ) मतें आं–थें मूळ वान् हा प्रत्यय आहे. पण हें म्हणणें मुळींच ठरत नाहीं. मूळ संस्कृताच्या दृष्टीनेंच कृतकार्यवान् हें रूप गचाळ व त्याज्य आहे. कर्मधारयानंतर वान्–प्रत्ययाचा निषेध संस्कृत व्याकरण करितें." [भाइसंमं. त्रै; १५.१.१५]

( १७ ) सुखाडलें† हा पाठ मुकुंदराजी असून, मजजवळील ज्ञानेश्वरीच्या प्राचीन कोशांत आहे. ख मधील र आणि व हीं दोन अक्षरें निराळीं करून सुरवाडलें असा अपपाठ बनला आहे. सुख पासून क्रियापद सुखाडणें.

( १८ ) नगरवान् = नागरवां = नागरां.

( १९ ) अग्र = अग्ग = आग+ल ( स्वार्थक ), ला, ली, लें. ल चा ळ हा उच्चार ज्ञानेश्वरोत्तरकालीन आहे. मुकुंदराजाच्या सबंद पोथींत ळ हा उच्चार बिलकुल नाहीं.

( २० ) द्यावें हें रूप व्युत्पत्तिदुष्ट आहे.

घेयावें, देआवें, नेआवें, अशीं रूपें ज्ञानेश्वरकालीं होत.

( २१ ) काज हें प्रश्नार्थकसर्वनाम ज्ञानेश्वरकालीं होतें. त्याच्या दोन्ही अक्षरांचा विभाग करून 'कां जें' असा अपपाठ बनला. अर्थात् अर्थ हि अनर्थावह झाला.

( २२ ) युद्ध = जुज्झ = जूझ. जू वर अनुनासिक किंवा अनुस्वार ज्ञानेश्वरकालीं नव्हता.

( २३ ) तया हें रूप ज्ञानेश्वरकालीन व्याकरणाच्या दृष्टीनें दुष्ट आहे. तेहाचा, तेआचा' तेयाचा, हीं रूपें ज्ञानेश्वरकालीं व चांगदेवकालीं प्रचलित होतीं.

( २४ ) अव+ईषत् = ओइच; ओइच+इल्ल = ओइचिल्ल = ओइचिल,
लां–ली–लें. ओइचिलें म्हणजे अत्यंत थोडें.

ओइचिलें ह्या शब्दाचा अर्थ न कळल्यामुळें वरिचिलें हा पाठ ज्ञानेश्वरोत्तरकालीं आला.

( २५ ) रायाचा (पु.) = रायाचेया ( पु. च. ए. ) बोला ( पु. च. ए. ) रायाची ( स्त्री. ) = रायाचिया ( स्त्री. सप्तमी एकवचन )

तेव्हां बोला ह्या पुल्लिंगी चतुर्थीच्या एकवचनी रूपापाठीमागें स्त्रीलिंगी रायाचिआ हें विशेषणरूप येणें व्याकरणदृष्ट्या दुष्ट आहे.

( २६ ) राशि – उद्भ्रम = रासि – उब्भवं = रास+उभां = रासौभां = रासौभा. रास मोडून वाऱ्यानें पखलण जी होते तिला रासौभा म्हणतात. रासौभा हा शब्द कळतनासा होऊन समासावर सडा असा जो त्या शब्दाचा अर्थ दिला होता, तो च मूळांत लेखकांनीं प्रविष्ट केला.

( २७ ) बाणरूप पाण्याचा पाऊस पाडूं लागले, तेव्हां, 'बाणवारि' हा पाठ योग्य आहे. 'बाणवरि' हा पाठ सर्वथा अशुद्ध आहे.

( २८ ) सर्वै, सकलै, दोघै, अशीं, रूपें ज्ञानेश्वरकालीं होतीं.

† 'सुरवाडलें' हाच पाठ बरोबर आहे. ज्ञानेश्वरींत व तत्कालीन इतर वाङ्मयांत 'सुरवाड' हा शब्द नेहमीं येतो. त्याचा अर्थ समृद्धि, उत्कर्ष, ऐश्वर्य, सुकाळ असा असून तो सु-वृद्धि किंवा सुवृद्धि ( सं. दुर्बुद्धि या शब्दाच्या अनुकरणाने ) या संस्कृत शब्दापासून व्युत्पादिता येतो. हा शब्द 'सुरवाड' आहे, 'सुखाड' नाहीं, हे श्री. नेने यांनीं यमकांच्या पुराव्यानें व तौलनिक पहाणीनें स्पष्ट केलें आहे. ( संशोधनलेखसंग्रह, भा. २, पृ. ३९–४० ).

( २९ ) आपण ह्याचें भाववाचक नाम आपणपें, त्याचें चतुर्थीचें एकवचन आपणपेंयां. आपण ह्याचें चतुर्थीचें नपुंसकलिंगीं एकवचन आपणआं, आपणयां. पैकीं मुकुंदराजी पाठ आपणपेयां हा अर्थाला उचित आहे.

[ ३० ] माडगांवकरांची ही सबंद ओंवी व्याकरणदुष्ट आहे व अशा व्याकरणदुष्ट ओंव्या त्यांच्या प्रतींत शेकडों आहेत.

येणेंप्रमाणें माडगांवकरांच्या तौलानिक प्रतींत हजारों अपपाठ आहेत. इतकेंच नव्हे, तर व्याकरणदृष्ट्या एथून तेथून सर्व प्रत दुष्ट आहे. कुंटे, साखरे, वगैरेंच्या प्रतींसंबंधानें, तर बोलावयाला च नको. जसा एखादा पारशी किंवा युरोपीयन मराठी भाषा लिंग, वचन, विभक्ति वगैरेंचा चुथडा करून बोलतो, त्याच धर्तीवर, कुंटे, साखरे, माडगांवकर वगैरेंच्या आधुनिक प्रतींत अपभ्रष्ट मराठी भाषा योजिलेली आहे. हे ज्ञानेश्वरकालीन व्याकरण ज्याला समजलें त्याच्या प्रतीतीस सहज येईल. ती प्रतीती यावी व ज्ञानेश्वरकालीन शुद्ध मराठी भाषा कशी होती, हें कळावें, एतदर्थ ही मुकुंदराजी प्रत छापिली आहे.

**तौलनिक पद्धतीनें मूळाचा थांग नक्की लागतोच असें नाही.**

मूळ प्रत उपलब्ध नसतां, इतर किती हि प्रतींची तुलना करून मूळ पाठ ठरविण्याचा प्रयत्न केला, तत्रापि मूळपाठ अमुक च असेल, हे निश्चयानें सांगतां येत नाहीं, हें वरील यादीवरून स्पष्ट आहे. प्रायः असें हि होऊं शकतें कीं, मूळपाठ टिपांत रहातो व अपपाठ मुख्य ग्रंथांत विराजमान होतो. Variorum edition काढण्यांत हा चमत्कार अपरिहार्य असतो. कालिदासादि संस्कृतप्राकृत नाटककारांच्या नाटकांच्या अनिश्चितकालीन दहा पांच पोथ्या घेऊन तौलनिक प्रती बनविल्या असतां, मूळग्रंथकाराच्या मूळप्रतीपासून त्या किती अपभ्रष्ट असूं शकतील तें माडगांवकरांच्या ज्ञानेश्वरीच्या प्रतीवरून चांगलें ध्यानांत येतें.

**ज्ञानेश्वरीचे अपभ्रष्ट पाठ व त्या पाठांचीं भ्रामक भाषान्तरें**

●६५. सारांश, आजपर्यंत जेवढ्या ह्मणून ज्ञानेश्वरीच्या प्रती छापिल्या गेल्या आहेत, त्या सर्व अशुद्ध व अविश्वसनीय आहेत. तत्रापि, त्या लोकांत प्रचलित आहेत. सध्यां भक्तिमार्गी लोक इतके गचाळ झाले आहेत कीं व्याकरण, व्युत्पत्ति, इतिहास, शास्त्र यांची त्यांना बिलकुल पर्वा राहिलेली नाहीं. वाटेल तें चिताड त्यांच्या हातीं दिलें व तें ज्ञानेश्वराचें, नामदेवाचें किंवा तुकारामाचें आहे असें सांगितलें ह्मणजे तें त्यांना शिरसामान्य होतें. खरें, खोटें, विश्वास्य, अविश्वास्य हा भेदभाव ते करीत नाहींत त्यामुळें झालें आहे काय कीं, त्यांना ज्ञानेश्वरीचा खरा अर्थ हि कळतनासा झाला आहे. कोल्हापूरचे भावे, पनवेलचे आठल्ये, व पुण्याचे भिडे ह्यांनीं ज्ञानेश्वरीचा अर्थ करण्याचा प्रयत्न केला आहे, परंतु स्पष्टपणें सांगावयास कांहीं हरकत दिसत नाहीं कीं, हे सर्व व्याख्याते अथपासून इतिपर्यंत अपव्याख्यान करीत गेलेले आहेत. पैकीं आठल्यांचें भाषान्तर अगदीं कुचकामाचें व कवडीमोल आहे. त्यापेक्षां भावे यांचें भाषांतर किंचित् बरें ह्मणतां येईल, आणि साखरेबावांच्या तोंडचें

ह्मणून ज्यास रा. भिडे नामाभिधान देतात तें ह्या दोहींपेक्षां शुद्ध आहे. परंतु, तिन्ही भाषान्तरां-संबंधानें असें ह्मणावें लागतें कीं, ह्या तिही गृहस्थांना घेतलेली कामगिरी बिनचूक बजावण्याचा अधिकार आलेला नव्हता. ह्या विधानाची सत्यता भासमान होण्याकरितां, ज्ञानेश्वरीची अगदी पहिली ओंवी घेतों, तिचा ह्यांनीं काय अर्थ केला आहे तो देतों व ह्यांच्या चुका कोठें झालेल्या आहेत तें दाखवितों. भावे यांचें भाषान्तर आतां मागसलें असल्यामुळें, त्याची परीक्षा येथें करीत नाहीं.

**आठल्यांचें भाषान्तर** :—हे मूळ, अनादि, वेदप्रतिपादित, ओंकाररूप परमेश्वरा ! तुला नमस्कार असो. हे आपल्या आपण जाणणाऱ्या आत्मस्वरूपा ! तुझा जयजयकार असो.

**भिड्यांचें भाषान्तर** :—हे निर्गुणब्रह्म आत्मरूपा, तूं सर्वांचा आदि असून तुझें वेदांनीं वर्णन केलेलें आहे व तुझ्या स्वरूपास जाणणारा तूं स्वतः च आहेस. तुला माझा नमस्कार असो; आणि तुझा जयजयकार होवो.

पैकीं, आठल्ये यांच्या भाषान्तरांतील प्रत्येक शब्द चुकलेला आहे. ( १ ) प्रथम, जे नामरूपरहित जें परब्रह्म त्याला परमेश्वर ह्या नांवानें संबोधतात. ( २ )

**आठल्यांचें भाषान्तर** दुसरें, परब्रह्माला ते अनादि ह्मणतात. ( ३ ) तिसरें, तें वेदांनीं प्रतिपादित आहे, असा भ्रम त्यांनीं करून घेतला आहे. आणि ( ४ ) चौथें, परब्रह्म आपल्याआपण जाणणारें आहे, असा दुर्ग्रह त्यांच्या ठायीं झालेला आहे. आतां, ह्या चारी विधानांपैकीं एक हि विधान सशास्त्र नाहीं. ( १ ) परमेश्वर ही कोटी परब्रह्माहून निराळी, खालच्या दर्जाची व तत्पश्चात्क आहे, हें सर्वश्रुत च आहे. ह्या ओंवींत परमेश्वराचें नांव नाहीं, इतकेंच नव्हें, तर परब्रह्माचें हि नांव नाहीं. कारण, परब्रह्माचें जर नांव घ्यावें तर तें सगुण ह्मणजे नामरूपसहित होतें. सबब, ज्ञानेश्वरांनीं ह्या सबंद ओंवींत त्याचा नामनिर्देश केला नाहीं. एवढेंच नव्हे, तर तत् ह्या सर्वनामानें हि त्याचा उल्लेख केला नाहीं. ज्ञानेश्वरांचीं हीं सर्व धोरणें आठल्यांनीं झुगारून दिलीं आहेत व आपलें गाढ अज्ञान प्रकट केलेलें आहे. ( २ ) प्रपंच, माया, परमेश्वर, ह्या कोटींना अनादि हें विशेषण लावतात. कारण प्रपंच हा अनादि व अनंत असून, केवळ व्यक्तमध्य आहे. तत् ही वस्तु सर्वत्र व सर्वदा आद्य च असणार. तिला अनादि हें विशेषण लावणें अयुक्त आहे. ( ३ ) ही निर्गुण वस्तु आजपर्यंत कोणाला हि संपूर्ण कळलेली नाहीं. कळण्याचा प्रयत्न पुष्कळांनीं केलेला आहे. त्या प्रयत्न करणाऱ्यांपैकीं च वेद होत. त्यांना हि ती आकळलेली नाहीं. सबब, ज्ञानेश्वरांनीं वेदप्रतिपाद्य असा शब्द योजलेला आहे. वेद-प्रतिपादित असा शब्द मुद्दाम योजला नाहीं. परब्रह्म जर वेदांनीं प्रतिपादित केलें असेल, तर तें वेदांहून गौण ठरूं लागेल. वेदांनीं एवढें च केलें आहे कीं, परब्रह्माचें प्रतिपादन करण्याचा प्रयत्न केलेला आहे. ह्या पलीकडे त्यांनीं कांहीं केलेलें नाहीं. एवढ्या च करितां, ज्ञानेश्वरांनीं प्रतिपादित

हा शब्द टाळलेला आहे. तो दुष्ट शब्द आठल्यांनीं अंबट्टीनें गुड्डाम कवटाळला आहे. सद्वस्तूचें आकलन करतां करतां वेद टेंकीस आले, असे उद्गार ज्ञानेश्वरींत व अमृतानुभवांत अनेक स्थळीं आहेत. ( ४ ) स्वसंवेद्या या पदाचा तर शब्दार्थ हि आठल्यांस झाला नाहीं. स्वसंवेद्या ह्मणजे आपल्याआपण जाणणाऱ्या, असा अनर्थ आठल्ये च करूं जाणोत. सत् चित् च आहे. त्याला आपलें संवेदन आपण च करण्याची कोणती अपेक्षा आहे ? काय त्याचें संवेदन कधीं लोप पावलें होतें कीं तें पुनरपि करून घेण्याचें त्याला कारण पडावें ? काय साखर कधीं कडू झाली होती कीं तिनें आपली गोडी आपण च चाखून पहाण्याचें मनांत आणावें ? तर, असें विपरीत कदापि होणें नाहीं. संवेद्य कोणाला ? इतरांना, स्वतःला नव्हे. स्व ह्मणजे जीवात्मा, त्याला संवेदन होण्याचा विषय. तें संवेदन हि संपूर्ण होईल च असा भाग नाहीं. ज्याचें संवेदन, ज्या सद्वस्तूचें संवेदन करून घेण्याचा प्रयत्न जीवात्म्यानें करणें संभाव्य आहे, अशा तद्वस्तूला, असा स्वसंवेद्या ह्या पदाचा अर्थ आहे. चित् संबंधानें नाना कोटया ज्ञानेश्वरांनीं अमृतानुभवांत केलेल्या आहेत. त्यांचा जर परिचय आठल्यांनीं करून घेतला असता, तर ते असे बरळते ना. स्व आणि पर असे दोन प्रकारचे आत्मे कल्पिलेले आहेत. ह्यांना च जीवात्मा व परमात्मा अशा संज्ञा आहेत. संवित् ही दोघांना सामान्य आहे. ह्या संविद्द्वारा जीवात्म्याला परमात्म्याशीं ऐक्य होण्याचा संभव असतो. संवित्प्रतीति न झाली, तर ऐक्य होण्याचा ह्मणजे परमात्मसंवेदन होण्याचा मार्ग खुंटतो. हें सर्व लक्ष्यांत घेऊन ज्ञानेश्वरांनीं स्वसंवेद्य हें पद योजिलेलें आहे; आणि त्याला पोषक ह्मणून आत्मरूपा असें पद घातलें आहे. जीवात्म्यानें संवेद्य कां, तर जीवात्मा व परमात्मा हे दोन्ही हि आत्मरूप ह्मणजे आत्मा च आहेत. आत्मा एव आत्मरूपः । जीवात्मा व परमात्मा हा भेद भ्रांतिमूलक आहे. ती भ्रांति उडून गेली ह्मणजे दोन्ही एक च आहेत, अशी प्रतीति होते. सारांश, ह्या ओवींत एक कारणपरंपरा गोविली आहे. सद्वस्तु आद्य आहे; कारण, अनादि जे वेद त्यांनीं तिची प्रतिपत्ति करण्याचा प्रयत्न केला आहे; परंतु, तो प्रयत्न सफल झालेला नाहीं. कां कीं ही सद्वस्तु जीवात्म्याला च संवेद्य आहे, इतरांना नाहीं. कां तर, जीवात्मा व परमात्मा आत्मरूप आहेत.

**भिडयांचें भाषान्तर**

आठल्यांच्या इतका घोटाळा भिडयांनीं केलेला नाहीं. त्याला कारण सद्गुरुमुख. नाना-बोवा साखरे यांच्यासारख्यांच्या व्याख्यानाच्या श्रवणानें भिडे किंचित् ताळयावर राहिलेले दिसतात मात्र. परंतु, अनधिकारित्वास्तव ते हि ह्या ओंवीचा अर्थ करतांना भ्रांत झालेले आहेत. "तुझें वेदांनीं वर्णन केलेलें आहे", असें संपूर्ण-क्रिया-द्योतक वाक्य भिडयांनीं योजिलें असून, "तुझ्या स्वरूपास जाणणारा तूं स्वतः च आहेस" असें हि वाक्य योजून स्वमुखदर्शनदोष ते आठल्यांच्या प्रमाणें च करतात. आठल्यांच्याप्रमाणें अनादि, परमेश्वर, वगैरे बाष्कळ शब्द मात्र ते योजीत नाहींत. हा सद्गुरुसंगतीच्या सातत्याचा परिणाम. ह्या ओंवींत कारणपरंपरा आहे, ह्याची प्रतीति भिडयांना हि झालेली दिसत नाहीं.

वेदान्तशास्त्रानभिज्ञतेच्या मुळें ओंवीचा अर्थ भाषान्तरकारांना कसा लागला नाहीं, त्याचा हा तपशिल झाला. आतां व्याकरणानभिज्ञतेस्तव त्यांच्या चुक्या कशा झाल्या आहेत तें दाखवितों.

**व्याकरणदृष्ट्या भाषान्तरांची दुष्टता**

ॐ नमो आद्या । वेदप्रतिपाद्या ।
जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥ १ ॥

अशी ओंवी आहे. अन्वय :—आद्या वेदप्रतिपाद्या नमो; स्वसंवेद्या आत्मारूपा जय. येथें नमो व जय हीं रूपें आशार्थी द्वितीयपुरुषाचीं अनेकवचनाचीं आहेत.

| संस्कृत | प्राकृत | अपभ्रंश | मराठी |
|---|---|---|---|
| नमत | नमह | नमहु | नमूँ, नमो |
| जयत | जयह | जयहु | जयूँ, जयो, जय |

नम् व जी ह्या धातूंचीं रूपें ग्रंथारंभीं नांदींत आणण्याचा परिपाठ प्राकृत व संस्कृत ग्रंथांत अनेक स्थलीं आढळतो. गाथासप्तशतींत, सेतुबंधांत व कर्पूरमंजरींत नांदींत नमह व जअह हीं रूपें आलीं आहेत. नमह–नमहु–नमो ह्मणजे तुह्मीं नमस्कार करा. जय ह्या धातूचा अर्थ मराठींत " कोणासाठीं तरी जयशब्द उच्चारणें " असा झाला आहे. उदाहरणार्थ, जय शंकरा ( शंकराचा जयकार करा ). तेव्हां, पहिल्या ओंवीचा व्याकरणदृष्ट्या अर्थ असाः—

" आद्या वेदप्रतिपाद्या नमस्कार करा; स्वसंवेद्या आत्मरूपाचा जयकार करा; " ज्ञानेश्वर श्रोत्यांना स्वहितार्थ आद्याला नमस्कार व प्रणाम करावयाला सांगतात व त्याचा जयकार करावयास सांगतात. नांदींत श्रोत्यांना इष्टदेवतेला नमस्कार करण्यास सांगण्याची चाल संस्कृत व प्राकृत नाटकांत व काव्यांत आहे. ती च परंपरागत चाल ज्ञानेश्वरांनीं उचललेली आहे. ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरी श्रोत्यांना उद्देशून मुद्दाम लिहिलेली आहे; स्वतःला उद्देशून लिहिलेली नाहीं. एतद्विषयक उल्लेख ज्ञानेश्वरींत अनेक आहेत; बहुतेक प्रत्येक अध्यायांत आहेत. तेव्हां, ह्या ओंवींतील क्रियापदें द्वितीयपुरुषीं अनेकवचनीं आज्ञार्थी आहेत, हें ठीक च आहे.

आठल्ये व भिडे परब्रह्माला सांगतात कीं, तुझा जयजयकार असो! परब्रह्माचा जयजयकार नव्हता कधीं, कीं तुझा जयजयकार असो, असा आशीर्वाद कवीनें त्यास देण्याचें धाष्टर्य व औद्धत्य करावें. " तुला नमस्कार असो " (आठल्ये), " तुला माझा नमस्कार असो." ( भिडे ), ह्या हि भाषान्तराला हा च दोष लागतो. शिवाय ग्रंथकर्त्यानें आपण एकट्यानें च नमस्कार करण्यापेक्षां, श्रोत्यांसह नमस्कार करणें जास्त सौजन्याचें आहे. ज्ञानेश्वर, तर, सौजन्याचे केवळ पुतळे च होते. तेव्हां त्यांच्या तोंडून, तुला माझा नमस्कार असो, अशी उद्धत वाणी कदापि हि निघावयाची नाहीं.

वेदान्तशास्त्रदृष्ट्या व व्याकरणदृष्ट्या आठल्ये, भिडे, कुंटे व माडगांवकर ह्यांच्या प्रतींत असे हजारो दोष आहेत. मासल्याकरितां, एका च ओंवींतील दोष दाखविले. जास्त दाखविण्यास प्रकृत स्थलीं अवकाश नाहीं. शिवाय, हे दोष दाखविण्याचें काम हरिभक्तिपरायण भिंगारकरबुवा

याणीं केसरींत अनेक वेळां केलेलें आहे. भारदे उर्फ भारद्वाज ह्यांच्या चर्पटपंजरीचा, तर, त्यांनीं "ज्ञानेश्वरमहाराज यांचा कालनिर्णय व संक्षिप्त चरित्र" या टीकाप्रबंधांत चांगला च धुव्वा उडविला आहे. आळव्यांच्या चुक्या हि त्यांनीं अन्यत्र चांगल्या दाखविलेल्या आहेत. ह्या गृहस्थांनीं जर ज्ञानेश्वरीच्या अर्थाचें पुस्तक छापलें, तर, ज्ञानेश्वरीच्या नांवावर चिताड व गचाळ बाडें भक्तिमार्गी लोकांत जो खोट्या वेदान्ताचा व भोळेपणाचा प्रसार करतात त्याला कांहीं आळा पडून ऐतिहासिक व प्रागतिक मार्गाला भक्तिमार्गी लोक लागतील.

●६६. प्रस्तुत मुकुंदराजी प्रतींत प्रत्येक श्लोक त्या श्लोकावरील ओंव्यांच्या मध्यें कोठें तरी लिहिला आहे. आधुनिक प्रतींत मूळ संस्कृत श्लोक प्रथम देऊन, नंतर त्याच्यावरील टीका-ओंव्या देण्याचा जो प्रघात दिसतो, तो मूळचा ज्ञानेश्वराचा नाहीं. ज्ञानेश्वरांनीं ओवीबंधांत ज्ञानेश्वरी अशी रचिली कीं मूळ संकृत श्लोक मुळीं च न दिला, तथापि व्याख्यानाच्या ओघाला तुटकपणा येऊं नये. अलीकडील कित्येक पोथ्यांत दर प्रतीकाच्या व पदाच्या नंतर ज्ञानेश्वरी टीका ओंव्यांचे तुकडे पाडून मुद्दां दिलेली असते. हा हि प्रकार मूळ ज्ञानेश्वराचा नव्हे. हे सर्व चोचले आधुनिक आहेत.

●६७. प्रस्तुत प्रतींत मूळ संस्कृत श्लोकांचे पाठ प्रचलित गीतेच्या पाठांहून कोठें कोठें भिन्न सांपडतात. त्यांची याद खालीं देतों. ‡

ज्यांच्या पाठीमागें नक्षत्राचें चिन्ह काढलें आहे त्यांखेरीज बाकीचे सर्व पाठभेद उच्चाराचे आहेत. सनक्षत्र पाठभेदांपैकीं हि बरे च पाठभेद उच्चाराचे च पाठभेद असावे, असें ह्मणता येईल. उदाहरणार्थ, शी बद्दल शि, ये बद्दल ए, च्य बद्दल च. काशिराजः, एषां, चवंति, हे पाठभेद उच्चाराचे पाठभेद न समजले, तर ते स्वतंत्र पाठभेदांत गणले जातील. लेखकाला उच्चार करण्याची जी स्वभावसिद्ध व देशसिद्ध सवंय होती तिच्या अनुरोधानें त्यानें हे उच्चार-पाठ दिले आहेत. ह्या उच्चारपाठांचें वर्गीकरण येणेंप्रमाणें करतां येतें.

( १ ) ऋ बद्दल रु. जसें, ऋते बद्दल रुते
( २ ) ए बद्दल ऍ. जसें, वेत्ति बद्दल वैत्ति
( ३ ) निरनुनासिकाबद्दल सानुनासिक. जसें, इव बद्दल इवँ आणि मे बद्दल मँ
( ४ ) स, श व ष ह्यांच्या पूर्वीं विसर्गलोप. जसें, एभिसर्वं, भक्त श्रद्धया, उच्चैश्रवस
( ५ ) रेफानंतर द्वित्त. जसें, कीर्त्ति, धर्म्म, कर्म्म, तैर्द्दत्तान्.
( ६ ) च्य बद्दल च. जसें, चवंति
( ७ ) च्छ बद्दल छ. जसें, गछति
( ८ ) द्ध बद्दल त्थ. जसें, योगात्थनंजय

‡ ही यादी येथें वगळली आहे. त्याची कारणे राजवाडे यांच्या विवेचनात च अंतर्भूत आहेत.

( ९ ) ध्य बद्दल ध्य. जसें, युध्य
( १० ) ध्य बद्दल ध्य. जसें, युद्ध्यस्व
( ११ ) ब बद्दल व. जसें, किल्विषं
( १२ ) श बद्दल ष. जसें, गुडाकेषः
( १३ ) श बद्दल स. जसें, अशक्तः बद्दल असक्तः
( १४ ) रु बद्दल ऋ. जसें, श्रशृ
( १५ ) ष बद्दल : . जसें दुःपूर
( १६ ) स बद्दल श. जसें, सृष्टं बद्दल शृष्टं
( १७ ) त्त्व बद्दल त्व. जसें, तत्त्व बद्दल तत्व
( १८ ) श्य बद्दल स्य. जसें, पूज्यश्य बद्दल पूज्यस्य

हे पाठभेद किंवा उच्चारभेद लेखकानें चुकून केले आहेत, असें नाहीं. त्याच्या वेळची व प्रांतांतली सामान्य मंडळी जे उच्चार करीत, ते ह्या लेखकानें नमूद केले आहेत. मुकुंदराजी ज्ञानेश्वरींतील संस्कृत श्लोकांतल्या अक्षरांचे जे उच्चार वर नमूद केले आहेत, त्यावरून संस्कृत उच्चारांचा अपभ्रंश गोदावरीतीरीं शक १२०० च्या सुमारास कसा होत असे, तें कळण्याचें एक उत्कृष्ट साधन उपलब्ध झालें आहे.

**ज्ञानेश्वरींत फारसी शब्द नाहींत**

●६८. मुकुंदराजी ज्ञानेश्वरींत ह्मणजे कोणत्या हि ज्ञानेश्वरीच्या विश्वसनीय व अप्रक्षिप्त प्रतींत फारसी शब्द आढळत नाहींत.† ज्ञानेश्वरी शक १२१२ त रचली गेली व त्यानंतर मुसलमानांचा महाराष्ट्राला स्पर्श झाला. तत्पूर्वी यद्यपि शंभर वर्षें ह्मणजे शक ११०० पासून नर्मदेपलीकडे मुसुलमानांचें राज्य सुरू झालें होतें, तत्रापि महाराष्ट्राला व मराठी भाषेला मुसुल्मानी व फारसी शब्दांचा स्पर्श झाला नाहीं. तो शक १२०० नंतर पांच पन्नास वर्षांनीं मुसुल्मानी अंमल जारी झाल्यावर झाला. अर्थात्, ज्ञानेश्वरींत फारसी शब्द साहजिक च आढळत नाहींत. इंग्रजी भाषेच्या स्पर्शासंबंधानें असा च प्रकार झालेला आढळतो. बंगाल, मद्रास वगैरे देशांत यद्यपि इंग्रजांचा अंमल बसून पन्नास शंभर वर्षें लोटलीं, तथापि इंग्रजी शब्द मराठींत शक १७३९ नंतर येऊं लागले. तत्पूर्वी गोलंदाज, कडाबीन, पलटण, वगैरे कांहीं डच, फ्रेंच, पोर्तुगीज वगैरे लष्करी शब्द मराठींत आले, परंतु इंग्रजी शब्द आले नाहींत. कारण उघड आहे. मराठ्यांच्या लष्करांत ज्या खालच्या प्रतीच्या यूरोपियन शिपायांचा संबंध आला ते

† वरील विधान अगदी शंभर टक्के बरोबर नाही. कारण यादवकालातील कोरीव लेखांतून काही फारसी शब्द आढळत असल्याने ज्ञानेश्वरींतही एखादुसरा फारसी शब्द असणे शक्य आहे.

प्रथम प्रथम प्रायः पोर्तुगीज, डच, फ्रेंच वगैरे असत, इंग्रज नसत. शक १२०० पूर्वी मुसुलमानी शिपायांचा प्रवेश कल्याणी येथील चालुक्यांच्या व देवगिरीच्या यादवांच्या सैन्यांत झाला असावा, असें ह्मणण्यास पुरावा आहे. शक १०५१ त लिहिलेल्या अभिलषितार्थचिंतामणींत आठ प्रकारचें सैन्य वर्णिलेलें आहे; त्यांत म्लेच्छ सैन्याचा उल्लेख आहे. म्लेच्छ ह्मणजे मुसुलमान. अर्थात्, कदाचित् कांहीं लष्करी शब्द मराठी भाषेंत शक १०५१ च्या सुमारास आले असण्याचा संभव आहे. खुद्द अभिलषितार्थचिंतामणींत च तेजी ( घोडा ) हा फारसी शब्द आला आहे. हिंगु, पोतास वगैरे यावनी शब्द ह्याच्या हि पूर्वी हिंदुस्थानांतील प्राकृत व अर्थात् संस्कृत भाषांत व्यापारसंबंधानें प्रचलित झाले होते. हा पोतास शब्द यावनी आहे, फारसी नाहीं; व हा फार प्राचीन कालापासून संस्कृत भाषेंत प्रविष्ट झाला आहे. तेव्हां हा पोतास शब्द ज्ञानेश्वरींत सांपडला असतां, तो फारसी ह्मणून गणण्यांत हाशील नाहीं. निशाण, दादर, बलार मोहरें, हेवा वगैरे शब्द भिंगारकर वगैरे ह्मणजे फारसी समजतात. परंतु, ते अस्सल मराठी आहेत. संस्कृत निःसाण ह्मणजे नगारा. ह्याचा मराठी अपभ्रंश निसाण, निशाण. हा पटहार्थक निशाण शब्द फारसी निशान (ध्वजपताका) शब्दासारखा च उच्चारांत आहे. परंतु, ह्या दोहोंत अर्थभेद आहे. मराठी निशाण ह्मणजे नगारा व फारसी निशान [ ण ] ह्मणजे ध्वजपताका. संस्कृत दरदर = प्राकृत दादर. दर = विवर. संस्कृत वर्षागृह = प्राकृत वलाअर = मराठी बलार. संस्कृत मुखहर = प्राकृत मुहअर = मराठी मोहर ( रा, री, रें ). संस्कृत हृद्यन् = हिअवा = मराठी हेवा. हेवा = मनींची उत्कट ओढ. सारांश, ज्ञानेश्वरींत फारसी किंवा अरबी शब्द नाहींत.

● ६९. ज्याअर्थी मुकुंदराजी ज्ञानेश्वरींत फारसी शब्द नाहींत त्याअर्थी ज्ञानेश्वरकालीन ह्मणून नांवाजलेल्या कोणत्या हि अस्सल लेखांत प्रायः फारसी शब्द येणें दुर्मीळ आहे. तशांत, फारसी उभयान्वयी अव्ययें ज्या ज्ञानेश्वरकालीन ह्मणविणाऱ्या लेखांत येतील तो लेख अर्वाचीन ह्मणजे मुसुलमानी रियासतीतला बिनधोक समजावा. उदाहरणार्थ, भिंगारकरकृत "श्रीज्ञानेश्वर-महाराज यांचा कालनिर्णय व चरित्र" ह्या निबंधाच्या ६० व ६१ या पृष्ठांवर दिलेलीं शक ११२९ व शक ११३५ सालचीं दोन्हीं पत्रें अस्सल नसून बनावट आहेत. कारण त्या दोन्हीं लेखांत फारसी 'कीं' हें उभयान्वयी अव्यय आलें आहे. फारसींत के असें उभयान्वयी अव्यय आहे त्याचें मराठी की, कीं. हें कीं अव्यय रामदास व शिवाजी यांच्यानंतर मराठींत रूढ झालें. ज्ञानेश्वरकालीं व ज्ञानेश्वराच्या पूर्वी फारसी 'कीं' किंवा इंग्रजी that या उभयान्वयी अव्ययाच्या-बदला जे, जें असें उभयान्वयी अव्यय नियमानें योजीत. ह्या 'कीं' खेरीज, भिंगारकरांच्या ह्या दोन्हीं पत्रांत इतर आणीक अशीं शेकडों रूपें आहेत कीं त्यांच्यावरून ह्या पत्रांचा बनावटपणा स्पष्ट करून दाखवितां येईल. भिंगारकरच्या पत्रांतील हीं शेकडों रूपें आधुनिक व बनावट कां, हें नीट लक्ष्यांत येण्यास, मराठी भाषेचें ऐतिहासिक व्याकरण अथवा नुसतें ज्ञानेश्वरीचें व्याकरण चिकित्सक वाचकांपुढें मांडलें पाहिजे. मराठी भाषेचें हें ऐतिहासिक व्याकरण येथें च द्यावयाचें. परंतु, मराठी भाषेच्या स्थित्यंतरांची त्रोटक हकीकत व मुकुंदराजी पोथीचा तपशील देतां देतां च

फार विस्तार झाला. सबब, ऐतिहासिक व्याकरण पुढील भागावर टाकणें अपरिहार्य आहे. तोंपर्यंत सरस्वतीमंदिरादि मासिक पुस्तकांतील मराठीच्या ऐतिहासिक व्याकरणावरील माझे निबंध जिज्ञासूंना एतत्प्रकरणीं बरे च उपयोगाचे होतील असें वाटतें.

●७०. ज्ञानेश्वरींत एकंदर जी ओवीसंख्या आहे तिचा सरासरीनें निम्मा भाग पहिल्या बारा अध्यायांत येतो; आणि बाकीचा निम्मा भाग राहिलेल्या सहा अध्यायांत येतो. प्रस्तुत पहिला खंड ह्या पहिल्या बारा अध्यायांचा आहे. ह्या खंडाला दुर्बोध शब्दांच्या अर्थांची याद दिली आहे.

●७१. ज्ञानेश्वराचें चरित्र, नाथपंथाची हकीकत, ज्ञानेश्वराचा वेदान्त, भक्तिमार्गाच्या अनादिसिद्ध व ऐतिहासिक परंपरेचें वर्णन, वगैरे अनेक विषयांवर बहुत विवेचन करण्यासारखें आहे. तें, ज्ञानेश्वरांचे इतर अस्सल जुने ग्रंथ मिळून छापण्याचा योग आल्यास, यथावकाश करतां येईल.

**॥ नटकृततांडवविकटाः पंडितटीकाः स्फुरंति गीतायां ॥**
**॥ रंभालास्यविलासा जयति ज्ञानेश्वरी तासु ॥**

* * *

# ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण*

१. ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावनेंत मराठी भाषेचा स्थूल इतिहास सांगितला. येथें ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण देतों.

२. व्याकरणांत खालील प्रकरणें येतील :—

१. वर्णेतिहास
२. आदेशेतिहास
३. नामविभक्तिप्रत्ययेतिहास
४. क्रियाविभक्तिप्रत्ययेतिहास
५. निपातेतिहास.

पैकी दुसऱ्या प्रकरणाचा, ह्मणजे आदेशेतिहासाचा प्रपंच शेवटीं करण्याचा विचार आहे.‡ शब्दांतील कोणत्या हि वर्णाचा किंवा वर्णसमुदायाचा नाश करून त्याच्या स्थानीं जो नवा वर्ण येतो त्याला आदेश ह्मणतात. आर्यभाषा, पाणिनीय भाषा, प्राकृत भाषा, अपभ्रंश भाषा व मराठी भाषा, अशी परंपरा आहे. तेव्हा अपभ्रंशांतून मराठींत येत असतां, शब्दांतील कोणत्या वर्णांचा किंवा वर्णसमुदायाचा नाश होऊन तत्स्थानीं कोणत्या नव्या वर्णाचा आदेश होतो, त्याचा प्रपंच ह्या प्रकरणांत व्हावयाचा आहे. मराठी अपभ्रंशोत्पन्न असल्यामुळें, दृष्टि प्रायः अपभ्रंशापर्यंत पोहोंचवावयाची आहे. प्राकृत किंवा संस्कृत शब्दांशीं मराठी शब्दांतील वर्णांची तुलना करण्याचें मुख्य प्रयोजन नाहीं. ह्या आदेशप्रकरणाला च यूरोपियन वैय्याकरण Phonology किंवा Phonetics ह्मणतात. §

---

* राजवाडे यांचे वरील व्याकरण " हा एक मराठीच्या ऐतिहासिक व्याकरणाचा पूर्व-प्रयत्न आहे, पण माहिती अपुरी आहे, " असा अभिप्राय ज्युल् ब्लोक यांनी व्यक्त केला होता ( मराठी भाषेचा विकास–परांजपेकृत भाषान्तर, पृ. ५६ ).

‡ हा विचार कल्पनेतच राहून गेला. प्रत्यक्षात राजवाडे यांनी आदेशेतिहासाचा विचार केलेला नाही. तो पुढे स्वतंत्र पुस्तकरूपाने करण्याचा विचार त्यांनी या व्याकरणाच्या अखेरीस बोलून दाखविला आहे.

§ Phonology व Phonetics हे शब्द भिन्नार्थी आहेत. Phonology ह्मणजे कोणत्याहि भाषेच्या इतिहासात दिसून येणारे वर्णविकार, तर Phonetics ह्मणजे ध्वनिशास्त्र किंवा भाषेतील ध्वनींच्या निर्मितीचा व श्रुतीचा अभ्यास आणि त्यांचे विश्लेषण. परंतु पुष्कळदा हे दोन शब्द

[ टीप – पुढील पानावर चालू ]

## प्रथमान्हिक

### ३. वर्णेतिहास

#### वर्ण

अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, लृ, ‡ ए, ऐ, ओ, औ, ं, § क्, ख्, ग्, घ्, ङ्, च्, छ्, ज्, झ्, ञ्, च़्, छ़्, ज़्, झ़्, ञ़्, * ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, त्, थ्, द्, ध्, न्, प्, फ्, ब्, भ्, म्, य्, र्, ल्, व्, श्, ष्, स्, ह्, ः, † असे ५२ वर्ण ज्ञानेश्वरींत आहेत.

### ४. स्वर

अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, लृ, ए, ऐ, ओ, औ, असे १२ स्वर आहेत.

( १ ) न्हस्व अथवा एकमात्रक :—अ, इ, उ, ऋ. लृ.

( २ ) दीर्घ अथवा द्विमात्रक :—आ, ई, ऊ, ए, ऐ,* ओ, औ*

~~~~~~

[ टीप – मागील पानावरून चालू ]

त्यांत भेद न करतां परस्परार्थी वापरले जातात. Phonetics, Phonology व Phoneme यांच्या ब्लूमफील्ड-कृत व्याख्या पुढीलप्रमाणे आहेत :—

**Phonetics :** The science, study, analysis and classification of sounds.

**Phonology :** The study of the changes & etc. of speech-sound during the history of a language or a dialect.

**Phoneme :** " A minimum unit of distinctive sound-feature. "

‡ राजवाडे-मतानुसार दीर्घ ऋ-प्रमाणे दीर्घ लृ-ही ज्ञानेश्वरीत नाही.

§ सानुनासिक स्वर.

* या पाच दंत्यतालव्य व्यंजनांचे निराळेपण त्यांच्यावर ^ अशी खूण देऊन दाखविले आहे.

† विसर्ग. ( हा स्वतंत्र वर्ण आहे काय ? )

* ऐ ( अ+इ ) आणि औ ( अ+उ ) हे संयुक्त स्वर आहेत. त्यांचा समावेश इतर दीर्घ किंवा द्विमात्रक स्वरांत करतां येणार नाही. येथून पुढील स्वरप्रकारांची केवळ शक्यता सूचित केली आहे. हे स्वरांचे वर्गीकरण नव्हे.
~~~~~~

( ३ ) प्लुत † अथवा त्रिमात्रक :--सर्व स्वर.
( ४ ) उदात्त † :--सर्व स्वर.
( ५ ) अनुदात्त † :—सर्व स्वर.
( ६ ) स्वरित † :—सर्व स्वर.
( ७ ) सानुनासिक :—सर्व स्वर.
( ८ ) निरनुनासिक :---सर्व स्वर.

## इतिहास

( १ ) जसे आर्ष भाषेला स्वर आहेत, तसे च ज्ञानेश्वरी भाषेला आहेत. ज्ञानेश्वरी स्वरांत वाचीत व वाचतात.* सध्यां हि पुराणिक पुराण, हरिदास कथा, आणि बायका वटसावित्री वगैरे कहाण्या स्वरांत सांगतात. सारांश, आर्षकालापासून आतांपर्यंत उदात्त, अनुदात्त व स्वरित अशा स्वरांत बोलण्याची परंपरा कायम आहे. इतकें च कीं वर्तमान मराठींत व्यवहारांतील गद्य बोलण्यांत स्वर फार माफक योजतात.

( २ ) संस्कृतांतील दीर्घ ॠ ज्ञानेश्वरी मराठींत नाहीं.

( ३ ) मराठींतील अनुनासिकाची परंपरा आर्षकालापासूनची आहे. एतत्संबंधीं विवेचन ग्रंथमाला मासिकपुस्तकांत साद्यन्त केलें आहे.‡

( ४ ) ऋ, ॠ, ऌ, ऐ आणि औ हे पांच स्वर अपभ्रंशांत नव्हते. ज्ञानेश्वरी–मराठींत आहेत. अपभ्रंश शक ४०० च्या सुमारास नष्ट झाला व त्या च सुमारास मराठी सुरू झाली.

---

† ज्ञानेश्वरींत प्लुत स्वर आहेत व ज्ञानेश्वरींतील सर्व स्वर उदात्त, अनुदात्त व स्वरित असतात हीं राजवाड्यांचीं विधानें अ–वास्तव वाटतात. वरील स्वरप्रकार वैदिक भाषेंत असले तरी त्यानंतर लौकरच ते नाहीसे झाले.

* या दृष्टीनें ज्ञानेश्वरींतील पुढील ओवी सूचक आहे :—" तैसी गाणीव तें मिरवी। गीतेंविण रंगु दावी। ते लोभाचां बंधु ओवी। केली मियां ॥ " ( ज्ञा. १८.१७२० ).

‡ राजवाडे लेखसंग्रह, भा. २ ( संकीर्ण निबंध ), पृ. १८१. अनुनासिकविषयक या विवेचनाचें तात्पर्य राजवाडे पुढीलप्रमाणें सांगतात :—" पाणिनिकालीन संस्कृत, तदुत्तरकालीन महाराष्ट्री व महाराष्ट्रीच्या पुढें अर्वाचीन मराठी अशी ही जागती परंपरा आज तीन हजार वर्षें चालत आली आहे. दधिं या शब्दांतील वैकल्पिक अनुस्वार पाणिनीच्या कालीं जसा संस्कृत भाषेंत होता, तसा च तो तदुत्तरकालीन महाराष्ट्रींतील दहिँ ह्या शब्दांत होता, व तसा च तो अर्वाचीन दहीं ह्या मराठी शब्दांत आहे. " ( पृ. १९१ )

मराठीच्या सुरवातीस भारतवर्षांत संस्कृताचें पुनरुज्जीवन झालें, आणि मराठींत संस्कृत वर्ण व शब्द शिरले. ‡

### ५. व्यंजनें. †

कंठ्य :– क्, ख्, ग्, घ्, ङ्, ह्, : .
तालव्य :– च्, छ्, ज्, झ्, ञ्, य्, श्.
दंत्यतालव्य :– च़्, छ़्, ज़्, झ़्, ञ़्.
मूर्धन्य :– ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, र्, ष्.
दंत्य :– त्, थ्, द्, ध्, न्, ल्, स्.
ओष्ठ्य :– प्, फ्, ब्, भ्, म्.
दंत्यौष्ठ्य :– व्.
नासिक्य :– ( अनुस्वार ) ं.

---

‡ वरील कलमातील काही विधाने विवाद्य आहेत. शक ४०० च्या सुमारास नष्ट झाला तो अपभ्रंश नव्हे, तर प्राकृत भाषा. किंबहुना अपभ्रंशाला जन्म देऊन त्या सुमारास प्राकृत लुप्त झाली. तसेच मराठीचा जन्मकाळही शक ४०० इतका मागे जाऊ शकत नाही. ज्या चिकुर्डे व मंगळवेढे ताम्रपटांच्या आधारे राजवाडे तो मागे नेऊ पहातात ते बनावट आहेत.

† व्यंजनांचे वरील वर्गीकरण सदोष आहे. उदा., ' ह् ' हा महाप्राण असून त्याचा किंवा विसर्गाचा समावेश कंठ्य व्यंजनांत करणे योग्य नाही. तसेच, च्–वर्गातील इतर दंत्यतालव्यां-प्रमाणे ' ञ़् '– ला अस्तित्वच नाही. ' र् ' आणि ' व् ' हे अर्धस्वर आहेत. यापेक्षा पुढील प्रकारचे वर्गीकरण अधिक युक्त होईल :—

कंठ्य : क्, ख्, ग्, घ्.
तालव्य : च्, छ्, ज्, झ्.
दंत्यतालव्य : च़्, छ़्, ज़्, झ़्.
मूर्धन्य : ट्, ठ्, ड्, ढ्.
दंत्य : त्, थ्, द्, ध्.
ओष्ठ्य : प्, फ्, ब्, भ्.
नासिक्य : ङ्, ण्, न्, म्.
अर्धस्वर : य्, व्.
द्रव : र्, ल्.
ऊष्मे : श्, ष्, स्.
महाप्राण : ह्.

( १ ) एकंदर ४० व्यंजनें आहेत. मागील स्वराला द्विमात्रक करण्याचा धर्म त्यांच्या ठाईं असल्यानें, अनुस्वार व विसर्ग यांची गणना व्यंजनांत केली आहे. विसर्ग अपभ्रंशांत नाहीं; ज्ञानेश्वरींत आहे.*

( २ ) दंत्यतालव्य व्यंजनें संस्कृतांत नाहींत; महाराष्ट्रींत व अपभ्रंशांत आहेत. 'यः' बद्दल महाराष्ट्रींत व अपभ्रंशांत 'जो' येतो त्याचा उच्चार तालव्य नसून दंत्यतालव्य आहे. वस्तुतः संस्कृतांतील तालव्य 'च' चा उच्चार 'च्य' च्या जवळ जवळ असतो. मराठी पोथ्यांतून 'विचार' हा शब्द 'विच्यार' असा लिहिलेला फार आढळतो. 'ज्योतिस्' हा संस्कृत शब्द 'जोइस' असा महाराष्ट्रींत होतो. ह्मणजे 'ज' तील 'य' काढून टाकण्याकडे महाराष्ट्रीची प्रवृत्ति दिसते. ह्मणजे तालव्य ज अथवा ज्य यांचा दंत्यतालव्य ज करण्याकडे महाराष्ट्रीची प्रवृत्ति होती, असें ह्मणणें प्राप्त होतें. ही प्रवृत्ति मराठीनें उचललेली आहे.¶

( ३ ) 'ळ्' हा वर्ण आर्यभाषेंत§ आहे; संस्कृतांत नाहीं; प्राकृतांत व अपभ्रंशांत आहे; ज्ञानेश्वरींत नाहीं; तत्पश्चात्क मराठींत व तदितर तत्समकालीन लेखांत आहे. शक ११९५ तील पंढरपूर येथील चौऱ्यायशीच्या शिलालेखांत व शक ४१० तील मंगळवेढ्याच्या शिलालेखांत* आहे. ह्यावरून असें दिसतें कीं, संस्कृत उच्चारांचें अनुकरण करण्याकडे ज्ञानेश्वराचा व्यक्तिशः किंवा जातिशः किंवा प्रांतशः ओढा होता. एथून तेथून मजजवळील सगळ्या सबंद ज्ञानेश्वरींत 'ळ्' हा वर्ण नाहीं.†

* ज्ञानेश्वरींत विसर्ग आहे तो तत्सम शब्दांत आहे, तद्भव शब्दांत नाहीं.

¶ वरील प्रवृत्ती मराठीत निरपवाद तर नाहीच; उलट या संबंधात काही स्थूल नियमही आहेत. तत्सम शब्दात मूळचा तालव्य उच्चार कायम असला तरी त्यातही 'चोर' किंवा 'राजा' यासारखे अपवाद दिसतातच. तद्भव शब्दांतही मूळचा तालव्य उच्चार निरपवाद रीत्या कायम राहतो असा केवळ 'इ' या स्वरापूर्वी ( उदा., चि, जिणें, झिजणे इ० ). 'ए' पूर्वीचा तालव्य उच्चार निरपवाद नाही; कारण 'माझेनि' किंवा 'तुझेनि' यासारख्या रूपांत दंत्यतालव्य आहे. अ, उ आणि ओ या स्वरांच्या पूर्वी मात्र तालव्य येत नाही.

§ आर्यभाषेत म्हणजे वैदिक संस्कृतात असे राजवाड्यांचे म्हणणे असेल तर वैदिक 'ळ्' हा 'ड्' चा पर्याय आहे. ( उदा; अग्निमीडे–किंवा अग्निमीळे–पुरोहितम्, ऋग्वेद, १.१.१ ), त्याचा ल्–शी संबंध नाही.

* मंगळवेढ्याचा ताम्रपट आहे, शिलालेख नाही; व तोही बनावट, अर्थात अविश्वसनीय आहे.

† ळ्–चा अभाव ही ज्ञानेश्वरीच्या राजवाडेप्रतीची एक लकब इतकेच म्हणता येईल. कारण या प्रतीशी समान असणाऱ्या माडगावकर–प्रतीत ळ–कार आहे. तसाच तो यादवकालीन महानुभाव ग्रंथांतूनही नित्य दिसतो. 'लीळाचरित्र' च्या तर तो नावातच आहे. या 'ळ' चे स्टेन कोनो यांचे नियमन ( JRAS. 1902 ) राजवाड्यांनी सार्वत्रिक नाही असे साधार सांगितले आहे. ( राजवाडे–लेखसंग्रह, भा. ३, पृ. १९४–१९६ ).

( ४ ) ङ् व ञ् हे नासिक्य ज्ञानेश्वरींतील प्राकृतिकोद्भव ऊर्फ अपभ्रंशोद्भव शब्दांत नाहींत; संस्कृतसम शब्दांत, अर्थात् विकल्पेकरून आहेत. ‡

( ५ ) श् व ष् महाराष्ट्रींत व अपभ्रंशांत नाहींत; ज्ञानेश्वरींत आहेत.

( ६ ) ज्ञानेश्वरींत दोन प्रकारचे वर्ण आहेत :—महाराष्ट्रींतून व अपभ्रंशांतून आलेले वर्ण व ज्ञानेश्वरानें संस्कृतांतून घेतलेले वर्ण. ज्ञानेश्वरीच्या तद्भव भागांत प्रायः पहिला प्रकार आढळतो व तत्सम भागांत दुसरा प्रकार सांपडतो.

( ७ ) येथें एवढें सांगितलें पाहिजे कीं ज्ञानेश्वरींत दोन प्रकारचे शब्द आहेत :—तद्भव आणि तत्सम. तद्भव म्हणजे अपभ्रंशापासून अपभ्रंश होऊन निघालेले. तत्सम म्हणजे संस्कृतसम असा येथें विशिष्ट अर्थ समजावा. तत्सम म्हणजे अपभ्रंशसम किंवा महाराष्ट्रीसम असे हि दोन अर्थ होऊं शकतील; परंतु ते येथें उक्त नाहींत.

( ८ ) ज्ञानेश्वरींत शेंकडा पंचवीस पासून तीस शब्द तत्सम येतात. शक ११२८ तील पाटण येथील शिलालेखांत शेंकडा पंधरा शब्द तत्सम येतात. शक १०५१ तील अभिलषितार्थ-चिंतामणींतल्या पदांत शेंकडा साहासष्ट शब्द तत्सम येतात. शक ६५८ तील चिकुर्डे * येथील ताम्रपटांत शेंकडा चौऱ्यायशी शब्द तत्सम येतात. आणि शक ४१० तील मंगळ-वेढे * येथील ताम्रपटांत शेंकडा दहा तत्सम येतात. म्हणजे तत्सम शब्द आदीं प्रारंभा-पासून मराठी लेखांत येतात. अलीकडील शिष्ट लेखक व लोक तेवढे मराठींत संस्कृत शब्द फार योजतात व पूर्वींची ज्ञानेश्वरादि मंडळी कमी योजीत, असें म्हणण्याला कांहीं विशेष आधार नाहीं. महाराष्ट्रीभाषेंतील गाथासप्तशति, सेतुबंध वगैरे ग्रंथांत संस्कृत शब्द किंवा तत्सम शब्द शेंकडा एखाददुसरा सांपडल्यास नकळे. ती च कथा अपभ्रंशासंबंधानें आहे. असें असून अपभ्रंशोत्पन्न मराठींत संस्कृतसम ऊर्फ तत्सम शब्द मूळापासून च कां बरें आढळ-तात ? उत्तर :– पूर्व चालुक्यांच्या राशियतीचा प्रारंभ व मराठी भाषेचा प्रारंभ समकालीन आहे.† चालुक्यांच्या अमदानींत संस्कृत भाषेला राजमान्यत्व, शिष्टमान्यत्व व विद्वन्मान्यत्व आलें होतें आणि महाराष्ट्री व अपभ्रंश लोपल्या होत्या. बौद्धधर्म व जैन धर्म यांचा पाडाव झाल्यामुळें प्राकृत भाषांचा हि पाडाव झाल्यासारखा च झाला. चालुक्यराजे सनातनधर्माभिमानी पडल्यानें

‡ हे दोन नासिक्य तत्सम शब्दांत असले तरी ते परसवर्णाच्या रूपाने नसून अनुस्वाराच्या रूपाने आहेत ( उदा; अंकुर, चंचल ). त्यातही ञ् च्या उच्चाराची परिणती न् च्या उच्चारात झाली आहे. ( उदा; पञ्च > पंच ).

* वरील दोन्ही ताम्रपट बनावट व म्हणून अविश्वसनीय आहेत. पण त्यामुळे राजवाडे यांच्या मुख्य प्रमेयास बाधा येत नाही.

† मराठी भाषेचा जन्मकाळ आठव्या शतकाच्या मागे जाऊ शकत नसल्याने राजवाडे यांचे वरील म्हणणे निराधार ठरते. शिवाय चालुक्यांची भाषा कानडी असावी.

संस्कृत भाषेला पुनरुत्तेजन मिळालें, व सामान्य लोकांच्या बोलण्यांतील जी मराठी भाषा तींत हि संस्कृत शब्दांचा कमजास्त प्रवेश झाला. लेखक किंवा वक्ता विद्वान नसला, तर कमी प्रवेश होई; व असला तर जास्त होई. विषय लौकिक कामधंद्याचा असला तर कमी स्पर्श होई; शास्त्रीय असला तर जास्त होई.

( ९ ) संस्कृत ही शुद्ध व शिष्ट भाषा मानून, तींतील शब्दांतल्या वर्णांचा नाश किंवा फेरबदल होऊन जे नवीन अशिष्ट शब्द बनले त्यांना अपभ्रष्ट हें विशेषण लागूं आगलें. ह्या न्यायानें महाराष्ट्री संस्कृताचा अपभ्रंश, अपभ्रंश अथवा अवहट्टभाषा महाराष्ट्रीचा अपभ्रंश व मराठी अवहट्टभाषेचा अपभ्रंश समजण्याची चाल आहे. हें बोलणें संस्कृतदृष्टीनें झालें. प्राकृतदृष्टीनें सर्व विचार अगदी उलट होतो. संस्कृत शब्दांतील वर्णांचा नाश किंवा फेरबदल होऊन जे नवीन शब्द बनले ते संस्कृतेतर शब्द होत, असें हि उत्तरोत्तर बोलतां येईल. अपभ्रष्टभाषा या शब्दाऐवजीं सुलभोच्चारप्रवणभाषा अशी परिभाषा योजल्यास, हा वाद च मिटतो.

प्रथमान्हिक समाप्त

## द्वितीयान्हिक

## ६. नामविभक्तिप्रत्ययेतिहास

ज्ञानेश्वरींत सर्व नामें (अर्थात् विशेषणें ) स्वरान्त आहेत. अ, अँ, आ, इ, ई, उ, ऊ, ऐ, औ, हे ९ स्वर पुल्लिंगी नामांच्या अंतीं आढळतात.‡

( १ ) स्वरान्तत्वाचा धर्म मराठीनें अपभ्रंश व महाराष्ट्री भाषांपासून वंशपरंपरेनें घेतला.

( २ ) ज्ञानेश्वरींत द्विवचन नाहीं. हा हि धर्म मराठीनें अपभ्रंशापासून उचलला आहे.

( ३ ) मराठींत आठ विभक्त्या आहेत. हा धर्म मराठीनें संस्कृतांतून, महाराष्ट्रींतून व अपभ्रंशांतून घेतला आहे. चतुर्थी महाराष्ट्रींत व अपभ्रंशांत क्वचित् आढळते.

( ४ ) ऐ, औ, हे स्वर शब्दाच्या अंतीं महाराष्ट्रींत व अपभ्रंशांत येत नाहींत; ज्ञानेश्वरींत येतात.

## ७. पुल्लिंगी नामें

अकारचिन्हानें पुल्लिंगी नामांच्या विभक्तींचीं रूपें देतों व त्यांचा इतिहास सांगतों.

---

‡ हे विधान पूर्णपणे बरोबर नाही. कारण ज्ञानेश्वरींत अँकारान्त पुल्लिंगी नामे नाहीत, व राजवाडे यांनी न सांगितलेली ओकारान्त नामे आहेत ( उदा., कोहो, नवलाओ, मेहो, इ. ). त्यामुळे संख्या ९ च राहते.

### अकारान्त पुल्लिंगी नामांचें एकवचन

| संस्कृत | महाराष्ट्री | अपभ्रंश | जुनें मराठी | नवें मराठी |
|---|---|---|---|---|
| मूळशब्द :– पुत्र | पुत्त | पुत्त | पूत | पूत |
| प्रथमा :– पुत्रस् | पुत्तो | पुत्तु | पूतु | पूत |
| द्वितीया :– पुत्रम् | पुत्तम् | पुत्तु | पूतु | पूत |
| तृतीया :– पुत्रेण | पुत्तेण | पुत्तेण–पुत्तें | पूतें–पूतेन | पुतानें |
| चतुर्थी :– पुत्राय | पुत्ताअ | | पूता–पूतासि–तें, थें | पूतास–ला, तें |
| पंचमी :– पुत्रात् | पुत्ताउ, पुत्ताहिंतो, पुत्तात्तो | पुत्ताहु–हुँ | पूताहून–तून, –हूनि, –हूनियाँ, –तूनि, तूनियाँ, पूतौनि, पूतौनु, पूतांतु | पूताहून–तून |
| षष्ठी :– पुत्रस्य | पुत्तस्स | पुत्तस्सु, पुत्तह | पूता | पूताचा–ची–चें; पूता |
| सप्तमी :– पुत्रे | पुत्तम्मि–पुत्ते | पुत्ति–पुत्ते–पुत्तें–पुत्तहिं | पूतीं, पूतें, पूतांतु | पूतांत–पूतीं |
| संबोधन :– पुत्र | पुत्त–पुत्ता | पुत्त–पुत्ते | पूता, पूत | पुता |

अकारान्त पुल्लिंगी एकवचनाचीं रूपें ज्ञानेश्वरींत येणेंप्रमाणें येतात :—

मूळशब्द :– गणेश, अनुग्रह, देव, संशय, दिअ, ठाय, राअ, ठाअ.

प्रथमा :– गणेशु, अनुग्रहो, देओ, संशयो, दिओ, ठाय, सूर्यु, विस्मो, आओ.

द्वितीया :–गणेशु, सौरसु, पूरु, परागु, ठाओ, अभिप्राओ, अंतराओ, विस्मो.

तृतीया :– ईश्वरें, राणेन, सेतुगुडेन ( पंढरपूर )¶

चतुर्थी :– सागरा, ठाया, सूर्यातें, योगभ्रष्टासि.

पंचमी :– मेघाहूनि, मेघौनि, समुद्रौनि, समुद्रातु, मूढाहूनि.

षष्ठी :– नाभिकाराचा, उजलाचें, व्यासाची, देवा, कृष्णा, बोला, भीष्मा.

सप्तमी :– घटिं, उदयीं, ठाँईं, संशाइं, वेले ( पु. ), प्राप्ते ( पु. ), ग्रामांतु.

¶ तृतीयेची ही दोन रूपे पंढरपूर येथील चौऱ्यायशीच्या लेखातील आहेत.[ ३.११; ५.३१ ].

संबोधन :- विदग्धा, पार्था, कृष्णा, कृष्णों, विठ्ठले, गोविंदे. ‡

शब्दयोगी :- निकेकाचरि, अर्थातच, व्यापाराकारणीनि, क्षणवेन्हि, अर्जुनें सिं, मंडपें सि, धर्में विण, कल्पांतुनिन्दीं, वाढवेनसिं, क्षणवांचौनि.

( १ ) **प्रथमा** :-अपभ्रंशात नियमेंकरून अकारान्त पुल्लिंगी नामाचें एकवचन उकारान्त होतें.* जुन्या ज्ञानेश्वरींत हि तो च प्रकार प्रायः आढळतो. फक्त, य् आणि व् हे दोन उष्मवर्ण व ह् हा महाप्राण ज्या शब्दांचा उपान्त्य असतो त्या शब्दांचें एकवचन ओकारान्त होतें; जसें, अनुग्रहो, देओ, संशयो, संजयो, कटाहो, विजयो. यान्त्य, वान्त्य किंवा हान्त्य शब्दांपासून मराठींत जीं मूळरूपें य, व किंवा ह यांचा लोप होऊन बनलीं त्यांचें एकवचन ओकारान्त नियमानें होतें :--

| संस्कृत | प्राकृत | अपभ्रंश | जुनें मराठी |
|---|---|---|---|
| १. विस्मय | विस्मअ | विस्मअ | विस्मा+उ = विस्मो |
| २. आश्रय | आसअ | आसअ | आसा+उ = आसो-ओ |
| ३. देव | देउ | देउ | देअ+उ = देओ, देवो |
| ४. दिवस | दिअस | दिअह | दिअ+उ = दिओ |

ह्या चारी स्थलीं वस्तुतः ‘ उ ’ प्रत्यय च लागलेला आहे, परंतु संधिकार्यानें ‘ ओ ’ दृश्यमान होतो.

हा एकवचनी ‘ उ ’ प्रत्यय संस्कृत अस्, प्राकृत ओ, अपभ्रंश उ, अशा परंपरेनें आला आहे, द्राविड भाषासंसर्गानें आलेला नाहीं. ‘ अस् ’ प्रत्ययाचा ‘ उ ’ प्रत्यय पणतू आहे. ¶

हा ‘ उ ’ प्रत्यय दुसऱ्या एका उ पासून भिन्न आहे. पेडनु, कीहु, वगैरे शब्दांच्या शेवटीं जो उ येतो तो वैदिक व संस्कृत भाषेंतील उ अव्ययाचा पणतू होय.† किंमु, नु वगैरे संस्कृत शब्दांत जुडून व वैदिक भाषेंत स्वतंत्र प्रचार ह्या उ-अव्ययाचा होतो.

---

‡ कृष्णे, विठ्ठले, गोविंदे यांसारखी रूपें स्त्रीलिंगी ममत्ववाचक असून ती ज्ञानेश्वरींत येत नाहीत.

* हा उकार क्वचित् अनेकवचनांत हि दिसतो; उदा; “ कृष्णु ऐसें बोलते जाले ” [ ज्ञा. १.३३ ]

¶ या बाबतींत चिं. वि. वैद्यांचें मत भिन्न आहे. ते म्हणतात, “ ज्ञानेश्वराच्या काळींही बोलण्याच्या भाषेंत ‘ उ ’ प्रत्यय नाहींसा झाला होता. किंबहुना यापूर्वीही हा प्रत्यय बोलण्यांत नसावा. ” ( निबंध आणि भाषणें, पृ. ११९ ).

† जुन्या मराठींत सर्वत्र आढळणाऱ्या उ-काराची वरील उपपत्ती स्वतंत्र असली तरी ती मान्य होण्यासारखी नाही. त्यापेक्षा अकारान्त पुल्लिंगी नामाच्या एकवचनाचा ‘ उ ’ हा प्रत्यय अतिदेशानें इतर शब्दांनाही लागला असे मानणें अधिक युक्त होईल.

( २ ) **द्वितीया** :—प्रथमेप्रमाणें. अकारान्त पुल्लिंगी नामांच्या द्वितीयेच्या एकवचनाचें रूप संस्कृतांत ' पुत्रम् ' व महाराष्ट्रींत ' पुत्तम् ' असें होतें, परंतु अपभ्रंशांत पुत्तु असें च रहातें. तेव्हां प्रथमेप्रमाणें च द्वितीयेचीं रूपें बनविण्याची लकब मराठीनें अपभ्रंशापासून उचलली आहे, महाराष्ट्रीपासून किंवा संस्कृतापासून उचलली नाहीं. आणि असें च होणें अपरिहार्य होतें. अपभ्रंशानें ज्या ज्या पद्धती सुरू केल्या त्या मराठीनें चालू ठेविल्या.

( ३ ) **तृतीया** :—महाराष्ट्री ' पुत्तेण ' पासून अपभ्रंशानें पुत्तेण व पुत्तें अशीं दोन रूपें बनविलीं. पुत्तेण–मधील ' ण ' चा अनुनासिक बनवून पुत्तें हें रूप साधलें. ह्यावरून असें दिसतें कीं, अपभ्रंश बोलणारे लोक कांहीं काल पुत्तेण् असा व्यंजनान्त उच्चार करीत असत. कालान्तरानें ' ण् ' चा सहज च अनुनासिक बनला व पुत्तें हें सानुनासिक रूप सिद्ध झालें. ह्या दोन रूपांवरून मराठींत ण–चा ' न ' होऊन पूतेन व पूतें अशीं दोन रूपें बनलीं. ज्ञानेश्वरींत मेघें, ईश्वरें, जाणतेन, पढियंतेन हीं रूपें येतात. पंढरपूर येथील चौऱ्यायशीच्या शिलालेखांत पंडितें, नायकें, गु ( मु ) ढेन, राणेन, सेतुगुडेन अशीं दोन्ही प्रकारचीं रूपें आहेत. *

ईश्वरें या तृतीयेच्या रूपाला ' सिँ ' हा प्रत्यय लागून ईश्वरें सिँ रूप होतें. संस्कृत समम्¶ या शब्दाचें अपभ्रष्ट रूप सवँ असें होतें. सवँ–ची एकवचनी सप्तमी सविँ, सवेँ अशी होते. सविँ–चें मराठी रूप सइँ, व त्याचा अपभ्रंश सिँ.

( सं. ) ईश्वरेण समम् = ( अप. ) ईश्वरें सविँ

( म. ) ईश्वरें सिँ ( ईश्वरासह ).

अर्जुनें = अर्जुनानें; अर्जुनें सिँ = अर्जुनासह.

इंद्रियें = इंद्रियानें; इंद्रियें सिँ = इंद्रियासह.

( जुनें मराठी ) ईश्वरें सिँ = ( वर्तमान मराठी ) ईश्वराशीं.

हा ' सिँ ' प्रत्यय सह–पासून निपजलेला नाहीं. कारण महाराष्ट्रींत व अपभ्रंशांत सह–मधील ह तसा च रहातो. परंतु सम–मधील म चा अपभ्रंशांत वँ होतो. सप्तमीच्या ' सिँ ' या रूपाशीं इंद्रियें या तृतीयेच्या रूपाचा संयोग होऊन हा तृतीया–सप्तमी योग झाला आहे. संस्कृतांत, महाराष्ट्रींत व अपभ्रंशांत समम् शब्द तृतीया घेतो; सबब, सिँ शब्द मराठींत हि तृतीया घेतो.

~~~~~~~~~~

\* वरील रूपांपैकी जाणतेन, पढियंतेन, राणेन किंवा सेतुगुडेन या रूपांत मूळ प्रातिपदिकें अनुक्रमे जाणता, पढियंता, राणा व सेतुगुडा याप्रमाणे आकारान्त आहेत. त्यामुळे राजवाड्यांचे विवेचन बरोबर असले तरी वरील रूपे त्याची उदाहरणे होऊ शकत नाहीत.

¶ यापेक्षा तृतीयेच्या ' सिं ' या प्रत्ययाचे व्युत्पादन सं. सहितम् पासून करणे अधिक युक्त आहे.
~~~~~~~~~~

ज्ञानेश्वरींत असोनि, मेघाचेनि वगैरे इकारान्त तृतीयेच्या एकवचनाची रूपें येतात. ' उ ' अव्ययाप्रमाणें ही ' इ ' अव्यय आहे. 'मेघाचेनि मुखें', 'पिंडाचेनि मिसें' असे प्रयोग ज्ञानेश्वरींत आढळतात. ' इ ' पादपूरणार्थी महाराष्ट्रींत व अपभ्रंशांत योजतात. करुनु, करुनि ह्या जोडींतील दुसऱ्या शब्दांतील जी अंत्य ' इ ' ती मेघाचेनि ह्या रूपांतील इ-हून निराळी आहे. कारणें क्रियापद–विचारांत देणार आहें.*

( ४ ) **चतुर्थी** :––प्राकृतांत चतुर्थी नाहीं, असा नियम वैय्याकरणांनीं केला आहे. परंतु, पिशेल आपल्या ग्रामाटिकांत पुत्ताअ ( पु. ), इत्थिआए, देवताए ( देवताय ), वगैरे एकवचनी चतुर्थीचीं रूपें देतो. त्यावरून असें म्हणावें लागतें कीं, चान्दी प्राकृतांतून, अर्थात् महाराष्ट्रींतून चतुर्थी अजीबात लुप्त झाली नव्हती. लुप्त झाली नव्हती, याला एक सबळ आधार आहे. जुन्या मराठींत 'पूता' असें जें रूप आहे त्याची वंशपरंपरा अन्यथा सोपपत्तिकत्वेंकरून दाखवितां येत नाहीं. महाराष्ट्रींत संस्कृत पुत्राय-पासून पुत्ताअ, अपभ्रंशांत महाराष्ट्री पुत्ताअ-पासून पुत्ता व अपभ्रंशांतील पुत्ता-पासून मराठी पूता, अशी परंपरा असली पाहिजे. पैकीं महाराष्ट्री पुत्ताअ हें रूप उपलब्ध आहे; अपभ्रंशांतील पुत्ता हें रूप उपलब्ध नाहीं. परंतु, तें अपभ्रंशांत क्वचित् प्रचारांत होतें, ह्यांत संशय नाहीं. चतुर्थीच्या स्थलीं षष्ठीच्या रूपांचा उपयोग करण्याचा प्रचार जसजसा प्राधान्येंकरून होऊं लागला, तसतशी मूळ चतुर्थीचीं रूपें लोप पावत चाललीं, हें खरें आहे. तथापि चतुर्थी अजिबात लोप पावली नाहीं. तेव्हां, महाराष्ट्रींतील लुलत्सु चतुर्थीचें जें पुत्ताअ रूप त्यापासून अपभ्रंशद्वारा मराठींतील पूता हें चतुर्थीच्या एकवचनाचें रूप साधलें गेलें, हें स्पष्ट आहे. §

मराठींत आसपास असा एक शब्द आहे. पैकीं पास, पासि, पासून हीं रूपें पार्श्वे, पार्श्वें, पार्श्वात् ह्या रूपांपासून निघालीं; आणि आस, आसि, आसून हीं रूपें आर्श्वे, आर्श्वें, आर्श्वात्- आस, आसे, आसाहुं, अशा परंपरेनें निघालीं. पूतासि–सिँ हें रूप चतुर्थीचें एकवचन पूता+ सप्तमीचें एकवचन आसि–सिँ मिळून बनलें आहे. पूता+आसि–सिँ = पूतासि–सिँ.

पूतास असें अकारान्त रूप मजजवळील ज्ञानेश्वरींत किंवा चौऱ्यायशीच्या शिलालेखांत एक हि नाहीं. पुत्तस्स ह्या षष्ठीच्या एकवचनी रूपापासून जर मराठी पूतास रूप निघालें असतें, तर हें रूप ज्ञानेश्वरींत हटकून सांपडतें. शिवाय, षष्ठीच्या एकवचनी रूपापासून पूतासि हें रूप निघालें नाहीं, हें विधान करण्याला दुसरें एक प्रमाण आहे. पूतांसि असें चतुर्थीचें अनेकवचनी रूप जुन्या ज्ञानेश्वरींत सांपडतें. संस्कृत पुत्रस्य, महाराष्ट्री पुत्तस्स व अपभ्रंशांतील पुत्तस्सु ह्या

---

* हा विचार पुढे परिच्छेद क्र. ६४ मध्ये आला आहे.

§ प्राकृतांत चतुर्थी लुप्त नव्हती, तर लुलत्सु होती या वरील मताला आधार अपभ्रंश ग्रंथांतूनही मिळतो. त्यांत णरिंदहो ( णायकुमार. १.८.१२ ), रायहो ( णायकुमार. ३.१८. १९६ ), सायरणयहिं समिलहिं ( सावयधम्म दोहा, २ ) अशी चतुर्थीची रूपें आढळतात.

षष्ठीच्या एकवचनी रूपांपासून जर मराठी पूतास हें रूप निघालें असतें, तर अनेकवचनी पूतांसि हें मराठी रूप संस्कृत–महाराष्ट्री–अपभ्रंश षष्ठीच्या अनेकवचनापासून निघावयास हवें होतें. परंतु, तसें तें निघालेलें नाहीं.

पूता + ँ ( अनेकवचनाचा अनुनासिक ) + आसि–सिँ = पूतांसि अशी ह्या अनेकवचनी रूपाची पृथक्कृति आहे. पुत्राणाम्–पुत्ताणम् ह्या संस्कृत–अपभ्रष्ट षष्ठीच्या अनेकवचनी रूपापासून कोणत्या हि उपायानें पूतांसि हें रूप साधतां येत नाहीं. तस्मात्, पुत्रस्य, पुत्राणाम् ह्या षष्ठीच्या रूपांपासून मराठी चतुर्थीचीं रूपें निघालीं नाहींत.

पूतेँसिँ हें रूप जसें तृतीया व सप्तमी ह्या दोन विभक्त्यांच्या संयोगानें बनलें आहे, तसें च पूतासि–सि हें हि रूप चतुर्थी ( पूता ) व सप्तमी ( आसि–सिँ ) ह्यांच्या संयोगानें बनलें आहे.*

पूतेँसिँ ( तृ. ए. ) व पूतासि–सिँ (च. ए.) ह्या रूपांसंबंधानें बीम्सनें फार च घोटाळा केला आहे. हीं दोन्ही रूपें तो पूताशीँ–सीँ अशीं लिहितो, व पूतास+ईँ ( तृतीया अनेकवचनाचा प्रत्यय ) असा त्याचा विग्रह करतो. § परंतु जुनीं मराठी रूपें माहीत नसल्यामुळें ह्या असंबद्ध कल्पना त्यानें रचल्या आहेत, हें स्पष्ट आहे.

वर्तमानमराठींत ' ला ' प्रत्यय लागून पूताला असें रूप अलीकडे दोन-अडीचशें वर्षें होतें. हा ' ला ' प्रत्यय शिवाजीच्या व रामदासाच्या काळापर्यंत नव्हता. हा ' ला ' फारसी ' रा ' ह्या चतुर्थीच्या किंवा द्वितीयेच्या प्रत्ययापासून र – चा ल उच्चार करून घेतलेला आहे. बीम्स ‡ वगैरे वैय्याकरण ' लाग ' धातूपासून ' ला ' निष्पन्न करतात. परंतु हा लाग– धातूत्पन्न ' ला ' शिवाजी व रामदास ह्यांच्या अंतापर्यंत मराठींत मुळींच नव्हता, हें त्यांना माहीत नव्हतें. एतत्संबंधीं साग्र विवेचन मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांच्या आठव्या खंडाच्या प्रस्तावनेंत केलेलें आहे.

---

* असा दोन विभक्त्यांचा संयोग मानण्यापेक्षा ( कोणी तसा मानतात ) जुन्या विभक्ति-रूपांना नवीन प्रत्यय लागून ही रूपे सिद्ध झाली असे समजणे अधिक युक्त होईल. नाम-विभक्तीची ही मधली अवस्था असून मराठीतील नामाच्या ' सामान्यरूपा ' चे बीज या अवस्थेत आहे. ( पहा : शं. गो. तुळपुळे, " यादवकालीन मराठी भाषा " आ. दुसरी, १९७३ पृ. २३६–२३७ ).

§ बीम्सनें ' पूताशीँ–सीँ ' असें उदाहरण च दिलेले नाही. त्यासाठीं त्यानें ' देव ' हा शब्द घेतला आहे. मुख्य म्हणजे, तो तृतीयेचे उभयवचनी प्रत्यय तृतीयेच्या अनेकवचनी रूपा-वरून व्युत्पादितो. ( " Marathi has plural forms for all its methods of forming the instrumental. " ), बीम्स : MAL, भा. २, पृ. २७१–२७२.

‡ Comp. Grm. of MAL., Vol. II, p, 260.

अकारान्त पुल्लिंगी नामांच्या चतुर्थीच्या एकवचनाचें एक तें ँन्त्य रूप होतें; जसें, पूतातें ँ. मजजवळील तीनशें वर्षांच्या सुमारच्या गुरुचरित्राच्या एका पोथींत गुरूथें ँ, घराथें ँ अशीं थें ँन्त्य रूपें येतात. मंगलोर येथें रोमन लिपींत छापलेल्या कोंकणी-पैशाची ख्रिस्तपुराणांत हि हें थें ँन्त्य रूप येतें ( इ. स. १६०० ).* मजजवळील ज्ञानेश्वरींत ( शक १२१२ सुमारें ) हें थें ँन्त्य रूप क्वचित् येतें. पंढरपूर येथील चौऱ्यायशीच्या शिलालेखांत ( शक ११९५ ) "श्री बिठलराया अर्थे" अशीं पदें आलीं आहेत.† तात्पर्य, चतुर्थीचा 'तें' प्रत्यय अर्थे या संस्कृत शब्दापासून निघाला आहे.

( संस्कृत ) अर्थे = ( महाराष्ट्री ) अत्थे = ( अपभ्रंश ) अत्थे = ( जुनाट मराठी ) थे अगर थें ँ = ( जुनें मराठी ) तें ँ.

पूतातें हा अनुनासिकान्त्य शब्द पूताते असा निरनुनासिक लिहिला व उच्चारला तरी सशास्त्र आहे. अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकः। ८।४।५७, ह्या पाणिनीय सूत्रान्वयें संस्कृतांत बहुत स्वर विकल्पेंकरून सानुनासिक उच्चारीत. महाराष्ट्री, अपभ्रंश, ह्यांना हि हा च नियम लागू असे. मराठींत हि अनुनासिक विकल्पेंकरून उच्चारतात.

( ५ ) **पंचमी** :—अपभ्रंशांतील पुत्ताहुँ ह्या सानुनासिक रूपावरून मराठी पूताहून हें रूप अनुनासिकाचा न बनून झालें आहे; व पुत्तातो– पुत्तातोँ ह्या महाराष्ट्री व अपभ्रष्ट रूपांवरून पुत्तातोन हें जुनें मराठी रूप साधलें गेलें आहे. पुत्तातु असें हि रूप पैशाचींत येतें. पूताहून ह्या रूपाच्या धर्तीवर तो–चा तू होऊन पूतातून हें रूप निष्पन्न झालें. 'इ' हें पादपूरक लागून पूताहूनि, पूतातोनि, पूतातुनि, हीं रूपें बनलीं. ह्या रूपांच्या शेवटीं क्वचित् दीर्घ ई येऊन –हुनी, –तुनी, –हूनी, –तूनी, अशीं रूपें होतात. ही दीर्घ ई सुद्धा पादपूरक च आहे.

पूतातोनि ह्या रूपांतील तो– च्या धर्तीवर पूताहूनि ह्या रूपांतील हू– चा हो होऊन पूताहोनि असें रूप होतें. हो– चा ओ होऊन संधिकार्यानें पूतौनि असें रूप बनतें. 'उ' पादपूरक लागून पूतौनु असें हि रूप क्वचित् होतें. इयाँ हें पादपूरक लागून करौनियाँ– तील इयाँ-च्या धर्तीवर धरौनियाँ असें हि रूप आढळतें. ह्या इयाँ– चा छडा क्रियापदविचारांत करणें इष्ट आहे.‡

---

* राजवाडे यांनी 'विश्ववृत्त' मासिकात ( इ. स. १९०८, क्र. ८ ) "स्टेफेन्सचें ख्रिस्तपुराण' हा लेख लिहिलेला असून त्यात त्याच्या भाषेचा उपहास करतांना त्याचे "अपभाषित्व, म्लेच्छत्व व अशिष्टोच्चारित्व" वर्णिले आहे. येथे 'पैशाची' ही त्या नावाची प्राकृत भाषा अभिप्रेत नसून गांवढळ लोकांची भाषा इतकाच त्या शब्दाचा अर्थ आहे. तसेच 'ख्रिस्तपुराण' इ. स. १६०० मधील नसून १६१४ मधील आहे.

† पंढरपूर लेखातील हा पाठ "श्रीविठलराया अर्थे" असा आहे (स्तंभ २, ओळ २२).

‡ हा विचार पुढे परिच्छेद क्र. ६४ मध्ये केला आहे.

महाराष्ट्रींतील पुत्तानो ह्या रूपावरून लुप्त अपभ्रंशद्वारा पूतांतु असें हि एक रूप ज्ञानेश्वरींत येतें. पूतांतु ह्या रूपांतील ता- वरील अनुनासिक परंपराद्दष्टया आगंतुक आहे. मराठींत विकल्पानें वाटेल तो स्वर व ऊष्म सानुनासिक होतो, ही हि बाब लक्षांत ठेविली पाहिजे.

होऊन ह्या ऊन- प्रत्ययान्त धातुसाधितापासून हून प्रत्यय निघाला, अशी डॉक्टर भांडारकर‡ यांची व्युत्पत्ति होती. परंतु ती महाराष्ट्री व अपभ्रंश भाषांची विस्तृत चिकित्सा व पृथक्कृति होण्यापूर्वीची, ह्मणजे वीस-पंचवीस वर्षांपूर्वीची होती. शक ९०० पासून शक १२०० पर्यंतच्या कोणत्या हि शिलालेखांत किंवा ग्रंथांत पंचम्यर्थी होऊन हें धातुसाधित योजलेलें आढळत नाहीं. ह्मणजे परंपराद्दष्टया व इतिहासद्दष्टया हून हा प्रत्यय होऊन- पासून साधला जाणें अशक्य आहे.* परंपरा व इतिहास हे निरुक्तीचे दोन नेत्र होत. तद्व्यतिरिक्त ती आंधळी होय.

कोंकणांतील लोक ह- च्या ऐवजी स उच्चारून परसून, मुंबईसून वगैरे अपभ्रष्ट रूपें करतात.

( ६ ) षष्ठी :- ( सं. ) पुत्रस्य = ( महा. ) पुत्तस्स = ( अप. ) पुत्तह = ( मरा. ) पूता, अशा परंपरेनें मराठींत षष्ठीचें एकवचन आलें आहे.

हें शब्दें विण संवादिजे । इंद्रियां नेणतां भोगिजे ।
बोला आदिं झोंबिजे । प्रमेयासि ॥ अध्याय १, ओवी ५८ ॥
तेणें तें आवरिजे । भीष्मा तळिं राहिजे ।
ह्मणे द्रोणातें परिसिजे । तुह्मीं सकळीं ॥ अध्याय १, ओवी १२३ ॥

ह्या दोन ओव्यांत बोला व भीष्मा हीं बोल व भीष्म ह्या दोन अकारान्त पुल्लिंगी नामांच्या षष्ठीच्या एकवचनाचीं रूपें आहेत. "पिशाच्या हातीं", "रामा करीं" वगैरे

‡ Wilson Philological Lectures, पृ. २५५-२५६.

* राजवाडयांनीं अन्यत्र होनि, हूनि हे प्रत्यय सं. पश्चपासून व्युत्पादिले आहेत. ( चंद्रापासौनि = चंद्रस्य पश्चात्, संस्कृत शा. ९.२४, पृ. २२ ) तेथें ते ह्मणतात : "पासीं याची पार्श्व, आर्श्व वगैरे शब्दांपासून आजवर मी व्युत्पत्ति करीत होतों; परंतु पश्च शब्दापासून व्युत्पत्ति खरी." या बाबतीत भांडारकरांचे व्युत्पादनच योग्य आहे. ते ह्मणतात :- "हून is the absolutive of हो and equivalent to होऊन, having become', which yields an ablative sense more directly." ( WPL. p. 255 ). डॉ. कोलते यांनी ह्मटल्याप्रमाणे "होऊन हे धातुसाधित पंचम्यर्थी १२१२ पूर्वी शिलालेखादिकांत वापरलेले नसले तरी यादवकालीन ग्रंथांत ते विपुल प्रमाणात योजलेले आढळते." उदा., "मी ह्मटवटीपू होउनि आलां"- गो. चरित्र २७. ( श्रीगोविंदप्रभुचरित्र, प्रस्तावना, पृ. ४४-४६ ). पण हा व्युत्पत्तिविषयक मतभेदाचा प्रश्न आहे.

प्रयोगांत पिशाच्या व रामा ही दोन रूपें पिशाच्च व राम ह्या अकारान्त नपुंसक व पुल्लिंगी नामांच्या षष्ठीच्या एकवचनाचीं आहेत. हे प्रयोग अलुक्समासाचे समजणें अशास्त्र आहे.*

| संस्कृत | महाराष्ट्री | अपभ्रंश | मराठी |
|---|---|---|---|
| अत्र | अत्थ | एत्थु-त्थुँ | एथून |
| अत्रत्य | अत्थच्च | एत्थुच्च-एत्थुँच्च | एथूनच, एथच, एथिच ( सं. ) |

येथें त्य-पासून च्च-च निघालेला आहे. ( वररुचि ३-२७ )¶ ह्या त्य-पासून निघालेला च्च-च मराठींत विभक्तिरूपांना लावतात; जसें,

| संस्कृत | महाराष्ट्री | अपभ्रंश | मराठी |
|---|---|---|---|
| ग्राम+त्य | = गाम+च्च = | गावँ+च्च = | गावाँच |
| ग्रामस्य+त्य | = ग्रामस्स+च्च = | गावँह+च्च = | गावाँच |

येणेंप्रमाणें गावाँच, पूताच, नाभिकाराच, उभलाच, व्यासाच, वगैरे चकारान्त मूळशब्द साधले जातात. वस्तुतः, त्य-पासून निघालेल्या ह्या च-ला षष्ठीचा अर्थ स्वार्थी नाहीं. षष्ठीच्या रूपाला जोडला जाऊन षष्ठीचें उसनें सामर्थ्य त्याच्या ठायीं भासमान होतें, इतकें च. खरें पाहिलें तर, संस्कृतांतील त्य-चा च स्वभाव ह्या मराठी च-चा आहे. ह्मणजे त्य-प्रमाणें च ह्या च-ला हि साती विभक्त्यांचे प्रत्यय लागतात. जसें :-

---

* ज्ञानेश्वरींतील अशा समासांची कांहीं उदाहरणें नमूद करून श्री. सहस्रबुद्धे यांनीं माडगांवकरांना सांपडलेल्या नव्या पोथीहून राजवाड्यांची पोथी अर्वाचीन आहे असें भासविण्याचा प्रयत्न केला होता. ( 'विविधज्ञानविस्तार', जानेवारी १९११ ). परंतु त्यांनी दिलेल्या उदाहरणांतील ( उदा०, विजयावृत्ति, प्रणवापटिची, भेदाभा७० इ० ) अनुक्रमें विजया, प्रणवा व भेदा ही रूपे षष्ठीच्या एकवचनाचीं आहेत व हे शब्द सामासिक नाहींत असें दाखवून राजवाड्यांनीं वरील शंकेचें निरसन केलें आहे. ( राजवाडे-लेखसंग्रह, भा. २, पृ. ३१ ).

¶ वररुचीचे सूत्र पुढीलप्रमाणे आहे :— "त्यथ्ययां चछजाः ।" म्हणजे, त्य, थ्य आणि द्य यांऐवजी अनुक्रमे च, छ, ज असे आदेश होतात. जसें, नित्य-णिच्च; मिथ्या-मिच्छा; विद्या-विज्जा.

| | संस्कृत | | | मराठी | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | पु. | स्त्री. | न. | पु. | स्त्री. | न. |
| प्र :– | अत्रस्थः, | अत्रत्या, | अत्रत्यम् | पूताचा, | पूताची, | पूताचें |
| द्वि. :– | अत्रत्यम् | अत्रत्याम्, | ,, | पूताचा, | पूताची, | पूताचें |
| तृ. :– | ० त्येन् | ० त्यया, | ० त्येन | ० चेन–०चें, ० चेंसिं ० चेनसि § | ०चिया–आ, ० चियासिं | ० चेन–०चें ० चेंसिं ० चेनसि |
| च :– | ० त्याय, | ० त्यायै, | ० त्याय. | ० चेया, ० चेयातें, ०चेयासि, | ० चिये, ० चियेतें, ०चियेसिं, | ० चआ, ० चआतें, ०चआसिं ० चेया, ० चेयातें ०चेआसिं |
| पं :– | ० त्यात्, | ० त्यायाः, | ० त्यात्, | ० चेयाहूनि–न, | चियाहूनि–न, | चेआहूनि–न |
| ष :– | ० त्यस्य, | ० त्यायाः, | ० त्यस्य, | ० चेया, | ० चिया, | ० चआ, ० चेया |
| स :– | ० त्ये, | ० त्यायाम्, | ० त्ये. | ० चेयाँ, | ० चियाँ, | ० चआँ, ० चेयाँ |
| सं :– | ० त्य, | ० त्ये, | ० त्य. | ० चा, | ० ची, | ० चा |

ह्मणजे षष्ठीच्या रूपांना लागून झालेले हे चान्त शब्द विशेषणें उर्फ नामें आहेत.

त्य–पासून निघालेला हा 'च', मूळशब्द, पंचमीचें रूप व सप्तमीचें रूप, ह्यांना जोडला जाऊन विशेषण नामें बनतात व त्यांना साती विभक्त्या तिन्ही लिंगीं होतात; जसें,

| विभक्तिरूप | चान्त विशेषण |
|---|---|
| मूळ शब्द :– गावँ ( पु. ) | गावँचा–ची–चें |
| पंचमी :– गावाँहून | गावाँहूनचा–ची–चें |
| सप्तमी :–गाविँ–वीँ | गाविँचा–ची–चें, गावीँचा–ची–चें |

प्रथमा, द्वितीया, तृतीया व चतुर्थी ह्या चार विभक्त्यांच्या रूपांना हा 'च' लागून विशेषणें होत नाहींत; कारण स्पष्ट आहे.†

ह्या चान्त विशेषणांना व नामांना त्या त्या विभक्तीचें सामर्थ्य येतें; जसें,

पंचमी :—गावाँहूनचा निरोप = ग्रामाद् वार्ता

षष्ठी :—गावाँचा आकार = ग्रामस्य उत्पन्नम्

सप्तमी :—गाविँचा गोंधळ = ग्रामेभवा अव्यवस्था

मूळरूप :—गावँचा गांवढा = ग्रामस्थो = ग्रामीण

§ मुळांत 'चेतसि' असें मुद्रणदोषयुक्त रूप आहे.

† कारण या चार विभक्त्या विशेषणात्मक नाहीत.

ह्या चान्त विशेषणांना खरीखुरी षष्ठी समजून, होर्न्ले, बीम्स, भांडारकर वगैरे नामांकित वैय्याकरण फार बुचकळ्यांत पडले. कित्येक स्य–स्स पासून च-ची व्युत्पत्ति करीत. परंतु अपभ्रंशांत किंवा महाराष्ट्रींत किंवा संस्कृतांत स्य–स्स ह्यांचीं रूपें पुढील लिंगाप्रमाणें फिरत नाहींत, ही बाब त्यांच्या उपपत्तीच्या आड येई. कित्येक असें ह्मणत कीं, ब्रज वगैरे उत्तर गौड प्राकृतिकोद्भव भाषांतील क–पासून हा 'च' झाला आहे! ब्रज भाषेंत 'क' आल्यानंतर मराठी 'च' बनला, असा ह्या विधानाचा अर्थ होतो. परंतु हा मराठी 'च' शक ११२८ त कायम बनला होता. ( भास्कराचार्यांचा शिलालेख, पाटण ).* ह्मणजे शक ११२८ च्या अगोदर दोनतीनशें वर्षें तो मराठींत आहे. सारांश, या क–च्या विरुद्ध नाना अडचणी दत्त ह्मणून पुढें उभ्या राहतात. असे नानाप्रकारचे गोते ह्या 'त्य–ज–च' † नें वैय्याकरणांना दिलेले पाहिले, ह्मणजे मी मी ह्मणणाऱ्या नावाड्यांना वादळांत भिंगरीसारखे गरगर फिरविणाऱ्या एरियलची आठवण होते !

होर्न्लेनें तर ह्या त्य–ज–च ला † अगदीं च झिडकारून दिलें आहे. तो ह्मणतो ( Comp. Gram. p. 238 ) :–The Marathi चा is sometimes identified with the Sanskrit suffix त्य (Beames). This theory assumes, that an old suffix has in comparatively modern times changed into an affix; for the Marathi चा is not added to the base ( as the Sanskrit suffix ), but to the oblique form, i. e., to the old Genitive. Such a change would be altogether unique, without any analogy or evidence to support it.

हीं वाक्यें लिहितांना होर्न्ले अनेक ठिकाणीं घसरला आहे: (१) संस्कृत त्य-पासून निघालेला मराठी प्रत्यय 'चा' नसून 'च' आहे. (२) चा प्रत्यय (होर्न्लेचा) मूळ शब्दाला लागत नाहीं, असें तो ह्मणतो. परंतु, घरचें, गावँच, वगैरे स्थलीं लक्षावधि मूळशब्दांना ( 'base' of Hoernle) हा प्रत्यय लागतो, हें मीं स्पष्ट करून दाखविलें आहे. (३) इतिहास व परंपरा ह्यांचा दाखला ऊर्फ evidence होर्न्लेला माहीत नव्हता. तो मीं वर भरपूर दाखविला आहे. (४) आतां एक बाब राहिली. विभक्तीच्या रूपाला हा 'त्य' किंवा इतर कोणता हि सफिक्स् अफिक्स्प्रमाणें, मराठींत, संस्कृतांत किंवा इतर कोणत्या हि गौड भाषेंत लागल्याची analogy ऊर्फ सदृशता होर्न्लेला हवी आहे. ती हि भरपूर दाखवितां येते. संस्कृत अत्र, तत्र, यत्र, हीं रूपें पूर्ववैदिककालचीं सप्तमीचीं आहेत. ह्यांना 'त्य' सफिक्स् अफिक्स्प्रमाणें लागतो. मराठींत तर पूतेंसिँ, पूतासिँ ह्या रूपांत तृतीयेच्या पूतेँ व चतुर्थीच्या पूता ह्या रूपांना सिँ व आसिँ हे प्रत्यय लागलेले मागें दाखविले च

* पाटणच्या शिलालेखात '**दामाचा** वीसोवा', '**वाणाची** लोटि', '**मढीचेन** माप', '**भूपाचें** संक' अशी चान्त विशेषणांची रूपे येतात.

† त्य–पासून जन्मलेला 'च.' राजवाडे सं. त्य > प्रा. च्च > मराठी च अशी व्युत्पत्ति मानतात.

आहेत. तेव्हां सादृश्याचें प्रमाण व खेरीज स्वतः मराठीच्या लकबीचें प्रमाण, अशीं दोन अन्तर प्रमाणें हि उपलब्ध आहेत. तस्मात् मराठी 'च' संस्कृत त्य-पासून निघाला आहे, हें सिद्ध आहे.

बीम्स म्हणतो ( Comp. Gram., Vol. II, p. 390 ) कीं, In old Marathi, this suffix ( च ) has a lengthened form चिया, चिये, चेनि; but this additional syllable is merely added to eke out the metre." च- चीं चिया, चिये, चेनि हीं रूपें वृत्तसुखार्थ बनविलेलीं नाहींत, हे वर दाखविलें च आहे. हल्या त्या सिद्धीला वाटतील तीं मनःकल्पित कारणें देण्यात बीम्स व हॉर्न्ले ह्यांचा हातखंडा आहे!!! Philology म्हणजे भाषेच्या शारीराचें शास्त्र होय. जुने मराठी ग्रंथ न शोधल्यामुळें त्या भाषेचें इंद्रियविज्ञान, शारीरज्ञान त्यांना पारखें झालें, आणि अनेक बाबींत खऱ्याला सोडून कुडयाला जाण्याचा पंथ त्यांनीं स्वीकारला.

ह्या च- चा पत्ता प्राकृतांत हि लागतो. तुह्मेच्चयं व अह्मेच्चयं अशीं रूपें युष्माकं व अस्माकं या षष्ठीच्या रूपांचीं महाराष्ट्रींत सांपडतात. तुह्मेच्चय- वरून तुमच व अह्मेच्चय- वरून आमच अशीं चान्त रूपें मराठींत होतात. तुह्मेच्चय व अह्मेच्चय हीं विशेषणें आहेत, त्याप्रमाणें तुमच व आमच हीं हि मराठींत विशेषणें आहेत. तुह्मकेर व अह्मकेर हीं महाराष्ट्रींत दुसरीं विशेषणें आहेत, त्यावरून हिंदी केर, के, क हे षष्ठीचे प्रत्यय निघाले. आणि तुह्मेच्चय व अह्मेच्चय ह्यांतील च्चय- वरून मराठी षष्ठीचा च ( चा- ची- चें ) हा प्रत्यय निघाला. बंगाली षष्ठीचा प्रत्यय 'एर' केर-पासून निघाला आहे. अपभ्रंशांत 'आर' प्रत्यय लागून तुह्मार, अह्मार, तुहार, महार, अशीं रूपें होतात. सारांश, कांहीं गौड भाषांनीं केर- चा आश्रय केला आणि मराठीनें एच्चय, च्चय, च्च, च प्रत्ययाचा आश्रय केला. हा महाराष्ट्री 'च्च' त्य- पासून निघाला आहे हें वर दाखविलें च आहे.‡

‡ मराठी षष्ठीच्या 'च' प्रत्ययाचे वरील व्युत्पादन ब्लोक यांच्या मताने 'कृत्रिम' आहे ( मभावि. § २०२ ). तसेच अलीकडे आल्फ्रेड मास्टर यांनी सुचविलेले ( GOM § 110) चि < प्रा. चेव, चेअ, चेय, चिअ < सं. चैव हे व्युत्पादनही मान्य होण्याजोगे नाही. त्यापेक्षा स्टेन कोनाउ यांच्या कल्पनेवरून ग्रियर्सन यांनी वैकल्पिक म्हणून दिलेली व ब्लोक यांनी उद्धृत केलेली उपपत्ती ( मभावि. § २०२ ) अधिक सयुक्तिक आहे. या उपपत्तीनुसार एका कृत्यार्थी धातुसाधितापासून वरील 'च' प्रत्ययाचे व्युत्पादन करता येईल. या धासा. विशेषणाचा उपयोग चान्त विशेषणाप्रमाणे केल्याची उदाहरणे आहेत. उदा., "राजकृत्यं ( = राजाचे) उद्यानम्" ( महावस्तु, संपा. सेनार, २.५४७ ). या 'कृत्य' वरून मराठी 'च' येणे अधिक शक्य आहे. याविषयीचे ग्रियर्सन यांचे म्हणणे A. Kuhn's Zeitschrift, Vol. XXXVIII, pp 486, 490 येथे पाहावयास मिळेल. त्यातील एक उतारा प्रस्तुत संपादकाने आपल्या "यादवकालीन मराठी भाषा" ( आ. दुसरी, १९७३ ) या ग्रंथाच्या पृ. २४० वर दिला आहे.

(७) सप्तमी :— (संस्कृत) पुत्रे, (महाराष्ट्री) पुत्तम्मि–पुत्ते, (अपभ्रंश) पुत्ति–पुत्ते–पुत्तँ–पुत्तहिँ, अशा परंपरेनें पूतिँ, पूते, प्राप्ते, वेळे, ठाइँ, दीइँ,* समइँ, वगैरे सप्तमीच्या एकवचनाचीं रूपें निघालीं आहेत.

त्य– पासून निघालेला 'च' प्रत्यय लागून पूतिँच, ठाइँच, समइँच, अशीं विशेषणें होतात. सप्तमीच्या रूपांना पंचमीचा 'हूनि' प्रत्यय लागतो; जसें, घरिँहूनि.

(८) संबोधन :— महाराष्ट्री व अपभ्रंश रूपांवरून पूत, पूता हीं संबोधनाचीं रूपें साधिलीं जातात. अपभ्रंशांत पुत्ते असें एकारान्त संबोधनाचें जें रूप येतें त्याच्या धर्तीवर कृष्ण या शब्दाचें संबोधन कृष्णे असें जुन्या अभंगांतून सांपडतें. कृष्णे, विठ्ठले, विठे हीं रूपें भक्तिदर्शक व प्रेमदर्शक समजतात; हीं स्त्रीलिंगाचीं रूपें नाहींत, हें स्पष्ट आहे.¶ कारण विठ्ठले ह्या संबोधनरूपाचा मूळ शब्द विठ्ठल असा आहे. गोविंदे असें रूप अभंगांतून आढळतें.

(९) (शब्दयोगी अव्ययाच्या मागें येणाऱ्या विभक्त्या) :—

मजजवळील ज्ञानेश्वरींत शब्दयोगी अव्ययाच्या मागें येणाऱ्या अकारान्त पुल्लिंगी नामांच्या विभक्त्या येणेंप्रमाणें च होतात :—

द्वितीया एकवचन :–कल्पान्तुवेन्हीँ, मोक्षवांचौनि, क्षणलग, गावँभरि, क्षणवरि.
तृ. ए. :– उपायेँविण, धर्मेँहीन.
च. ए. :– पापावांचौनि, व्यापारालागौनि, अर्थातव, अर्जुनाप्रति, स्वर्गालागिं.
ष. ए.§ :–रसाआंतु, नायकापासौनि, पाखाणामाझि, कानाकरविँ, द्रोणापासिँ.

कोणत्या हि शब्दयोगी अव्ययाच्या मागें प्रथमा, पंचमी, सप्तमी व संबोधन ह्या विभक्त्यांचीं रूपें येत नाहींत. सविँ–पासून निघालेला 'सिँ' तृतीयेचा व आश्रें–पासून निघालेला 'आसिँ' चतुर्थीचा जोड प्रत्यय झाल्यामुळे सिँ व असिँ–सि हीं दोन अव्ययें विभक्तिप्रत्ययांत गणलीं पाहिजेत.

वरील कोष्टकावरून दिसतें कीं, ज्याप्रमाणें संस्कृतांत शब्दयोगी अव्ययामागें नामांच्या

---

* ज्ञानेश्वरींत 'दीं' असें सप्तमीचें एकवचनी रूप येतें ( १८.११२१ ), 'दीइँ' असें येत नाहीं.

¶ हें विधान मान्य करणे कठिण आहे. कारण वरील उदाहरणांत मूळ प्रातिपदिकच पुल्लिंगाचें स्त्रीलिंगी केल्यानें त्याचीं हीं संबोधनाचीं रूपेंही स्त्रीलिंगीच मानणें भाग आहे.

§ या सदरातील राजवाडे यांनीं दिलेलीं उदाहरणे षष्ठी विभक्तीचीं कशी होऊ शकतात ते समजणें कठिण आहे.

निरनिराळ्या विभक्त्या येतात, त्याप्रमाणें च ज्ञानेश्वरकालीन मराठींत शब्दयोगी अव्ययामागें नामाच्या निरनिराळ्या विभक्त्या येतात. वांशिक स्वभाव तो हा च.¶

वर्तमान मराठीनें शब्दयोगी अव्ययांपुरती ही निरनिराळ्या विभक्त्या करण्याची चाल अलीकडे दोन-अडीचशें वर्षें ह्मणजे रामदासानंतर मोडिली आहे. सध्या सर्व शब्दयोगी अव्ययांच्या मागें अकारान्त पुल्लिंगी नामाचें एक च आकारान्त रूप येतें. अनेकविधता मोडून एकविधता स्वीकारण्याचा जो व्यस्त‡ भाषांचा स्वभाव तो येथें अमलांत आला आहे. ह्या च एकविध आकारान्त रूपाला आधुनिक वैय्याकरण सामान्यरूप ह्मणतात. परंपरा माहीत नसल्यामुळें ह्या सामान्यरूपासंबंधानें बीम्स, होर्न्ले वगैरे पाश्चात्य वैय्याकरणांनीं बरें च अकांडतांडव केलें आहे. त्यासंबंधानें जें कांहीं लिहावयाचें तें पुल्लिंगी नामांच्या अनेकवचनाचा विचार झाल्यावर लिहिणें प्रशस्त होईल.†

( १० ) चिकुर्डे येथील शक संवत् ६५८ तील विजयादित्य चालुक्याच्या मराठी ताम्रपटांत ( 'विश्ववृत्त' मासिक पुस्तक ) * अकारान्त पुल्लिंगी नामांच्या एकवचनाचीं खालील रूपें येतात+ :—

---

¶ 'शब्दयोगी अव्ययाच्या मागें येणाऱ्या विभक्त्या' या मथळ्याखालील राजवाडे यांचें सर्वच विवेचन अशास्त्रीय वाटतें. कारण शब्दयोगी अव्ययाच्या मागें नामाचें विभक्तिरूप नव्हे, तर त्याचें 'सामान्यरूप' येतें, व तें अमुक एका विभक्तीचें असें म्हणता येत नाहीं. त्यामुळें कोणत्याहि शब्दयोगी अव्ययाच्या मागें विशिष्ट विभक्त्यांचीं रूपें येत नाहींत या म्हणण्याला कांही अर्थ उरत नाहीं. तसेंच, तृतीया व चतुर्थी यांचे अनुक्रमें सिँ व आसि हे उघड प्रत्यय असताना त्यांना अव्ययें कसें म्हणतां येईल ?

‡ 'व्यस्त' भाषा म्हणजे विश्लेषणात्मक किंवा Analytical भाषा; उदाहरणार्थ, इंग्रजी भाषा.

† सामान्यरूपाविषयीचें राजवाडे यांचें विवेचन पुढे परिच्छेद क्र. ४–२१, २२ मध्यें थोडें व परिच्छेद क्र. ४२–२ मध्यें थोडें आलें आहे. त्यांचे निष्कर्ष दोन :–( १ ) ज्ञानेश्वरकालीन मराठीत सामान्यरूप नाहीं, व ( २ ) वर्तमानकालीन मराठींतील सामान्यरूप ज्ञानेश्वरी मराठींतील विभक्तिरूपांवरून आलेलें आहे. यांचा विचार पुढे केला आहे.

* जानेवारी १९०७ ( अंक १० ).

+ चिकुर्डे ताम्रपट हा बनावट असल्यामुळें त्यांतील शब्दरूपांचीं चिकित्सा करण्यांत कांहीं अर्थ नाहीं व त्यांचा आधार घेणेंही योग्य नाहीं. आज हा ताम्रपट कोणीही मान्य करीत नाहीं.

प्रथमा :—सतानिकु, ग्राम, बोवलः, पुंज.
द्वितीया :—विजयं, कटकमेलिकार, सर्पयाग.
तृतीया :—पेवेन, ग्रामेन.
चतुर्थी :—मूलिका, राया, देवा, राणा, सौनारा, क्षेत्रजा, अनामिका.
पंचमी :—पाषाणत, उत्तरत, भ्यंतरत, ० असत, ० क्षयत.
षष्ठी :—देवा, ग्रामा.
सप्तमी :—दिसावरे, तदनंतरे, मस्तके, दिसावरी.

हीं रूपें अपभ्रंशांतील रूपांशीं ताडून पहातां दिसून येईल कीं, शक ६५८ त मराठी रूपें अपभ्रंशांतून आस्ते आस्ते निसटून पक्कीं मराठी बनत चाललीं होतीं. वैशद्यार्थ : ( १ ) अपभ्रंशांत अकारान्त पुल्लिंगी नामांच्या प्रथमेचें एकवचन नियमानें उकारान्त असतें. ह्या शक ६५८ तील ताम्रपटांत ' उ ' काढून टाकून, अकारान्त एकवचन करण्याकडे प्रवृत्ति दिसते. ही प्रवृत्ति ज्ञानेश्वरींत हि दिसून येते. ( २ ) द्वितीयेचा हि ' उ ' ह्या ताम्रपटांत काढून टाकला आहे. अपभ्रंशांत ' उ ' नियमानें असतो. ( ३ ) ताम्रपटांत ' इन ' प्रत्ययान्त तृतीयारूपें आहेत. हा ' न ' वस्तुतः अनुनासिकासारखा उच्चारावयाचा आहे. ( ४ ) चतुर्थीचीं रूपें अपभ्रंशांतल्याप्रमाणें व ज्ञानेश्वरींतल्याप्रमाणें आकारान्त आहेत. ( ५ ) तस्-पासून निघालेल्या चो (पुत्राचो) प्रत्ययापासून ' त ' प्रत्यय ताम्रपटांत योजला आहे. अपभ्रंशांत तस्-चा ' तौ ' होतो. ( ६ ) अपभ्रंशांत षष्ठी हसुकारान्त किंवा हकारान्त असते. ह्या ताम्रपटांत ज्ञानेश्वरींतल्याप्रमाणें निव्वळ आकारान्त आहे. ( ७ ) अपभ्रंशांतल्याप्रमाणें व ज्ञानेश्वरींतल्याप्रमाणें येथें सप्तमी एकारान्त व ईकारान्त [ इँकारान्त ] आहे. अपभ्रंशांत इ-वर अनुनासिक नाहीं, ज्ञानेश्वरींत आहे; ह्या ताम्रपटांत ई दीर्घ असून तिच्यावर अनुनासिक नाहीं. ह्मणजे, अपभ्रंश व ज्ञानेश्वरी ह्यांच्यामध्यें ह्या ताम्रपटांतील भाषेचें रूप पडतें.

## ८. अकारान्त पुल्लिंगी नामांचें द्विवचन

( ११ ) ज्ञानेश्वरींत दहा पांच स्थलीं अकारान्त पुल्लिंगी नामांच्या द्विवचनाचीं रूपें येतात; जसें :—

ह्मणौनि उदकीं ँ हान रसु । कीं पवनीं ँ जो स्पर्शु ।
शशिसूर्यौं जो प्रकाशु । तो मी चि जाण ॥

अध्याय ७, ओवी ३२॥

येथें शशिसूर्यां हें रूप सप्तमीच्या द्विवचनाचें आहे. कारण, सूर्य ह्या शब्दाचें सप्तमीच्या एकवचनाचें रूप सूर्यि ँ असें ज्ञानेश्वरींत होतें; व अनेकवचनी रूप सूर्यीं ँ असें होतें. ० सूर्यां ँ असें रूप ह्या दोहोंपैकीं नाहीं. " प्रभास्मि शशिसूर्ययोः " ह्या प्रतीकांतील सूर्ययोः हें सप्तमीचें द्विवचन आहे व त्याचें भाषान्तर ज्ञानदेवानें शशिसूर्यां असें द्विवचनी केलें आहे. उदकीं, पवनीं, ह्या जशा एकवचनी सप्तम्या आहेत, तशी च शशिसूर्यां ँ ही द्विवचनी सप्तमी आहे.

सारांश, द्विवचनाची आठवण, अंधुक आठवण, ज्ञानेश्वराच्या वेळीं होती.* चिकुर्डे येथील शक ६५८ तील मराठी ताम्रपटांत ग्रामौ, द्वौ, पाषाणौ, ग्रामा, अशीं द्विवचनाचीं रूपें आली आहेत.† प्राकृतांत द्विवचन नाहीं, असें प्राकृत वैय्याकरण म्हणतात खरें;. परंतु चिकुर्डे येथील ६५८ तील ताम्रपटावरून व ज्ञानेश्वरींतील शशिसूर्यौ ह्या रूपावरून प्राकृतिकोद्‌भव मराठी भाषेंत तें कांहीं काल होतें, ह्यांत बिलकूल संशय नाहीं. कोणता हि प्रचार आस्ते आस्ते लोप पावतो. प्राकृत वैय्याकरण द्विवचन अजीबात एकदम काढून टाकतात, तें जरा चमत्कारिक व आकस्मिक भासतें. शक ६५८ व शक १२१२ त जर मराठींत द्विवचन आढळतें तर महाराष्ट्री व महाराष्ट्री–अपभ्रंश बोलणारांत तें प्रचारांत असलें पाहिजे. प्राकृतांत चतुर्थी नाहीं, असा दडपेबाजीचा नियम प्राकृत वैय्याकरण देतात. परंतु चतुर्थीच्या एकवचनाचीं रूपें पिशेलनें दहा-वीस दिलीं आहेत. त्यावरून, एक तर, प्राकृत वैय्याकरणांची दृष्टि पाणिनीप्रमाणें सर्वंकष नव्हती, असें म्हणावें लागतें; किंवा द्विवचनाचा व चतुर्थीचा लोप करण्याची सुधारणा करण्याचें मनांत येऊन त्यांनीं हा नियम आपल्या व्याकरणांत घालून दिला असावा, असा पक्ष काढावा लागतो. § हा दुसरा पक्ष काल्पनिक नाहीं. भाषा सुधारण्याचा जोंव घालण्याचें वारें वैय्याकरणांना कधीं कधीं परभाषासंसर्गानें येतें. परवां, अनुनासिकावर हल्ला करण्याचा बूट आपल्या इकडील वैय्याकरणंमन्यांनीं‡ काढलेला सर्वश्रुत च आहे.

~~~~~~~~

* हें म्हणणे बरोबर नाहीं. राजवाडे यांनीं दिलेले शशिसूर्यौ हें द्विवचनाचें ज्ञानेश्वरींतील एकमेव उदाहरणही निरपवाद नाहीं; कारण इतर पोथ्यांतून या ठिकाणीं ' शशिसूर्यी ' असा पाठ मिळतो व तोच बरोबर दिसतो. चिकुर्डे–ताम्रपट बनावट असल्यानें त्यांतील उदाहरणें कुचकामी होत. उरतां उरलीं तत्कालीन महानुभावीय ग्रंथांतून येणारीं ' उपानौ ' किंवा ' उपाहानौ ' यासारखीं रूपें (उदा; लीळाचरित्र, एकाक ७०, ७१). हीं रूपें म्हणजे सं. उपानहौ या द्विवचनी रूपाचा अपभ्रंश असून तेवढ्यावरून तीं मराठी द्विवचनाचीं रूपें ठरत नाहींत. शिवाय, अशीं उदाहरणें उपानह, कर, चरण, चक्रवाक यांसारख्या द्वित्व किंवा जोडी अभिप्रेत असलेल्या शब्दांपुरतींच सांपडतात, हेंही ध्यानांत घेण्यासारखें आहे.

† चिकुर्डे ताम्रपट प्रमाण नसल्याने त्यातील उदाहरणे गैरलागू होत.

§ राजवाड्यांची वरील विचारसरणी सर्वथैव चुकली आहे असें मत व्यक्त करून चिं. वि. वैद्य यांनी प्राकृतांत चतुर्थी ही निराळी विभक्ती नाहीं ( ' चतुर्थ्याः षष्ठी ' ) या वररुचीच्या मताचा पुरस्कार केला आहे. ते म्हणतात : " प्राचीन वैय्याकरण वररुचि याजला आधुनिक वैय्याकरणंमन्यांच्या पंक्तीला बसविणें–व तेंही राजवाड्यांनीं–हें उचित नाहीं, व धडधडीत विरोधी आहे. " ( निबंध आणि भाषणें, पृ. ११७ ).

‡ हे ' वैय्याकरणंमन्य ' ह्मणजे बहुधा रा. भि. जोशी असावे. इ. स. १८९८ मध्ये

[ टीप – पुढील पानावर चालू ]
~~~~~~~~

### ९. अकारान्त पुल्लिंगी नामांचें अनेकवचन

| | संस्कृत | महाराष्ट्री | अपभ्रंश | मराठी |
|---|---|---|---|---|
| प्र. :– | पुत्राः | पुत्ता | पुत्त | पूत |
| द्वि. :– | पुत्रान् | पुत्ते | पुत्ता–पुत्त | पूता, पूतां |
| तृ. :– | पुत्रैः | पुत्तेहि–हिं–हिँ | पुत्तहि–हिं–हिँ<br>पुत्तेंहि–हिं–हिँ | पूतिँ, पूतीँ,<br>पूतीँ सि |
| च. :– | पुत्रेभ्यः | | | पूतां, पूतांसि–सिँ, पूतांते |
| पं. :– | पुत्रेभ्यः | पुत्ताओ,<br>पुत्ताउ,<br>पुत्तातो | पुत्तहु | पूतांहून–नि–नियां<br>पूतांतोन–नि–नियाँ<br>पूतींनि–नियां, पूतींनु |
| ष. :– | पुत्राणाम् | पुत्ताण–णं–णँ | पुत्ताहं, पुत्तहं, पुत्ताणं | पूतां ( चा–ची–चें ) |
| स. :– | पुत्रेषु | पुत्तेसु–सुं–सुँ | पुत्तहिँ, पुत्तेहिँ, पुत्तिहिँ | पूतीँ |
| सं. :– | पुत्राः | पुत्ता, पुत्ताहो | पुत्तहाँ–हो | पूतांहो, पूतहो. |

मजजवळील ज्ञानेश्वरींत अकारान्त पुल्लिंगी नामांच्या एकवचनाचीं रूपें येणेंप्रमाणें येतात—

प्रथमा :– विशेष, भाव, गणेश, अभिप्राये, ठाये, राय.
द्वितीया :– विशेष, भाव, गणेश, अभिप्राये, ठाये, राये, भावां, रायां.
तृतीया :– पंडितीँ, देवीँ, भटिँ–टीँ, लोकपालिँ, सज्जनीँ, अभिप्राइँ, ठायीँ, रायीँ,
गावीँ, देवीँ सीँ, पंडितिँ, देविँ.
चतुर्थी :– रसां, देवां, मेघांसि, मेघांतिँ, भूतांतें, रायां, ठाआं.
पंचमी :– सनकादिकांहूनि, मूढांहूनि, मेघांतु, मेघांतूनि.
षष्ठी :– दीवांची, पार्थां, दिआं.

[ टीप – मागील पानावरून चालू ]
का. ना. साने, रा. प. गोडबोले आणि शं. रा. हातवळणे यांनी मराठीच्या शुद्धलेखनात काही सुधारणा सुचविणारे एक पत्रक काढले. पुढे १९०४ साली हातवळण्यांचे ' मराठी भाषेची लेखनपद्धति ' हे पुस्तकही प्रसिद्ध झाले. परंतु वरील तिघांपैकी कोणी वैय्याकरणी नव्हता. तसा पाठिंबा वरील ' मुनित्रया 'ला रा. गो. भांडारकर आणि रा. भि. जोशी यांच्याकडून मिळाला. त्यामुळे व ' सुबन्त–तिङन्त विचारा 'त राजवाडयांनी रा. भि. जोशांचा जो उपहास केला आहे त्यावरून वरील उल्लेख त्यांचा असावा असे वाटते. ( डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्या मराठी व्याकरणेतिहासावरील अप्रकाशित प्रबंधाच्या आधारे. )

सप्तमी :- चरणीँ, तरंगीँ, बाहीँ, पायीँ, ठाइँ.
संबोधन :- बापा, प्राणिगणहो, जनहो, लोकहो, पूताँहो–हाँ.
शब्दयोगी :- अर्थातेंव, दोखाँवरि, रसाँलागौनि, कल्पवेन्हीँ, धर्मीँहीन, देवीँविण, अवयवाँमाझि

( १२ ) प्रथमा :- अपभ्रंशांतील पुत्तपासून मराठी पूत. ज्ञानेश्वरींत ठाय, राय, वगैरे यकारान्त नामांचीं ठाये, राये, अशीं एकारान्त रूपें केवल दर्शनी एकारान्त आहेत. वस्तुतः तीं अकारान्त च आहेत. य– चा उच्चार ' ये ' करण्याकडे जुन्या मराठीचा कल फार; जसें, होय बद्दल होये, जाय बद्दल जाये; तसें च ठाय बद्दल ठाये, व राय बद्दल राये.

( १३ ) द्वितीया :- पुत्ता ह्या रूपापासून अनुनासिकीकरणानें पूताँ असें रूप होतें. अनुनासिकीकरणाचें कारण पुढें दिलें आहे.

( १४ ) तृतीया :- अपभ्रंशांतील पुत्तहिँ–पासून पूतीँ. सिँ प्रत्यय लागून पूतीँ सिँ. पुत्तहिँ = पुत्त + ँ + इँ = पुत्तँ + इँ = पूतिँ – तीँ.

( १५ ) चतुर्थी :- अपभ्रंशांतील चतुर्थीच्या अनेकवचनाचीं रूपें उपलब्ध नाहींत. चतुर्थीच्या एकवचनाचें जें ' पूता ' रूप त्याच्यावर अनुनासिक देऊन, पूताँ हें रूप साधलें आहे.

( १६ ) पंचमी :- पुत्तहुँ = पुत्त + ँ + हुँ = पूताँहून–नि–नियाँ.

( महाराष्ट्री ) पुत्तात्तो = पुत्ता + ँ + त्तो = पूताँतोन–नि–नियाँ, पूताँतून–नि–नियाँ.

( महाराष्ट्री ) पुत्ताउ = पुत्ता + ँ + उ = पूतौन–नि–नियाँ.

( १७ ) षष्ठी :- पुत्तहँ = पुत्त + ँ + अँ = पूताँ.

( १८ ) सप्तमी :- पुत्तिहिँ = पुत्ति + ँ + इँ = पूतिँ–तीँ.

( १९ ) संबोधन :- पुत्तहोँ = पुत्त + ँ + होँ = पूताँहोँ.

पुत्तहो = पुत्त + ँ + हो = पूताँहो.

पुत्तहो = पूतहो– हाँ.

( २० ) शब्दयोगी :- एकवचनाप्रमाणें च अनेकवचनांत शब्दयोगी अव्ययांच्या मागें निरनिराळ्या विभक्त्यांचीं रूपें येतात.

द्वितीया :- पूतवेन्हीँ, इ–इ.†
तृतीया :- पूतीँविण, इ–इ.
चतुर्थी :- पूताँतव, इ–इ.
षष्ठी* :- पूताँपासिँ, इ–इ.

---

† इत्यादि, इत्यादि.

* मागे ( ९ ) मध्येही राजवाडे यांनी ' पासिँ ' हे षष्ठीचे शब्दयोगी अव्यय म्हणून दिले आहे.

( २१ ) येणेंप्रमाणें अकारान्त पुल्लिंगी नामांच्या अनेकवचनाचीं रूपें आहेत. पैकीं, प्रथमेच्या रूपांसंबंधानें विशेष कांहीं नमूद करण्यासारखें नाहीं. द्वितीयेपासून संबोधनाच्या रूपां-संबंधानें, मात्र, एक बाब विचारार्ह आहे. ( द्वि. ) पूतां, ( तृ. ) पूतिं–तीं, ( च. ) पूतां–सि–नें, ( पं. ) पूतांहून–नि–नियां, ( ष. ) पूतां, ( स. ) पूतीं, ( सं. ) पूतांहो, ह्या सहा विभक्त्यांच्या रूपांत अनुनासिक नियमानें आढळतो. ह्मणजे ह्या सहा विभक्त्यांत अनुनासिक हा अनेकवचनाचें चिन्ह आहे, असें ह्मणावें लागतें. हा अनुनासिक कोठून आला ? ह्याची परंपरा काय ? की, हा मराठीनें आगन्तुक आणिला ?

अपभ्रंशांत तृतीया, षष्ठी, सप्तमी व संबोधन, ह्या चार अनेकवचनी विभक्तिप्रत्ययांचे अंत्य स्वर सानुनासिक आहेत; चतुर्थीचें अनेकवचनी रूप उपलब्ध नाहीं; आणि द्वितीया व पंचमी यांच्या प्रत्ययाचे अंत्य स्वर निरनुनासिक आहेत. हा पंचमीचा ' हु ' व द्वितीयेचा ' आ ' विकल्पाच्या नियमानें सानुनासिक असूं शकेल. परंतु हुं–वरचा अनुनासिक मागील ता–वर कोणत्या हि नियमानें येऊं शकणार नाहीं. हा च प्रकार संबोधनाचा हि आहे. हों–वरचा अनुनासिक मागील ता–वर कसा येणार ?

महाराष्ट्रींत तृतीया, षष्ठी व सप्तमी, ह्या तीन अनेकवचनी विभक्तिप्रत्ययांचे अंत्य स्वर अपभ्रंशांतल्याप्रमाणें च सानुनासिक आहेत, आणि पंचमी व संबोधन ह्या दोन विभक्तिप्रत्ययांचे अंत्य स्वर सानुनासिक नाहींत. महाराष्ट्रींत चतुर्थीचें अनेकवचन एकवचनाप्रमाणें उपलब्ध नाहीं. पंचमी व संबोधन, ह्या विभक्त्यांच्या प्रत्ययाचे अंत्य स्वर विकल्पाच्या बळावर सानुनासिक होऊं शकतील. परंतु, दोन्ही प्रत्ययांतील ( पुत्ताउ, पुत्ताहो ) ' उ ' व ' हो ' ह्या अक्षरांमागील ता–वर अनुनासिक कोणत्या नियमानें येणार ?

अपभ्रंशांत व महाराष्ट्रींत विकल्पाच्या सवलतीनें कोणता हि स्वर विकल्पानें सानुनासिक होऊं शकतो. परंतु मराठींतील तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, सप्तमी व संबोधन ह्या विभक्त्यांचे अनुक्रमें इँ, अँ, हून–सून, अँ, इँ व हो, ह्या प्रत्ययांच्या मागील अनुक्रमें त, त, त–ता, त, ति व ता ह्या अक्षरांवर अनुनासिक आवश्यक असावा लागतो, वैकल्पिक असून चालत नाहीं. तेव्हां, मराठींतील ह्या अनेकवचनाच्या अनुनासिकाची परंपरा अपभ्रंश किंवा महाराष्ट्री भाषांच्या द्वारा लागणें शक्य दिसत नाहीं.

अर्थात्, हा अनुनासिक आगंतुक, ह्मणजे प्राकृतेतर आर्य भाषांतून किंवा भाषांच्या संसर्गानें मराठींत आला असला पाहिजे.

पल्हवी व जुनें फारसी ह्या भाषांत ' आन् ' प्रत्यय लागून अनेकवचन होतें; जसें मलिक्, मलिकान्. संस्कृतांत अकारान्त पुल्लिंगी नामांच्या द्वितीयेचें अनेकवचन ' आन् ' प्रत्यय लागून होतें. तसें च षष्ठीचा अनेकवचनी ' आम् ' प्रत्यय लागण्यापूर्वी, अजन्त पुल्लिंगी, नपुंसकलिंगी व स्त्रीलिंगी नामांचें अनेकवचन ' आन् ' प्रत्यय लागून होतें; जसें, देवान् + आम्, कमलान् + आम्, नदीन् + आम्, गुरून् + आम्, पितॄन् + आम्, विद्यान् + आम्, धीन् + आम्,

इ. इ. ह्मणजे, ' आन् ' हा संस्कृतांत अनेकवचनाचा एक प्रत्यय आहे व तो द्वितीया व षष्ठी ह्यांच्या प्रत्ययांच्या आधीं लागतो. पल्हवींत व फारशींत हि हा ' आन् ' प्रत्यय द्वितीयेच्या अनेकवचनी प्रत्ययाच्या आधीं लागतो; जसें, शाहान् + रा. मराठींत हि द्वितीयेपासून संबोधना-पर्यंतच्या अनेकवचनी प्रत्ययांच्या आधीं अनुनासिक लागतो. तेव्हां, आन् = आँ = ँ, अशा परंपरेनें मराठींत अनुनासिक अनेकवचनाचा एक प्रत्यय बनला आहे व तो द्वितीयेपासून संबोधनापर्यंतच्या अनेकवचनी विभक्तिप्रत्ययांच्या पूर्वी अंगांना लागतो. मराठींतील अनुनासिकाची परंपरा ही अशी आहे.† हा अनुनासिक मराठींतल्या तिन्ही लिंगांच्या नामांच्या द्वितीयेपासून संबोधनापर्यंतच्या अनेकवचनी रूपांचें नियतचिन्ह आहे.

ह्या अनेकवचनविषयक अनुनासिकाचा छडा बीम्स किंवा होर्न्ले ह्या दोघांतून एकानें हि लाविला नाहीं; इतकें च नव्हे, तर हा प्रश्न च त्यांनीं काढला नाहीं.‡ पाहिलें तर, मराठींतील विभक्तींकडे जो वरवर हि पाहील, त्याला हा अनुनासिक पदोपदीं भेटेल. तशांत, पहाणारा जर वैय्याकरण असेल, तर त्याच्या कटाक्षांत तो प्रथमदर्शनीं येईल, आणि त्यानें कुळगोत तो धुंडावयाला लागेल.

बीम्स व होर्न्ले या दोन्ही वैय्याकरणांनीं वचनप्रकरणीं बर च लिहिलें आहे. त्यांत वर्तमान मराठींतील सामान्य रूपानें त्यास फार छळलें. ज्ञानेश्वरकालीन मराठींत विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्ययें ह्यांच्या पूर्वी नामांचें सामान्यरूप होत नसे, हें वर केलेल्या पृथक्करणा-वरून सिद्ध च आहे. तथापि, स्पष्टतेकरितां ज्ञानेश्वरकालीन अकारान्त पुल्लिंगी नामांचे एक-वचनी व अनेकवचनी प्रत्यय येथें देतों आणि त्यांची तुलना वर्तमान मराठी प्रत्ययांशीं करतों.

---

† पुढें क. ४२ मध्यें " हा अनुनासिक फारसीचा संसर्ग होण्याच्या पूर्वी मराठींत आला. अर्थात्, संस्कृतांतील षष्ठीच्या व द्वितीयेच्या ' आन् ' पासून याची उत्पत्ति आहे यांत संशय नाहीं. " अशी वरील परंपरेच्या विरुद्ध विधानें स्वतः राजवाड्यांनीच केली आहेत. याचा अर्थ त्यांच्या लिहिण्यात विसंगती आहे. शिवाय, अनेकवचनी अनुनासिक फारसींतील ' आन् ' या प्रत्ययापासून आला हे त्यांचें पहिलें ह्मणणेंही कोणाला मान्य होण्यासारखें नाही. ( पहा :— चिं. वि. वैद्य : निबंध आणि भाषणें, पृ. १२९ ).

‡ ही टीका निराधार व म्हणून चुकीची आहे. बीम्सनें या अनुनासिकाचा छडा लावला आहे. तो लावतांना त्यानें म्हटलें आहे, " Precisely similar are the Marathi forms which are strictly analogous to the singular oblique forms of each class, only differing by the insertion of anuswara which eviently points back to the ' ण ' of the Prakrit genitive. " ( A Comp. Grm. of M. A. L., Vol. II, p. 221 ).

**प्रत्यय**

| | जुनें मराठी | | नवें मराठी | |
|---|---|---|---|---|
| | एकवचन | अनेकवचन | एकवचन | अनेकवचन |
| १. | उ* | — | — | — |
| २. | उ* | ०–आँ | ०–आ | ०–आँ |
| ३. | इन–ईं–ईंसिँ | ईं*–ईं*–ईंसिँ | ईं*–एँ*–आनँ–* आशीँ | ईं*–आँनी*– आँहीँ –आँशीँ |
| ४. | आ–आसि–आतेँ–थेँ | आँ–आँसि– आँतेँ–आँथेँ | आस–आला–आतेँ | आँस–आँला– –आँतेँ–आँना |
| ५. | आहून–नि–नियाँ, आतून–नि–नियाँ, ओनि–नियाँ, आनु, आतु आतोन–नि–नियाँ | आँहून–नि–नियाँ, आँतून–नि–नियाँ. ओनि–नियाँ आँतु आँतोन–नि–नियाँ | आहून– आँतून | आँहून– आँतून |
| ६. | आ | आँ | आ | आँ |
| ७. | इ*–ए* | ँई* | ँई*–आँत | ँई*–आँत |
| ८. | आ–० | हो–आँहो–० | आ | आँनो–हो |
| | शब्दयोगी अव्ययें | शब्दयोगी अव्ययामागें निरनिराळ्या विभक्त्या येतात. | शब्दयोगी अव्ययामागें मूळ प्रातिपदिकाला ( एकवचनी ) आ व ( अनेकवचनी ) आँ प्रत्यय लागतो. | |

( २२ ) प्रथमा :– नव्या मराठीनें एकवचनाचा उ–प्रत्यय सोडून दिला आहे.

चतुर्थी :– नव्या मराठीनें आसि–आँसि ह्या प्रत्ययांतील इ–च्या ऐवजीं 'अ' ठेविला आहे. फारसी 'रा' प्रत्ययावरून 'ला' प्रत्यय घेतला आहे व ह्या ला–च्या मागें आसि प्रत्ययाच्या धर्तीवर 'आ' लावून, 'आला' असा प्रत्यय बनविला आहे.¶ अनेकवचनाचा अनुनासिक येऊन आँला, आँना, असे अनेकवचनी प्रत्यय साधले आहेत.

* नक्षत्र ज्या प्रत्ययांवर आहे त्यांच्या आधीं प्रातिपदिकाच्या अंत्य स्वराचा, म्हणजे अ–चा लोप होतो. ( राजवाडे ).

¶ मराठी ला< फारसी रा, या वरील व्युत्पादनाविषयी मागे तळटीपेंत लिहिलेंच आहे. तसेंच 'आला' असा प्रत्यय मानणे अशास्त्रीय आहे. 'आ' हा सामान्यरूपाचा होणारा विकार आहे.

पंचमी :– आहून–भातून, आणि आँहून–आँतून हे दोन च प्रत्यय नव्या मराठीनें स्वीकारले आहेत.

षष्ठी :–जुन्या मराठीचे च प्रत्यय नव्या मराठीनें ठेविले आहेत. चकारान्त आँच–आच विशेषणें असल्यामुळें तीं षष्ठी प्रत्ययांत गणणें अशास्त्र आहे.

सप्तमी :– जुन्या मराठींतील ईं–ँई प्रत्यय नव्या मराठीनें तसे च स्वीकारून शिवाय, आत–आँत हे नवे प्रत्यय् बनविले आहेत.

संबोधन :– 'आ' व 'हो' हे प्रत्यय नव्या मराठीनें कायम ठेविले आहेत. आँहो प्रत्ययांतील अनुनासिकाचा नकार बनवून आन्हो हें रूप प्रथम बनलें आणि नंतर न्हो–मधील महाप्राण काढून टाकून 'नो' असा प्रत्यय बनला.

नव्या मराठींत, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, सप्तमी व संबोधन ह्यांच्या एकवचनाच्या व अनेकवचनाच्या प्रत्ययांत फरक फक्त अनुनासिकाचा आहे. ह्या पांच विभक्त्यांचे जुने प्रत्यय सोडून दिले आणि नव्या प्रत्ययांकडे पाहिलें, तर असें दिसून येतें कीं, ह्या पांची विभक्त्यांचे एकवचनी व अनेकवचनी प्रत्यय आ–नें सुरू होतात. अनेकवचनी आ–वर अनुनासिक असतो, एवढा च काय तो एकवचनी प्रत्यय व अनेकवचनी प्रत्यय यांजमध्यें भेद आहे.

नव्या मराठींत द्वितीया व तृतीया ह्या विभक्त्यांनीं हि हा च मार्ग स्वीकारून चतुर्थ्यादि पांच विभक्त्यांच्या प्रत्ययांचें अनुकरण केलें आहे. तें असें :– अपभ्रंशांतील पुत्तहिँ ह्या रूपावरून जुन्या मराठींत पूतीँ–तिँ अशीं तृतीयेचीं अनेकवचनी रूपें होतात. हीं रूपें जुन्या मराठींत अकारान्त पुल्लिंगी नामाचीं होतात. अकारान्त सर्वनामांच्या तृतीयेच्या अनेकवचनाचीं रूपें एहिँ प्रत्यय लागून होत. अपभ्रंशांत तृतीयेच्या अनेकवचनाचें पुत्तेहिँ असें एक रूप आहे. (सं.) पुत्रैः = ( महा. )* पुत्रेहिँ = ( अपभ्रंश ) पुत्तेहिँ = ( जुनें मराठी ) पूतेहिँ. हें रूप, अकारान्त पुल्लिंगी नामाचें यद्यपि मजजवळील ज्ञानेश्वरींत नाहीं, तत्रापि शक १२०० त पूतेहिँ असें रूप भाषेंत प्रचलित होतें, ह्यांत संशय नाहीं. कारण, तृतीयेच्या अनेकवचनाचीं हीं हिँकारान्त रूपें शक १२८९ तील नागांव येथील शिलालेखांत सांपडतात.¶ सर्वनामांना तर, हा तृतीयेच्या अनेकवचनाचा हिँकारान्त प्रत्यय नियमानें लागतो. सारांश, पूतेहिँ हें रूप जुन्या मराठींत अपभ्रंशांतील पुत्तेहिँ ह्या रूपावरून आलेलें आहे. पूतेहिँ ह्या रूपांतील अनुनासिकाचा नकार बनवून आणि न् व ह ह्यांचा स्थलविपर्यास करून पूतेन्हि असें रूप साधलें आहे. महाप्राण काढून टाकून पूतेनि असें रूप बनलें. चतुर्थ्यादि सर्व विभक्त्यांचे प्रत्यय नव्या मराठींत आ–आदि

---

* येथें मुळांत मुद्रणदोष असून महाराष्ट्रींत पुत्तेहिँ असें रूप होतें.

¶ नागांव शिलालेखांत हिँकारान्त रूपें नाहींत. काही इँ–ईंकारान्त रूपे आहेत; उदा., ऋषि प्रतिपाळांवें ( ओ. २७ ), बाळगोपाळिं घेतलें ( ओ. १३ ) ( तुळपुळे : प्राचीन मराठी कोरीव लेख, पृ. २८८–२८९ )

आहेत. त्यांच्या अनुकरणानें पूतेनि ह्या रूपांतील ए-च्या ऐवजीं आ उच्चारला जाऊं लागला. कारण, सामान्य लोकांचा कल, प्रायः, एकविधतेकडे व सुलभोच्चाराकडे असतो. तात्पर्य, पूतानि असें रूप नव्या मराठींत बनलें. परंतु, एकविधतेच्या दृष्टीनें ह्या रूपांत एक न्यूनता राहिली होती. इतर चतुर्थ्यादि विभक्त्यांच्या अनेकवचनी रूपांतील अनुनासिक ह्या पूतानि रूपांत नव्हता. तो हि देणें एकविधतेस्तव भाग पडलें. येणेंप्रमाणें, पूतांनि-निँ हें सानुनासिक रूप सिद्ध झालें. एवढ्यानें च, ह्या तृतीयेच्या अनेकवचनी रूपाचे खेळ आटोपले, असें नाहीं. (अनेकवचन) पूतां + निँ, असे इतर विभक्त्यांप्रमाणें विभाग पाडून, तृतीया एकवचनार्थ पूता, असें रूप बनविलें; आणि नि-निँ ह्या अनेकवचनी प्रत्ययाचें एकवचनप्रत्ययरूप नें (मोत्यें, मोतीं) असें केलें. मिळून तृतीयेच्या एकवचनाचें पूतानेँ हें रूप अवतीर्ण झालें. सारांश, नव्या मराठींत, तृतीयेच्या अनेकवचनी रूपावरून तृतीयेचें एकवचनी रूप साधलें गेलें आहे.†

हा च प्रकार द्वितीयेच्या रूपासंबंधानें नव्या मराठींत झालेला आहे. अपभ्रंशांत पुत्ता असें द्वितीयेचें अनेकवचन आहे. त्यावरून जुन्या मराठींत पूतां व नव्या मराठींत हि पूतां असें रूप आलें. अनुनासिक हा जुन्या व नव्या मराठींत अनेकवचनाची निवर्तक खूण आहे. ती द्वितीयेच्या अनेकवचनाचें ज पूतां रूप त्यांत आहे. तेव्हां, अनुनासिक काढून टाकून निरनुनासिक जें पूता रूप तें द्वितीयेच्या एकवचनाचें रूप बनलें. वस्तुतः, महाराष्ट्रींत किंवा अपभ्रंशांत पुत्ता असें द्वितीयेच्या एकवचनाचें रूप नाहीं. द्वितीयेच्या एकवचनाचें पुत्तु असें उकारान्त एक च रूप आहे. एकविधता व अनुकरण ह्यांच्या नादानें द्वितीयेपासून संबोधनापर्यंतचे नव्या मराठींतील सर्व विभक्ति-प्रत्यय आ-आदि झाले आहेत.§ चतुर्थीपासून संबोधनापर्यंतचे प्रत्यय आ-आदि होते च. त्यांच्या जोडीला द्वितीया व तृतीया ह्यांच्या प्रत्ययांना हि नव्या मराठीनें आणून सोडलें.

येणेंप्रमाणें नव्या मराठींत द्वितीयादि सर्व विभक्त्यांच्या प्रत्ययांचा प्रारंभ एकवचनांत आ-नें व अनेकवचनांत आं-नें होतो.

---

† तृतीयेच्या 'नें' या प्रत्ययाची वरील व्युत्पत्ति अभिनव असली तरी सहज मान्य होण्यासारखी नाहीं. एक तर वैद्य ह्मणतात त्याप्रमाणें ती 'क्लिष्ट व दुरान्वयी' झाली आहे; व मुख्य ह्मणजे हा 'नें' प्रत्यय प्राचीन नसून सर्व अर्वाचीन भारतीय आर्य भाषांत तो अलीकडे उत्पन्न झालेला आहे. तसेंच मराठींत अनेकवचनी 'नीं' प्रत्यय असला तरी हिंदींत तो एकवचनाप्रमाणें 'नें' च आहे. त्यामुळें तृतीयेच्या अनेकवचनी रूपावरून तृतीयेचे एकवचनी रूप सिद्ध झाले हे राजवाडे यांचे म्हणणे आक्षेपार्ह ठरते. या प्रत्ययाच्या अधिक विवेचनासाठी ब्लोक यांचे 'मराठी भाषेचा विकास', परिच्छेद २०१ पहा.)

§ विभक्तिप्रत्यय आ-आदि नाहींत, तर सामान्यरूप आ-अन्त, ह्मणजेच आकारान्त आहे.

देव, ह्या अकारान्त पुल्लिंगी नामाला एकवचनी ' आ ' जोडला ह्मणजे देवा असें रूप होतें. ह्या देवा व देवां रूपांना च दादोबा वगैरे आधुनिक वैय्याकरण सामान्यरूप ह्मणतात. हे आधुनिक वैय्याकरण एकवचनी व अनेकवचनी सामान्यरूपांचा प्रारंभ तृतीयेपासून करीत. तो चुकीचा होता. कारण, सामान्यरूपांचा प्रारंभ द्वितीयेच्या एकवचनापासून होतो, हें वर दाखविलें आहे.‡ द्वितीयेपासून संबोधनापर्यंतच्या विभक्तिप्रत्ययांच्या पूर्वी अकारान्त पुल्लिंगी नामांचें* जें एकवचनी व अनेकवचनी सर्वसाधारण रूप होतें त्याला सामान्यरूप ह्मणतात. ह्याला च यूरोपियन लोक Oblique form § असें नांव देतात. ह्या सामान्यरूपाचें विवेचन तिन्ही लिंगी नामांच्या विभक्त्यांचा ऊहापोह संपल्यानंतर सामग्र्यानें करणें इष्ट आहे.

(२३) आतां, एकदोन बाबींचा उल्लेख करून आन्हिक संपवितों.

| **बाब पहिली** :– नवें मराठी | जुने मराठी | संस्कृत |
|---|---|---|
| एकवचन :– पुरुषानें केलेन | पुरुषें–केलेन | पुरुषेण कृतेन |
| अनेकवचन :– पुरुषांनीं केलेनीं | पुरुषीं केलेहीं | पुरुषैः कृतैः |

त्यानें केलेन व त्यांनीं केलेनी, त्यानें ह्मटलेन व त्यांनी ह्मटलेनि, हे प्रयोग तेन कृतेन व तैः कृतैः, तेन भणितेन व तैः भणितैः, ह्या संस्कृत रूपांचीं भाषांतरें आहेत. हे प्रयोग कोकणांत व देशांत दोन्हीं स्थलीं योजतात.

तें काम त्यांनीं केलेनि आन मी निघालों = तत्कर्म कृतैस्तैः हन्त अहं निर्गतः

( त ) तैः = तेहिँ = तेन्हि = तेयानि = त्यानि = त्यानीँ

( केल ) कृतैः = केलेहिँ = केलेन्हि = केलेनिँ = केलेनीँ

आधुनिक वैय्याकरण केलेन व केलेनिं हीं रूपें चुकलेलीं क्रियापदें समजतात. परंतु तशी गोष्ट नसून हीं ' केल ' ह्या विशेषणाचीं अनुक्रमें तृतीयेच्या एकवचनाचीं व अनेकवचनाचीं रूपें आहेत व सर्वथैव व्याकरणदृष्ट्या शुद्ध आहेत. वर दिलेले प्रयोग सतातृतीयेचे मासले आहेत.

ज्ञानेश्वरींत पुरुषीँ गेल्यीं, देवीँ अवतरल्यीं, असे सतिसप्तमीचे प्रयोग येतात.

---

‡ राजवाडे यांचे वरील मत चिं. वि. वैद्य यांनाही मान्य नाही. कारण प्रथमा, द्वितीया व संबोधन या तीन विभक्ती एका प्रकारच्या ( Strong किंवा Direct cases) असून सामान्य-रूपाला प्रारंभ तृतीयेपासून होतो असेंच समजणें युक्त आहे.

* केवळ अकारान्त पुल्लिंगी नामांचेच नाहीं, तर सर्व प्रकारच्या नामांचे.

§ "**Oblique case** : A collective term for all declensional cases other than the nominative and vocative." Pei and Gaynor : A Dictionary of Linguistics.)

**बाब दुसरी** :– मालवण येथील तीन लेखांत बैसक व पुरुस ह्या अकारान्त पुल्लिंगी नामांच्या प्रथमेच्या अनेकवचनाचीं रूपें बैसके व पुरुसे अशीं आलीं आहेत.‡ महाराष्ट्री व महाराष्ट्रीअपभ्रंश ह्यांपासून निघालेल्या जुन्या व नव्या मराठींत अकारान्त पुल्लिंगी नामांच्या प्रथमेच्या एकवचनाचीं रूपें एकारान्त होत नाहींत. तेव्हां, ह्या जुन्या मालवणी रूपांचा माग दुसरीकडे पाहिला पाहिजे. बंगाली व ओढ्या भाषांत अकारान्त पुल्लिंगी नामांच्या प्रथमेच्या अनेकवचनाचीं अशीं एकारान्त रूपें होतात; जसें,

| एकवचन | अनेकवचन |
|---|---|
| जन | जने |
| कुमार | कुमारे |

तेव्हां, बैसके व पुरुसे ह्या अनेकवचनी रूपांचा बंगाली एकारान्त अनेकवचनी रूपांशीं चांगला मेळ बसतो. शक १५८५ त एकारान्त अनेकवचन करणाऱ्या मालवण येथील लोकांचा पूर्वहिंदी, बंगाली व ओढ्या लोकांशीं कांही संबंध होता कीं काय ?

**द्वितीयान्हिक समाप्त**

## तृतीयान्हिक

### १०. अँकारान्त पुल्लिंगी नामें §

मकारान्त संस्कृत नामांपासून महाराष्ट्री, अपभ्रंश ह्या परंपरेनें अँकारान्त मराठी नामें

---

‡ मालवणचे शके १५८५ मधील हे तीन लेख राजवाड्यांनी प्रथम 'सरस्वती-मंदिर' या मासिकात प्रसिद्ध केले. पुढे ते त्यांच्या 'संकीर्ण निबंधां' (लेखसंग्रह, भाग २ रा) त समाविष्ट झाले (पृ. २१३–२१८). त्यांतील वरील रूपांची उपपत्ति लावण्याकरितां त्यांनी 'मराठींतील नामविभक्त्यांचें समग्र वंशावलोकन व पृथक्करण' केलें (लेखसंग्रह, भा. २, पृ. १९२–२१२). मूळ लेखांतील (क्र. ३) ओळ अशी आहे :—

"हे ग्रामपुरुसे समस्त बैसके बैसोनु केले." (ओ. १८)

यातील पुरुसे हें रूप तृतीयेचें (अपभ्रष्ट) व बैसके हें रूप 'बैसक' या स्त्री. नामाचें सप्तमीचें आहे. अर्थात् राजवाडे म्हणतात त्याप्रमाणें हीं प्रथमेच्या अनेकवचनाचीं रूपें नाहींत व त्यामुळे त्यांच्या मुळाचा शोध घेण्यासाठीं बंगालीकडे धाव घेण्याचें कारण नाहीं.

§ अशा प्रकारच्या नामांचे अस्तित्व संशयित आहे. सं. ग्राम यांतील 'म' चे 'वँ' मध्ये रूपान्तर होऊन त्या 'वँ' मधील अनुनासिक पूर्वस्वरावर जात असल्याने 'गावँ' असें लेखन आढळत असलें तरी त्याचा उच्चार 'गाँव' असाच आहे. पण ही बाब शंकास्पद आहे.

आलीं आहेत. तीं अकारान्त पुल्लिंगी नामाप्रमाणें च चालतात. क्वचित् अनुनासिक विकल्पें-करून देत नाहींत. उदाहरणार्थ :–

| एकवचन | अनेकवचन |
|---|---|
| मूळशब्द :—गावँ | |
| प्रथमा :—गावँ, गाओ, गाउ | गावँ |
| द्वितीया :—गावँ, गाओ, गाउ | गावँ |
| तृतीया :—गावेँ | गावीँ इ. इ. इ. |

## ११. आकारान्त पुल्लिंगी नामें

आकारान्त पुल्लिंगी नामें महाराष्ट्रींत किंवा अपभ्रंशांत नाहींत. संस्कृतांत आहेत; परंतु, त्यांचा मराठी आकारान्त पुल्लिंगी नामांशीं कांहींएक संबंध नाहीं. मराठींतील आकारान्त पुल्लिंगी नामें प्रायः मूळचीं अकारान्त विशेषणें असून, पुल्लिंगाचा ' आ ' प्रत्यय लागून बनलेलीं आहेत. हा ' आ ' प्रत्यय संस्कृत एतत् व इदं सर्वनामांपासून महाराष्ट्रीद्वारा व अपभ्रंश-द्वारा मराठींत आला आहे.* त्याचा खुलासा सर्वनामप्रकरणांत येईल.‡ आकारान्त पुल्लिंगी नामांचीं रूपें महाराष्ट्रींत व अपभ्रंशांत नसल्यामुळें तुलनार्थ येथें, अर्थात्, देतां येत नाहींत.

| एकवचन | अनेकवचन |
|---|---|
| मूळ शब्द :– डोला, जाणता. | |
| प्रथमा :– डोला, जाणता | डोले, जाणते |
| द्वितीया :– डोला, जाणता | डोले, जाणते |
| तृतीया :– डोलेन, नि–निया–नियां<br>जाणतेन, नि–निया–नियां | डोलां, जाणतां |
| चतुर्थी :– डोलेया, जाणतेया | डोलेयां, जाणतेयां |
| पंचमी :– डोलेयाहुनि, जाणतेयाहुनि | डोलेयांहुनि, जाणतेयांहुनि |
| षष्ठी :– डोलेया, जाणतेया | डोलेयां, जाणतेयां |
| सप्तमी :– डोलां, जाणतां, आलेयां<br>बुडणेयां, पंधरावां | डोलां, जाणतां, आलां, बुडणां |
| संबोधन :– डोलाहो, जाणताहो,<br>जाणतेयाहो, विसांवेया, सुहावेया | डोलेनों, जाणतेनों |

* याशिवाय हीं नामें अक ( > प्रा. अअ > म. आ ) हा अक्षरवृद्धीचा प्रत्यय लागूनही सिद्ध होतात. ( उदा., सं. घोटक > प्रा. घोडअ > म. घोडा ).

‡ षष्ठाह्निक, परिच्छेद २८, २९ पहा.

चान्त विशेषण :– डोलेयाच, जाणतेयाच डोलेयांच, जाणतेयांच
शब्दयोगी :– डोलेनविण, इ. इ. इ. डोलांविण, इ. इ. इ.

( १ ) मूळशब्द डोल, जाणत, दीपल, हों॑त, बुडण. पुल्लिंगी ' आ ' प्रत्यय लागून डोला, जाणता, दीपला, हों॑ता, बुडणा.

( २ ) प्रथमा :– संस्कृत एतत् या सर्वनामापासून महाराष्ट्री–अपभ्रंशद्वारा प्रथमेचें एकवचन एह, हा, आ; व अनेकवचन एए, हे, ए.

जाणत + आ = जाणता
जाणत + ए = जाणते
* येथें अ + ए यांचा संधि होताना अ–चा लोप होतो.

( ३ ) द्वितीया :–प्रथमेप्रमाणें.

( ४ ) तृतीया :– संस्कृत एतत् ह्या सर्वनामापासून महाराष्ट्री–अपभ्रंशद्वारा तृतीयेचें एकवचन एएण; अनेकवचन * यां, आं.

जाणत + एन = जाणतेन
जाणत + आं = जाणतां
एएण = एण = एन ( ण = न )
जाणतेन + सिँ = जाणतेनसिँ
जाणतां + सिँ = जाणतांसिँ, डोलांसिँ

( ५ ) चतुर्थी :– एतत्पासून अपभ्रंशद्वारा एकवचन एया, अनेकवचन एयां.

जाणत + एया = जाणतेया
जाणत + एयां = जाणतेयां
जाणतेया + आसि = जाणतेयासि
जाणतेयां + आसि = जाणतेयांसि

( ६ ) पंचमी :– अपभ्रंशद्वारा एयाहुनि, एयांहुनि.

जाणत + एयाहुनि = जाणतेयाहुनि
जाणत + एयांहुनि = जाणतेयांहुनि

तूनि, तौनि, हुनि, हुनु, हुनिया, हुनियां, हौनि, हौनु, हीं निरनिराळीं रूपे आहेत, हें अकारान्त पुल्लिंगी नामांच्या प्रकरणांत सांगितलें च आहे.

( ७ ) षष्ठी :– अपभ्रंशद्वारा एकवचनी एया; अनेकवचनी एयां.

जाणत + एया = जाणतेया
जाणत + एयां = जाणतेयां

( ८ )सप्तमी :– अपभ्रंशद्वारा एकवचनी एयाँ अथवा आँ; अनेकवचनीं आँ.

जाणत + एयाँ = जाणतेयाँ

अथवा

जाणत + आँ = जाणताँ

जाणत + आँ = जाणताँ

जाणत + इये = जाणतिये

जाणत +इयाँ = जाणतियाँ

( ९ ) संबोधन :– स्पष्ट आहे.

(१०) चान्त विशेषण :– अपभ्रंशद्वारा एकवचन एयाच; अनेकवचन एयाँच.

जाणत + एयाच = जाणतेयाच

जाणत + एयाँच = जाणतेयाँच.

च–ला पुन्हां तिन्ही लिंगी आ, इ, एँ प्रत्यय लागतात.

(११) शब्दयोगी :—

द्वि :– डोलातेन्हिँ, डोलावाँचौनि, डोलावरि, डोलेवेन्हीँ

तृ :– डोलेनविण, डोलौंविण

ष :– डोलाआँतु, डोलापासौनि, डोलौंतव, इ. इ. इ.

(१२) एकनाथी ऊर्फ मध्यमराठींत डोलेया ह्या रूपाचा डोळया असा अपभ्रंश झाला; आणि वर्तमानमराठींत डोळ्या असा झाला.

डोलेया = डोळया अथवा डोलया = डोळ्या

जाणतेया = जाणतया = जाणत्या

आलेया = आलया = आल्या

तेयाचेया = तयाचया = त्याच्या, इ. इ. इ.

(१३) धाता, पिता, भोक्ता, कर्ता वगैरे शब्द संस्कृतांत ऋकारान्त होते, ते मराठींत आकारान्त झाले आहेत व ते आकारान्त पुल्लिंगी नामांप्रमाणें चालतात.

कर्त्तेयाचेया = कर्त्तयाचया = कर्त्याच्या

(१४) वेगाँ, पराँ, कृतकार्याँ, भाटाँ, इत्यादि तृतीयेच्या अनेकवचनाचीं रूपें ज्ञानेश्वरींत आढळतात. ह्यांत वेग, पर, कृतकार्य, भाट, असे अकारान्त पुल्लिंगी मूळशब्द वस्तुतः आहेत. परंतु तृतीयेच्या अनेकवचनापुरते अतिदेशानें त्यांना वेगा, परा, कृतकार्या, भाटा असे आकारान्त पुल्लिंगी शब्द समजणें जरूर आहे.†

---

† राजवाडयांचें हें ह्मणणें मोडकशास्त्र्यांना ‘ सर्वथा भ्रांत ’ वाटते. कारण ‘ प्रस्तुत आँ–

( तळटीप पुढील पानावर चालू )

( १५ ) वर्तमानमराठीत आकारान्त पुल्लिंगी नामांच्या रूपांत खालीलप्रमाणें मध्य-मराठीद्वारा अपभ्रंश किंवा फेरबदल झाले आहेत :—

| | ज्ञा. | म. | व. |
|---|---|---|---|
| तृतीया एकवचन :— | डोल्नि | डोळेन | डोळयानें |
| तृतीया अनेकवचन :— | डोलीं | डोळेहिं | डोळयानीं |

तृतीयेच्या अनेकवचनावरून एकवचनाचें रूप एकविषतेत्त्व बनले आहे.

चतुर्थी वगैरे :- डोलेया ह्या पदांतील ' ए ' स्वर काढून टाकून व डोला ह्या पदांतील अंत्य ' आ ' काढून टाकून वर्तमान मराठीनें डोळया असें रूप बनविलें. मध्य मराठींतील रूप डोळ्या असें होतें. डोळया हें सामान्यरूप एकविषतेत्त्व सिद्ध करून विभक्तींचे प्रत्यय वर्तमान-मराठी लावते.

## १२. इकारान्त पुल्लिंगी नामें

### एकवचन

| | संस्कृत | महाराष्ट्री | अपभ्रंश | ज्ञानेश्वरी |
|---|---|---|---|---|
| मूळ शब्द :- | अग्नि | अग्गि | अग्गि | हरि, आगि |
| प्र :- | अग्निस् | अग्गी | अग्गी | आगी, आगि, हरि-री. |
| द्वि :- | अग्निम् | अग्गिं | अग्गिं | आगी–गि, हरि–री |
| तृ :- | अग्निना | अग्गिणा | अग्गिण, अग्गिं | आगी, आगीसिं, हरी, हरीसिं. |
| च. :- | अग्नये | — | — | आगी, आगीसि–सिं–यें–तें<br>हरी, हरीसि–सिं–यें–तें |
| पं. :- | अग्नेः | अग्गीहिंतो<br>अग्गित्तो | अग्गिहें | आगीहूनि–तूनि,<br>हरीहूनि–तूनि |
| ष. :- | अग्नेः | अग्गिणो<br>अग्गिस्स | अग्गिहें | आगी, हरी |

~~~~~~~~

( तळटीप मागील पानावरून चालू )

कारान्त रूप केवळ अनेकवचनांतच आढळते असे नाही, तर एकवचनांतही आढळतें ( उदा., " जेणें कृतकार्यों होइजे । " ज्ञा. १:२५ ) मोडकशास्त्री हीं रूपें तृतीयेचीं न मानतां प्रथमेचीं समजतात. तीं विशेषेंकरून भावे प्रयोगांत येतात व त्यांतील पूरक सव्यय ( नाम, सर्वनाम वा विशेषण ) ओं–प्रत्ययान्त असतें. श्री. नेने यांनी मात्र राजवाडे–मताचा पाठपुरावा केला आहे. ( भाइसंमं. त्रैमासिक, १५.१; १६.१ ).
~~~~~~~~

| | | | |
|---|---|---|---|
| स. :–अग्नौ | अग्गिम्मि | अग्गिहिँ | आगी, हरी |
| सं. :–अग्ने | अग्गि–ग्गी | अग्गि–ग्गी | आगी हो, हरीहो |
| चान्त :– — | — | — | आगिच, हरिच |
| शब्दयोगी — | — | — | हरिवाँचौनि, हरीविण, हरीआँतु |

अनेकवचन

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. :–अग्नयः | अग्गी | अग्गी | आगी, हरी |
| द्वि. :–अग्नीन् | अग्गी | अग्गी | आगी, हरी |
| तृ. :–अग्निभिः | अग्गिहि–हिं–हिँ | अग्गिहि–हिं–हिँ | आगीँ, हरीँ |
| च. :–अग्निभ्यः | — | — | आगीँ, हरीँ |
| पं. :–अग्निभ्यः | अग्गीहिंतो, अग्गित्तो | अग्गिहुँ | आगीँहूनि, हरीँहूनि |
| ष. :–अग्नीनां | अग्गिणा–णां–णाँ | अग्गिहां–हुँ | आगीँ, हरीँ |
| स. :–अग्निषु | अग्गिसु–सुं–सुँ | अग्गिहिँ | आगीँ, हरीँ |
| सं :–अग्नयः | अग्गी, अग्गिणो | अग्गिहोँ | आगीनोँ, हरीनोँ |
| चान्त :– — | — | — | आगीँच, हरीँच |
| शब्दयोगी :– — | — | — | आगीँविण, आगीँतव, इ. इ. |

( १ ) वर्तमान मराठी हरीनें व हरींनीं अशीं तृतीयेचीं रूपें करते.

( १ ) प्रथमा :–अपभ्रंशापासून.

( २ ) द्वितीया :–अपभ्रंशापासून. अनुस्वाराखेरीज.

( ३ ) तृतीया :–एकवचन अनुस्वार काढून व दीर्घ करून; अनेकवचन हिँ–ची ईं करून.

( ४ ) चतुर्थी :–महाराष्ट्रींत व अपभ्रंशांत नाहीं, मराठींत आहे. ह्यावरून असें अनुमान निघतें कीं महाराष्ट्रींत इकारान्त पुल्लिंगी नामांचीं चतुर्थीचीं रूपें एका काळीं असावीं.

( ५ ) पंचमी :–अपभ्रंशापासून.

( ६ ) षष्ठी :–अपभ्रंशापासून.

( ७ ) सप्तमी :– „

( ८ ) संबोधन :– „

| महाराष्ट्री | अपभ्रंश | मराठी |
|---|---|---|
| म. पु. ३. करेसि | — | करिशि |
| ४. करेह | — | करा |
| प्र. पु. ५. करेइ | — | करी |
| ६. करेंति | — | करिति |

### परस्मैपदं सेट्

१ :– मानीँ, गीळीँ, स्रजीँ, धरीँ, संहारीँ

२ :– मानूँ, गीळूँ, स्रजूँ धरूँ, संहारूँ

३ :– मविसि, संडिसि, विचारिसि, मनिसि, चिंतिसि

५ :– दावी, उठी, घाली, नेंदी, अर्पी, त्यजी, फेडी, ग्रासी

६ :– लिहिति, सेविति, आप्लविति, निवडिति, रुणझुणिति, सुचीति, करीति

### आत्मनेपदं अनिट्

| महाराष्ट्री | मराठी |
|---|---|
| १. मण्णे, मणे ( मन्ये ) | मणे, ह्मणे |
| ५. लम्गए, अंदालए, झिज्जए, खिज्जए ( क्षीयते ) | लगे, लागे, अंदोले, झिजे, खिजे |
| ६. गज्जंते, शोभंते, वाजंते, युध्यन्ते§ | गाजते, शोभते, वाजते, जुझते |

" तियें मुकुटीं कुसुमें सुगंधें । शोभते भलीं ( अ. १ ला ) ।।‡

सेट् व अनिट् या दोन्ही वर्गांत सकर्मक व अकर्मक धातू येतात. आत्मनेपदाचीं कांहीं रूपें ज्ञानेश्वराच्या काळीं होतीं.†

### ५५. विधिलिङ्*

| संस्कृत | महाराष्ट्री | अपभ्रंश | मराठी |
|---|---|---|---|
| १ नमेयं | णमेज्जा–ज्ज, णमेज्जामि | — | नमिजे |

§ माहाराष्ट्री प्राकृतात ' युध्यन्ते ' असें तत्सम रूप न राहतां ते ' जुज्झन्ते ' असें होईल.

‡ इतर प्रतींतून ' शोभतीं ' असा पाठ आहे.

† ज्ञानेश्वरींतील आत्मनेपदाचीं रूपें हा मतभेदांचा विषय असून त्याची चर्चा प्रस्तुत आवृत्तीच्या प्रस्तावनेत केली आहे.

* मराठींत विधिलिङ् नाहीं. तर ' इजे ' प्रत्ययानें जीं कर्मणि रूपें होतात, त्यांनाच विध्यर्थ प्राप्त होतो. म्हणजे, रूप कर्मणीचें व अर्थ विधीचा असें मानावें लागतें. प्राकृतांतही विध्यर्थी रूपांचा पाया ' ज्ज ' प्रत्ययान्त कर्मणिच आहे. ( पहा : भांडारकर : WPL, पृ. २१५–२१६ ).

| संस्कृत | महाराष्ट्री | अपभ्रंश | मराठी |
|---|---|---|---|
| २ नमेम | णमेज्जाम | — | नमिजे |
| ३ नमेः | णमेज्जा, णमेज्जासि, णमेज्जासु | णमी णमिज्जसु | नमी, नमिजे, नमिजसु |
| ४ नमेत | णमेज्जाह | णमेज्जहु | नमिजे |
| ५ नमेत् | णमेज्जा–ज्जइ | णमेज्ज | नमिजे |
| ६ नमेरन् | णमेज्जा–ज्ज | — | नमिजे |

वर्तमान मराठींत विधिलिङ् चांगला राहिला आहे.

| वर्तमान मराठी | महाराष्ट्री |
|---|---|
| १ मी जाइनज्जा, खाइनज्जा, जेवेनज्जा | जाज्जा, खाज्जा, जेमेज्जा |
| २ आम्ही जाउँज्जा, खाऊँज्जा, जेवूँज्जा | जाज्जाम, खाज्जाम, जेमेज्जाम |
| ३ तूं जाज्जा, खाज्जा, जेवज्जा | जाज्जा, खाज्जा, जेमेज्जा |
| ४ तुम्हीं ,, ,, ,, | जाज्जाह, खाज्जाह, जेमेज्जाह |
| ५. तो खाज्जाइ, जाज्जाइ, जेवज्जाइ | जाज्जइ, खाज्जाइ, जेमेज्जइ |
| ६. ते खाज्जातील, जाज्जातील, जेवज्जातील | जाज्जा, खाज्जा, जेमेज्जा |

अलीकडील दादोबादि मराठी वैय्याकरण विधिलिङ्चा हा ' ज्जा ' प्रत्यय ' जा ' कल्पून सहाय क्रियापद समजत. मराठींत उच्चारांत सदा द्वित्त ज्जा येतो, हें त्यांनीं लक्ष्यांत घेतलें नाहीं. वर्तमान मराठींत अनुकरणानें जाईन, जातील, अशीं रूपें ' जा ' हा स्वतंत्र सहायधातु कल्पून होतात. त्यानें ही दादोबादिकांची दिशाभूल झाली. * ज्ञानेश्वरींत तिन्हीं पुरुषीं व दोन्ही वचनीं एक जेकारान्त च रूप आढळतें. फक्त मध्यमपुरुषाच्या एकवचनीं क्वचित् ' ज्जसु ' हा प्रत्यय आढळतो; किंवा ' ईं ' हा प्रत्यय आढळतो; जसे, करिजसु, दीजसु, करीं, देंईं, धरीं, ठेवीं, विचारीं, इ. इ. इ. ( तूं ) जाज्जा, खाज्जा ह्यांचे उच्चार खात्जा, जात्जा असे हि सध्यां करतात.

करिजे, जाणिजे, होइजे, हरिजे, पाहिजे, कथिजे, धरिजे, घेपिजे, राखिजे, जीविजे, निरखिजे, सेविजे, हाणिजे, गाइजे, वगैरे शेंकडों रूपें विधिलिङ्ाचीं ज्ञानेश्वरींत आहेत.

हा लिङ् बीम्स व हॉर्न्ले यांना ओळखतां आला नाहीं.

---

* दादोबांची दिशाभूल झालेली नाहीं. कारण वर्तमान मराठींत जुना विधिलिङ् राहिलेला नसून ' जा ' हा सहाय धातुच आहे. त्याचा विधिलिङ्च्या माहाराष्ट्रींतील ' ज्जा ' प्रत्ययाशीं संबंध नाहीं. ( चिं. वि. वैद्य : निबंध आणि भाषणें, पृ. १३८ ).

### ५६. आज्ञायां लोट्‡

| महाराष्ट्री | अपभ्रंश | मराठी |
| --- | --- | --- |
| १. हसामु, हसमु | — | हसों, हसूं |
| २. हसामो, हसम, हसेम | हसाहुँ | हसों |
| ३. हस, हससु, हसेहि | हसु, हससु, हसेहि | हसीं, हस, हससु |
| ४. हसह | हसहु, हसेहु | हसा, हसीं |
| ५. हसउ | हसउ | हसो |
| ६. हसंतु | हसंतु, हसहिँ | हसतु |

१. म्हणों, वानूं, गणूं, देखों
२. म्हणों, वानूं, गणों, देखों
३. करीं, जाण, कर, जाणें, आइक, आइके (आइकेइँ = आइकेहि), पाहे. उपसाहे, देख, जाणसु, देईं, दे.
४. देखा, अवधारा, आइकां, परियसां, करा, देयां, घेयां, नेयां.
५. जळो, फीटो, सुटो, असो, अवधारिजो, देओ, घेओ, जिओ, करो, करू.
६. देतुं, करितु, असतु, मारितु, घेंतु, एंतु, जांतु, पांतु–थु.
करसु, कीजसु वगैरे रूपें आत्मनेपदीं आहेत.
वर्तमान मराठींत ( १ ) हसों, ( २ ) हसों, ( ३ ) हस, ( ४ ) हसा, ( ५ ) हसो, ( ६ ) हसोत, अशीं रूपें होतात.

### ५७. अनद्यतनभूते लङ् ( सेट् व अनिट् )

| संस्कृत | प्राकृत | मराठी |
| --- | --- | --- |
| १. आसम्, अहसम् | आसि | ( असें ) असें, (हसें) हसें, करीं |
| २. आस्म अहसाम | आसीमो–आसीमु | असों, हसों, करूं |
| ३. आसीस्, अहसस् | आसि, आसीस् | असस, हसस, करीस |
| ४. आस्त, अहसत | — | असा–सां, हसा–सां, करां |
| ५. आसीत्, अहसत् | आसि | आत्मनेपद–असे, हसे, करी<br>परस्मैपद–असत, हसत, करीत |
| ६. आसन्, अहसन् | — | असत, हसत, करीत |

‡ येथें न सांगितलेला ‘ लोट् ’चा एक प्रकार राजवाड्यांनीं अन्यत्र दाखविला आहे. त्यांत लोट् चें सर्व पुरुषीं, वचनीं व लिंगीं एकच रूप होतें. जसें, “ आगा कुळाचेया चोखटपणा न लगा। आभिजात्यें झणें श्लाघा। व्युत्पत्तीचा ही वाउगा। सोसु कां वाहा॥ (ज्ञा. ९.४२७). तुळा : वर्तमान मराठींत : ‘ पचत नाहीं, तर कां खा ? ’

लङ् पुढे असतां, संस्कृतांत धातूंच्या मागें जो अडागम होतो, तो मराठींत होत नाहीं; प्राकृतांत हि क्वचित् होई. न होण्याकडे च प्राकृतांत प्रवृत्ति होती, ती मराठीनें अनपवाद कायम केली. भूतार्थे विहितस्य प्रत्ययस्य स्थाने स्वरान्तात् ही, सी, हीअ इत्येत आदेशा भवन्ति; व्यंजनान्ताद्धातोः परस्य भूतार्थे विहितस्य प्रत्ययस्य स्थाने इअ आदेशो भवति। अडागमलोपो विकल्पेन भवति; यथा :--

अकार्षीत् = कासी, काही, काहीअ, अकासी

अस्थात् = ठासी, ठाही, ठाहीअ, अठासी

अग्रहीत् = गेण्हिअ

वैदिक लेट्मध्यें हि कधींकधीं अडागम होत नसे.

ह्या लङ्ला दादोबा रीतिभूत ह्मणे व तो मराठींतील जुन्या वर्तमानापासून, ह्मणजे लट्-पासून निघाला, असें प्रतिपादी.

उदाहरण :-

तवं कृष्णु ह्मणे पांडुसुता। तो वैवस्वतु जैं होता।
तैं आह्मीं नसों ऐसी चिंता। प्रतीति तुज ॥ ४० ॥

( अध्याय ४ था )

येथें ह्मणे ( प्रथमपुरुष एकवचन ) व नसों ( उत्तमपुरुष अनेकवचन ) अनद्यतनभूते लङ्§चें आहे.

तेथ तीन्ही लोक डंडलित। मेरुमंदार आंदोळत।
समुद्रजळ उसळत। आकाशवेन्ही ॥ १५५ ॥

( अध्याय १ ला )

येथें डंडलित, आंदोळत हीं लङ्§चीं प्रथमपुरुष अनेकवचनाचीं रूपें आहेत; व उसळत हें प्रथमपुरुषाचें एकवचन आहे.

१. अहसम् पासून मराठी ( अ ) हसँ. अन्त्य अँ चा ऍं करण्याचा मराठीचा स्वभाव. तदनुरोधानें हसें. हसँ असा उच्चार अशिष्ट अद्यापि करतात.

२. अहसाम् पासून ( अ ) हसाउँ, हसों.

३. अहसस् पासून ( अ ) हसस.

४. अहसह पासून ( अ ) हसा.

५. अहसत् पासून ( अ ) हसत किंवा ( हसअ = हस = हसे ) हसे. ( 'हस' उच्चार अशिष्ट लोक करतात. )

६. अहसन् पासून ( अ ) हसँत, हसत.

---

§ वरील दोन्ही ठिकाणी मुळात 'लुङ्' असे नजरचुकीने छापले आहे.

दादोबा, गोडबोलि, बीम्स व होर्न्ले हे सर्व ह्या लङ्‌ला लट् समजत. परंतु असति ( लट् ) व असस ( लङ् ) ह्यांतील भेदाचें कारण काय, हा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न त्यांनीं केला नाहीं.

वर्तमान मराठींत ( १ ) हसें, ( २ ) हसों, ( ३ ) हसस, ( ४ ) हसा, ( ५ ) हसे, ( ६ ) हसत, अशीं रूपें होतात.

हा लङ् वर्तमान मराठींत फार योजतात.¶

## ५८. लुङ्

लुङ्‌चा मागमूस मराठींत बिलकुल राहिलेला नाहीं. एक रूप मात्र राहिलें आहे. तें ' होत्या ' हें होय. हें अर्धमागधींतील आहे. परंतु मराठींत ज्या अर्थी तें अद्याप आहे, त्या अर्थीं महाराष्ट्रींत हि असावें.

अभूत् = अहोत्था = होत्था = होथा = होता = हों ता.

४७ व्या कलमांतील " तो त्रैवस्तु जैं होता " ह्या चरणांतील होता हें रूप लुङ्‌चें आहे.

भवत् पासून झालेलें जें वर्तमानकाळवाचक धातुसाधित विशेषण ' होत ' त्याच्या धर्तीवर ह्या लुङ् ' होता ' रूपाचीं तिन्हीं लिंगीं होता, होती, होतें, अशीं रूपें अनुकरणानें ज्ञानेश्वरकालीं च झालीं. ह्मणजे ह्या रूपाच्या उगमाची आठवण ज्ञानेश्वरकालीं च बुजून कित्येक शतकें झालीं होतीं. †

( लुङ् ) होत्या = होता हें रूप बीम्स व होर्न्ले यांना माहीत नाहीं.

हें रूप वर्तमान मराठींत शाबूत आहे.

## ५९. लिट् ‡

अनद्यतनपरोक्षभूते लिट् मराठींत नाहीं. महाराष्ट्रींत किंचित् होता; ह्मणजे एखाद्या

---

¶ राजवाडे यांचे लङ्‌विषयक वरील सर्वच विवेचन विवाद्य आहे. कारण मराठींत संस्कृतमधील ' लट् ' करून आलेला ऐतिहासिक वर्तमान ( (Historic Present ) हा एकच काळ असून त्याच्या रूपांना संदर्भानुसार वर्तमान- भूत-भविष्य असे भिन्नार्थ प्राप्त होतात. लङ् पूर्वीच लुप्त झाला. मराठींत तो नाहीं. त्यामुळे त्याचा उल्लेख न करणारे दादोबादि वैयाकरण दोषार्ह ठरत नाहींत. ( तुळपुळे : या. का. म. § १७० ) वैद्यांना मात्र राजवाड्यांनीं दाखवून दिलेले लङ्‌चे अस्तित्व मान्य दिसतें. ( निबंध आणि भाषणें, पृ. १३६-१३७ ).

† लिंगवचनानुसार रूपें बदलत असतांना तीं धातुसाधिताचीं न मानतां ' लुङ् ' चीं, म्हणजे एका आख्याताचीं, कशी मानतां येतील ? अर्थात्, मराठींत लुङ्‌चा निरपवाद लोप झालेला आहे. वरील ' होता ' हें रूप लुङ्‌चें नाही.

‡ मुळांत मथळा देण्याचें राहून गेलें आहे.

धातूचें एखादुसरें रूप होतें, तसें च मराठींत अस, आह धातूचें ' आहा ' असें अनद्यतनभूते लिट्चें रूप आहे; जसें :—

" तो विश्वासें मारितां रिपु । निवटूनि घातला दर्पु ।
आणि जेयाचा आहा कंपु । तापसांसि ॥ १०५१ ॥ ( अ. १८ )

म्हणजे, ज्यामुळें तापसांना कंप झाला.

| संस्कृत | मराठी |
|---|---|
| १. आस | |
| २. आसिम | |
| ३. आसिथ | |
| ४. आस | |
| ५. आस | आह ( उच्चारदाढ्यार्थ आहा ) |
| ६. आसुः | |

अनद्यतनपरोक्षभूते लिट् चें सान्या ज्ञानेश्वरींत हें एक च रूप आहे. हें रूप वर्तमान मराठींत नाहीं.

## ६०. प्रायोभूते निष्ठान्तप्रयोग एव प्राकृते दृश्यते §

महाराष्ट्रींत ' क्त ' व ' क्तवतु ' प्रत्यय लागून झालेलीं धातुसाधित विशेषणें भूतकालाचें बरें च काम करीत. तो च कित्ता मराठीनें — म्हणजे महाराष्ट्रीच्या नातीनें — गिरविला आहे. लङ्च्या बरोबरीनें ' क्त ' व ' क्तवतु ' प्रत्यय लागून झालेलीं धातुसाधितें मराठींत भूतक्रिया-दर्शनार्थ योजतात. ह्या ' क्त ' व ' क्तवतु ' प्रत्ययांचा प्रपंच योग्य स्थलीं पुढें विस्तारानें केला आहे. ( कलम ६० पहा. )

## ६१. अनद्यतनभविष्यति लुट् §

| संस्कृत | मराठी |
|---|---|
| १. पूरयितास्मि | पुरवितांहें, पुरवितों ( वर्तमान मराठी ) |
| २. पूरयितास्मः | पुरविताहों, पुरवितों ( व. म. ) |

---

§ हा काळ (लुट्, किंवा First Future) प्राकृतकाळींच लुप्त झाला. अर्थात् मराठींत त्याची अपेक्षा नाहीं व तो अस्तित्वातही नाहीं. तो आहे असें म्हणण्यात मुख्य अडचण म्हणजे मराठींतील जुन्या भविष्यार्थी व नव्या संकेतार्थी रूपांना लिंगविकार होत असल्यानें तीं धातु-साधित विशेषणें मानावीं लागतात. त्यामुळें बीम्स व होर्न्ले यांनीं हा ' लुट् ' ओळखण्याचा प्रश्न निर्माण होत नाहीं. कारण संस्कृतांतील प्रमाणें मराठींत दोन भविष्यकाळ नाहींत, एकच आहे. या बाबतींत चिं. वि. वैद्य राजवाड्यांशीं सहमत दिसतात ( निबंध–भाषणें, पृ. १३९ ). पण लट्च्या बाबतींत मात्र त्यांना बीम्सची उपपत्ती अधिक ग्राह्य दिसते ( सदर, पृ. १३९ ).

| संस्कृत | मराठी |
| --- | --- |
| ३. पूरयितासि | पुरविताहासि, पुरवितासि, पुरवितास ( व. म. ) |
| ४. पूरयितास्थ | पुरविताहाँ, पुरविताँ ( व. म. ) |
| ५. पूरयिता | पुरविता, पुरविता ( व. म. ) |
| ६. पूरयितारः | पुरविते, पुरविते–पुरवितेति ( व म. ) |

कंसांतील रूपें वर्तमान मराठींत भूतहेतुहेतुमद्भावे योजितात : जसें, ' जर मी जातों तर तो येता. '

संस्कृतांत हा काळ संयुक्त आहे. पूरयितृ या नामाच्या प्रथमेच्या एकवचनाला अस् धातूच्या वर्तमानकालाचीं रूपें उत्तम व मध्यम पुरुषीं लावतात व प्रथम पुरुषीं लावीत नाहींत, आणि प्रथम पुरुषाच्या अनेकवचनीं नामाचें प्रथमेचें अनेकवचन योजतात. तो च प्रकार हुबेहुब मराठींत होतो. हा लुट् बीम्स व होर्न्ले यांना माहीत नाहीं. वर्तमान मराठी कवितेंत हें रूप योजतात; बोलण्यांत क्वचित् येतें.

## ६२. भविष्यति लृट् ( अनिट् )

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
| --- | --- | --- |
| १. हसिष्यामि | हसेहिमि | हसें + ल = हसेंन |
| २. हसिष्यामः | हसेहिमो | हसूँ + ल = हसूँ |
| ३. हसिष्यसि | हसेहिसि | हससि + ल = हससील |
| ४. हसिष्यथ | हसेहित्था, हसेहिह | हसा + ल = हसाल |
| ५. हसिष्यति | हसेहिइ | हसेइ + ल = हसेल |
| ६. हसिष्यंति | हसेहिंति | हसति + ल = हसतील |

## भविष्यति लृट् ( सेट् )

| महाराष्ट्री | मराठी |
| --- | --- |
| १. करिस्सामि, करिहिमि | करीँ + ल = करीन |
| २. करिस्सामो-मु, करिहिमो | करूँ + ल = करूँ |
| ३. करिस्ससि, करिहिसि | करिसि + ल = करिसील |
| ४. करिस्सथ, करिहित्था | करा + ल = कराल |
| ५. करिस्सइ, करिहिइ | करी + ल = करील |
| ६. करिस्संति, करिहिंति | करिति + ल = करितील |

करिहिमि = करिहइँ = करीँ

करिहिमु = करिहउँ = कऱ्युँ = करूँ

करिहिसि = करिहसि = करिसि

करिहित्था = करिहहा = कऱ्या = करा

करिहिइ = करिइइ = करी
करिहिंति = करिइंति = करिंति = करिति

अशीं लृट्चीं§ महाराष्ट्रीपासून मराठींत रूपें निपजतात. तीं लट्च्या रूपांसारखीं च कानाला भासतात. तेव्हा लृट्रूपें व लट्रूपें ह्यांतील भेद दाखविण्याकरितां मराठीनें लृट्च्या रूपांना स्वार्थे ल प्रत्यय शानेश्वरकाळीं विकल्पानें लावला. विकल्पानें लावला असें म्हणण्याचें कारण कीं, ल प्रत्ययाखेरीज साध्रीं लृट्चीं रूपें ज्ञानेश्वरींत सांपडतात. शक ११२८ तील पाटण येथील शिलालेखांत उघटे व वाहति हीं रूपें 'ल' प्रत्ययाखेरीज लृट्चीं आहेत. स्वार्थे ल लागतो, हें बीम्स व होर्न्ले यांना सोपपत्तिक सांगतां आलें नाहीं.‡

वर्तमान मराठींत ( १ ) हसेन, ( २ ) हसूँ, ( ३ ) हसशील, ( ४ ) हसाल, ( ५ ) हसेल, ( ६ ) हसतील, अशीं रूपें होतात. हा लृट् वर्तमान मराठींत फार योजतात.

## ६३. हेतुहेतुमद्भावे लृङ्

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| १. अकरिष्यम् | करिस्सम् | करीँ + इल = करीन |
| २. अकरिष्याम | करिस्सामु | कऱ्यूँ = करूँ + इल = करूँ |
| ३. अकरिष्यस् | करिस्सस् | करिस + इल = करिसील |
| ४. अकरिष्यत | करिस्सह | कऱ्या = करा + ल = कराल |
| ५. अकरिष्यत् | करिस्सइ | करी + इल = करील |
| ६. अकरिष्यन् | करिस्सन्त | करित + इल = करितील |

भूतकाळांतल्याप्रमाणें येथें हि अडागमाचा लोप झालेला आहे. लृट् चीं व लृङ् चीं रूपें सारखीं च दिसतात. इतकें च कीं अर्थांत भेद आहे. यद्यहमिदमकरिष्यम् = जर मी हें करीन, ह्या वाक्यांत 'करीन' हें लृङ् चें रूप आहे. हा लृङ् बीम्स व होर्न्ले यांना माहीत नाहीं.†

§ या संबंध परिच्छेदांत मूळ प्रतींत नजरचुकीनें 'लृट्'च्या ऐवजी 'लुट्' असे छापलें आहे.

‡ मराठींतील हा ( एकमेव ) भविष्यकाळ कांही अंशीं संस्कृत 'लृट्'चा वारस व कांही अंशीं वर्त०च्या रूपांना 'ल' प्रत्यय जोडून साधलेला काळ आहे. म्हणजेच, राजवाडे व बीम्स–होर्न्ले या दोघांच्याही म्हणण्यांत तथ्यांश आहे. या प्रश्नाचे सविस्तर विवेचन प्रस्तुत लेखकाच्या 'यादवकालीन मराठी भाषा' या ग्रंथांत आलें आहे. ( § १७१ )

† वैद्यांच्या मतेंही हा लृङ् मराठींत नाहीं. ते म्हणतात, "करिष्यामि याचा मराठींत मागमूस नाहीं, मग अकरिष्यम् याचा कोठून असेल ?" ( निबंध–भाषणें, पृ. १३९ ). शिवाय लृङ्चीं रूपें लृट्सारखी दिसतात हें राजवाड्यांनाही मान्य आहे. मग तीं लृङ्चींच आहेत असें मानण्यास आधार काय ? सारांश, हा लकार मराठींत नाहीं.

### ६४. आठ लकार

येणेंप्रमाणें, ( १ ) वर्तमाने लट्, ( २ ) विधिलिङ्, ( ३ ) लोट्, ( ४ ) अनद्यतनभूते लङ्, ( ५ ) भूते लुङ्, ( ६ ) अनद्यतनभविष्यति लुट्, ( ७ ) भविष्यति लृट्, व ( ८ ) क्रियायाः अनिष्पत्तौ हेतुहेतुमद्भावे लृङ्, असे आठ * लकार महाराष्ट्री द्वारा मराठींत उतरले आहेत. पैकीं भूते लुङ् चें होत्या = होता एवढें एक च रूप राहिलें आहे. भविष्यति लृट् व लृङ्. यांचीं रूपें दिसण्यांत व बोलण्यांत एक च भासतात; परंतु त्यांचे उगम अगदीं निरनिराळे आहेत. वर्तमाने लट् मध्यें परस्मैपद व आत्मनेपद आहे. विधिलिङ् व लोट् यांत हि मध्यमपुरुषाच्या एकवचनीं आत्मनेपद आहे. वर्तमाने लट् आणि भविष्यति लृट् व लृङ् ह्यांत कित्येक धातू प्रत्ययांच्या पाठीमागें इडागम घेतात व कित्येक घेत नाहींत. इडागम घेणाऱ्या धातूंना सेट् व न घेणाऱ्यांना अनिट् ह्मटलें आहे. कित्येक धातू वेट्, ह्मणजे इडागम विकल्पानें घेणारे हि आहेत. जसें :—

तो करी — सेट् }
तो उपकरे — अनिट् } वेट्

हा इडागम घेण्याचा व न घेण्याचा किंवा विकल्पानें घेण्याचा गुण मराठीनें महाराष्ट्रीपासून घेतला आहे. महाराष्ट्रींत हस् चें हसेमि व कृ चें करिमि किंवा करेमि अशी रूपें कां होतात, तें उलगडण्याचें काम येथें अप्रस्तुत आहे.

( १ ) लट्, ( २ ) लिट्, ( ३ ) लुट्, ( ४ ) लृट्, ( ५ ) लेट्, ( ६ ) लोट्, ( ७ ) लङ्, ( ८ ) लिङ्, ( ९ ) लुङ्, व ( १० ) लृङ्, असे मूळचे दहा लकार. पैकीं वैदिक लेट् संस्कृतांत लोप पावला होता. लिट् महाराष्ट्रींत बहुतेक लुप्त झाला होता; आणि लुङ् हि लोपत च होता. विधिलिङ् व आशीर्लिङ् महाराष्ट्रींत एक झाले होते. त्यामुळें ( १ ) लट्, ( २ ) लिङ्, ( ३ ) लोट्, ( ४ ) लङ्, ( ५ ) लुङ्, ( ६ ) लुट्, ( ७ ) लृट्, व ( ८ ) लृङ्, असे आठ च लकार ज्ञानेश्वरी मराठींत दृष्टीस पडतात. †

### ६५. कर्मणि व भावे : पहिला प्रकार

संस्कृतांत कर्मणि धातूंस य, इय प्रत्यय लागतात. तत्स्थानीं महाराष्ट्रींत प्रायः ज्ज, इज्ज आदेश होतो. त्याचा मराठींत ज आदेश होतो.

---

* खरोखर तीनच (लट्, लुट् व लोट्).

† ज्ञानेश्वरी-मराठींत अवशिष्ट असलेले लकार आठ नसून तीनच आहेत व ते म्हणजे ( १ ) लट्, ( २ ) लुट् व ( ३ ) लोट्, हे मागें तळटीपांतून सांगितलेंच आहे. या प्रश्नाच्या अधिक विवेचनासाठी प्रस्तुत लेखकाचे 'यादवकालीन मराठी भाषा,' परिच्छेद § १६९ ते § १७२ पहावे.

क्रिय = करिज्ज = करिज
गम्य = गमिज्ज = गमिज
क्रिय = किज्ज = कीज

करिज, गमिज, कीज ह्या कर्मणि धातूंना बहुतेक सर्व लकार होतात.

### कर्मणि गम्

गम्य = गमिय = गमिज्ज = गमिज

#### लट्

| महाराष्ट्री | मराठी |
|---|---|
| १ गमिज्जामि | गमिजें |
| २ गमिज्जामु | गमिजों |
| ३ गमिज्जसि | गमिजसि |
| ४ गमिज्जह | गमिजा |
| ५ गमिज्जइ | गमिजे |
| ६ गमिज्जंति | गमिजति |

#### विधिलिङ् †

| | |
|---|---|
| १ गमिज्जेज्जा | गमिजे |
| ३ गमिज्जेज्जासु | गमिजसु |
| ६ गमिज्जेज्जा | गमिजे |

#### लोट्

| | |
|---|---|
| १ गमिज्जामु | गमिजों |
| ५ गमिज्जउ | गमिजो |
| ६ गमिज्जंतु | गमिजतु |

#### लृट्

| | |
|---|---|
| १ गमिज्जिहिमि | गमिजैन |
| ५ गमिज्जिहिइ | गमिजैल |
| ६ गमिज्जिहिंति | गमिजतील |

---

† क्रियापदांचीं कर्मणि रूपेंच विध्यर्थी वापरलीं जात असल्यानें कर्मणीचा आणखी नविलिङ् हा प्रकार अशक्य आहे. ( मागें ५५ व्या परिच्छेदाची तळटीप पहावी. )

## कांहीं धातूंचीं कर्मणि रूपें

| | |
|---|---|
| १ हरिसिज्जइ = हरिषिजे | ११ लहिज्जइ = लाहिजे |
| २ आरुब्भिज्जइ = आरंबिजे | १२ च्छिविज्जइ = सिविजे ( स्पृश् ) |
| ३ होईज्जइ = होइजे | १३ बुझिज्जइ = बुझिजे |
| ४ अनुभविज्जइ = अनुभविजे | १४ ठाविज्जइ = ठेविजे |
| ५ धरिज्जइ = धरिजे | १५ गेण्हिज्जइ = घेइजे |
| ६ जरिज्जइ = जरिजे | १६ भणिज्जइ = ह्मणिजे |
| ७ तरिज्जइ = तरिजे | १७ करिज्जइ = करिजे |
| ८ हरिज्जइ = हरिजे | १८ जिइज्जइ = जीजे ( जीव् ) |
| ९ दिज्जइ = दीजे | १९ जिणिज्जइ = जीणिजे ( जी ) |
| १० रमिज्जइ = रमिजे | २० भिज्जइ = भिजे |

२१ जाणिज्जइ = जाणिजे, नेणिजे

वर्तमान कृदन्त :– गमिजत ( ता – ती – तें )
भूत कृदन्त :– गमिजेल ( ला – ली – लें )
भविष्य अव्ययी कृदन्त :– गमिजतां

वर्तमान गद्य मराठींत हीं रूपें नाहींत; लुप्त झालीं. जाणिजे, ह्मणिजे, ह्मणजे, वगैरे एखादुसरें रूप राहिलें आहे. परंतु, वर्तमान पद्यांत हीं रूपें येतात.

ह्याचा अर्थ इतका च कीं, पद्यांत पांचसहाशें वर्षांपूर्वीचीं रूपें योजिलेलीं चालतात. ह्या दृष्टीनें पहातां, संस्कृत नाटकांत, महाराष्ट्री पद्यांत व सौरसेनी गद्यांत योजिलेली ज्या अर्थीं आढळते, त्यां अर्थीं महाराष्ट्री सौरसेनीहून वृद्ध असावी, असें ह्मणणें भाग पडतें. ऐतिहासिक दृष्ट्या पहातां सौरसेनी महाराष्ट्रीहून प्राचीन आहे. प्रथमदर्शनीं हा विरोधसा भासतो खरा; परंतु, ह्याला उत्तर आहे; तें असें कीं, राजकीय दृष्ट्या महत्त्वाची व सर्वसामान्य भाषा कवितेंत योजून, सर्व देशांतील व प्रांतांतील श्रोत्यांना आपली कविता सारखी च कळावी, असा कालिदासादि कवींचा आशय असावा.

## ६६. कर्मणि व भावे

### दुसरा प्रकार

महाराष्ट्रींत धातूला व्व किंवा व प्रत्यय लागून कर्मणि व भावे रूपें होतात. त्यांपासून मराठींत ‘ व ’ प्रत्यय लागून कर्मणि व भावे रूपें होतात. भावे रूपें प्रथमपुरुषीं एकवचनीं तेवढीं चालतात. हा गुण मराठीनें संस्कृतपासून घेतला आहे. मराठींत कर्ता प्रायः चतुर्थ्यन्त किंवा चकारान्ताच्या तृतीयान्त असतो.

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| भूयते | हुव्वइ | होववे |
| लूयते | लुव्वइ | लववे |
| परिश्रूयते | परिसुव्वइ | परिसवे |
| जीव्यते | जिव्वइ | जिववे |
| जीर्यते | जीरइ | जिरवे |
| तीर्यते | तीरए | तरवे |
| पूर्यते | पूरइ | पुरवे |
| रम्यते | रम्मइ | रमवे |
| गम्यते | गम्मइ | गमे |
| गृह्यते | घेप्पइ | घेंपे, घेववे |
| स्थीयते | ठीअइ | ठेववे |
| दृश्यते | दीसए | दीसे |
| लभ्यते | लब्भइ | लाभें |
| स्पृश्यते | सिप्पइ | सिंपे |
| क्रियते | कीरइ | करवे |
| ज्ञायते | णव्वइ | जाणवे, नेणवे |
| भण्यते | भण्णइ | ह्मणवे, ह्मणिपे |

मराठींत सर्व कर्मणि व भावे रूपें आत्मनेपदि व अनिट् असतात. सबब,

हुव्वइ = हुव्वए = हुव्ववे = होववे

भण्णइ = भण्णए = भणवे

पाठीमागील वकारामुळें व अकारामुळें पुढील एकाराला वेकारादेश होतो.

## भावे लट् व लङ्

सकर्मक :– मातें, तूतें, तेयातें, माझेन, तूझेन, तेयाचेन तें काम करवे, करवे ना, किंवा न करवे.

मातें इ. इ. तीं कामें करवति, करवति ना, इ. इ.

अकर्मक :– मातें इ. इ. हसवे, हसवे ना, न हसवे.

## लट्

सकर्मक :– मातें काम करवैल

मातें कामें करवतील

अकर्मक :– मातें हसवैल

कृदन्त :- करवत, हसवत, इ. इ.

करवल, हसवल, इ. इ.

बेपे, नोडवे, रिगवे, घलवे, नांगवे, पसरवे, बचवे, इत्यादि अनेक रूपें ज्ञानेश्वरींत आहेत.

प्रयोजक, सन्नन्त, नामधातू वगैरेचीं भावे रूपें होतात.

प्रयोजक :- करवि— करविव

मारवि— मारिव

हसवि— हसविव

ज्ञानेश्वरींत ह्या भावे रूपांचा मूळचा अर्थ राहून,शिवाय कित्येक स्थलीं शक्यार्थ हि प्रतीत होतो. वर्तमान मराठींत मूळचा अर्थ जाऊन केवळ शक्यार्थ च तेवढा राहिला आहे.

होर्न्ले ह्या भावे रूपांना प्रयोजक समजे. परंतु हीं प्रथमपुरुषीं च तेवढीं कां चालतात, तें त्यानें लक्ष्यांत घेतलें नाहीं.

कर्मणि :- क्रियते = करिज्जइ = करिजे

भावे :- क्रियते = किरइ = करवे

प्रयोजक :- कारापयति = कारावेइ = करवी

तव्यत् :- कर्तव्य = करव्व = कराव ( वा–वी–वें ) ( विशेषण )

प्रथमपुरुषी एकवचनी भावे रूप सदा एकारान्त असतें, व प्रयोजक रूप ईकारान्त असतें.

हा भावे वर्तमान मराठींत बोलण्यांत फार येतो.

### प्रयोजक कर्मणि व भावे

{ आरोप्य = आरोपिज ( आरोपिजे, आरोपिजो )
{ आरोप्य = आरोपव ( आरोपवे )

{ कराप्य = करविज ( करविजे )
{ कराप्य = करवव ( करववे )

{ मान्य = मानिज ( मानिजे )
{ मान्य = मानव ( मानवे )

### ६७. णिच् प्रयोजनार्थी ( सेट् )

मराठींत प्रयोजक धातु बनविण्याचे खालील प्रकार आहेत :—

( १ ) धातूच्या उपधेस वृद्धि किंवा गुण होऊन प्रयोजक बनतें; जसें, फिट–फेड; फुट–फोड; भिड–भेट; दप–दाप; पड–पाड; भर–भार, सुट–सोड; मर–मार; मन–मान; लव–लाव; वच–वांच; उखडी–उपाडी; इ. इ.

संस्कृतांत णिचाचा अर्थ सर्व णिजन्त रूपांत असतो च असा नियम नाहीं. तो च प्रकार मराठींत होतो. दुसऱ्याकडून क्रिया करविण्याचा हेतु प्रयोजकसाधित धातूंत असतो. संस्कृत प्रयोजकसाधित धातु सिद्ध समजून त्यांची पुन्हा प्रयोजकरूपें मराठी बनविते; जसें,

फेड–फेडविणें; फोड–फोडविणें; इ. इ.

ह्या प्रयोजकसाधित धातूंचा मराठींत साध्या धातूंप्रमाणें उपयोग होतो. बाकी महाराष्ट्रींत हीं प्रयोजक रूपें होतीं; जसें,

### प्रथमपुरुष एकवचन

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| *उद्घटापयति | उग्घाडइ | उघाडी |
| पातयति | पाडइ | पाडी |
| मारयति | मारइ | मारी |
| नाशयति | नासइ | नाशी |
| मानयति | माणइ | मानी |
| दर्पयति | दापइ | दापी |
| घटयति | घडेइ | घडी |

( २ ) संस्कृत आपय, महाराष्ट्री आव पासून मराठींत ' अव ' आगम धातूला होऊन प्रयोजक धातु बनतो; जसें,

### प्रथमपुरुष एकवचन

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| * हसापयति | हसावेइ | हसवी |
| * रमापयति | रमावेइ | रमवी |
| * करापयति | करावेइ | करवी |
| * घटापयति | घडावेइ | घडवी |
| * हारपयति | हारवइ | हारवी |
| * गमापयति | गमावेइ | गमावी, गमवी ( घालवी ) |
| उत्थापयति | उट्ठवेइ | उठवी |
| स्थापयति | ठवेइ | ठेवी, ठवी ( अशिष्ट ) |
| * हरिपयति | हीरवइ, हीरइ | हीरवी, हीरी |
| रोपयति | रोव्वेइ | रोवी |

( ३ ) संस्कृत प मराठींत प रहातो; जसें,

| संस्कृत | मराठी |
|---|---|
| आरोपयति | आरोपी |
| अपलापयति | अपलापी |

( ४ ) संस्कृत अय बद्दल मराठींत आल होतो; जसें,

| | |
|---|---|
| घ्राहयति | घाली ( घेआली ) |

प्रयोजना विवक्षित असतां, प्रयोजक धातु नियमानें सेट् असतात.

### प्रथमपुरुष एकवचन

कर्त्तरि

लट् : – हसवी

लिङ् : – हसविजे, हसविज्जा, हसवज्जा

लोट् : – हसवो

लङ् : – हसवी

लृट् : – हसवील

कर्मणि

लट् : – हसविजे

लोट् : – हसविजो

लृट् : –हसविजेल

हा प्रयोजक वर्तमान मराठींत कायम आहे.

### ६८. सन् प्रक्रिया

मराठींत इच्छार्थक धातु महाराष्ट्रीद्वारा आले आहेत :—

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| बुभुक्ष् | बुभुक्ख | बुभुक(णें) |
| चिकित्स् | चिइच्छ | चेच(णें) |
| पिपत्स् | | प्यास |
| निदिध्यास ( ? ) | | ध्यास |
| इर्त्स | | ईर |
| रित्स् | | रेच |

इतर क्रियापदांप्रमाणें ह्यांचे लकार होतात. हे सन्नन्त धातु वर्तमान मराठींत आहेत.

## ६९. यङ् प्रक्रिया

पौनःपौन्यवाचक धातू मराठींत फार आहेत. ते अर्थात् महाराष्ट्रींतून व अपभ्रंशांतून आलेले आहेत.

| महाराष्ट्री | मराठी |
|---|---|
| ढंढल्ल | ढेंढाळणें |
| ढंढल्ल | ढंडळणें |
| ढंढुल्ल | धुंडाळणें |
| जग्ग | जागणें |
| चंकम्म | चँकवणें |

मांभाळणें, जगणें, गाजाणें, कैंकाटणें, बोंबलणें, गागणें, तुडुंबणें, तातडणें, चाचपणें, गोंगरणें, फोफावणें, लोळवणें, रोरवणें, खोंकणें, वगैरे शेकडों धातू पौनःपौन्यवाचक आहेत.

हे धातू वर्तमान मराठींत आहेत.

## ७०. नामधातू

| महाराष्ट्री | मराठी |
|---|---|
| दुक्खामि | दुखें |
| सुहामि | सुहें |
| धवलइ | ढवले |
| सुक्कहिँ | सुके |
| संझाअइ | सांझावें |
| सुहाअइ | सुहावे |

कळासणें, दमदमणें, कडकडणें, कुरकुरणें, किरकिरणें, खळखळणें, घुमघुमणें, थरथरणें, वेगावणें, एकाबटणें, धगधगणें, फुरफुरणें, मिसमिसणें, सळसळणें, खिमखिमणें, सुळसुळणें, दुखदुखणें, वगैरे शेकडों धातू आहेत. परंतु, ह्यांचा विस्तारानें ऊहापोह करणें शब्दसिद्धीच्या प्रांतांतलें आहे. संस्कृतांत नामधातूंना सर्व लकार होतात. परंतु त्यांतल्या त्यांत प्रथमपुरुष एकवचन प्रायः आढळतें. त्या च धर्तीवर सांझावणें, कळमळणें, वगैरे नामधातूंचें प्रथमपुरुष एकवचन मराठींत योजतात.

वर्तमान मराठींत हे धातू शेकडों आहेत व होतात.

**सप्तमान्हिक समाप्त**

## अष्टमाह्निक

### ७१. कृदन्तें

कृदन्तें दोन प्रकारचीं; व्ययी व अव्ययी. व्ययी कृदन्तें वर्तमान, भूत व भविष्य ह्या तीन काळीं होतात. अव्ययी कृदन्तें भूत व भविष्य या दोन काळीं होतात. कित्येक व्ययी कृदन्तें सार्वकालिक असतात.

### ७२. वर्तमान कृदन्तें‡

#### कर्तरि परस्मपद अनिट्

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| भवत् | होन्त | होँत |
| सत् | सन्त | सँत |
| *असत् | *असन्त | असत |
| प्राप्नवत् | पावन्त | पावँत |
| भणत् | भणन्त | ह्मणत |
| ददत् | देन्त | देँत |

परस्मैपदांतील वर्तमान कृदन्तांना पुल्लिंगीं आ, स्त्रीलिंगीं ई व नपुंसकलिंगीं एँ आदेश होतात; व हे शब्द आकारान्त ( पुल्लिंगी ), ईकारान्त ( स्त्रीलिंगी ) व एँकारान्त नपुंसकलिंगी शब्दांप्रमाणें चालतात. क्वचित् अकारान्त नपुंसक शब्दाप्रमाणें चालतात; जसें, वर्तत–वर्ततें.

#### कर्तरि आत्मनेपद

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| शिक्षमाण | सिक्खाण | सिह्याण ( णा, णी, णेँ ) |
| क्रियमाण | किस्साण | किरसाण ( णा, णीं, णेँ ) |
| जीवमान | जीवाण | जीवाण ( णा, णी, णेँ ) |

क्रेयमाण = किराण, जानान = जाण, इ. इ.

‡ येथें किंवा 'सुबन्त प्रक्रियें'त न दिलेलें 'णमुल्' म्ह० वर्तमान० धातुसाधित रूप राजवाडयांनीं ज्ञानेश्वरीच्या ९ व्या अध्यायांत दिलें आहे ('परि तया फेना आंतु पातां'९.६७ ). क्रियापदाच्या वर्त० साधिताला अम् किंवा अनां प्रत्यय लागून मराठींत णमुल् होतें असें ते म्हणतात ( ज्ञा. ९ वा अध्याय, पृ. ४७ )

## कर्तरि परस्मैपद सेट्

करीत, मानीत, धरीत, घालीत, लिहीत, वगैरे सेट् क्रियापदांनीं वर्तमान कृदन्तें ' इत ' आगम होऊन होतात. आ, ई, एँ हे प्रत्यय पुं-स्त्री-नपुंसकलिंगीं अनुक्रमें लागतात; जसें; कुर्वत्-करिन्त-करीत. ईकार महाराष्ट्रींतून आला आहे.

## मणि वर्तमान कृदन्तें

होइजत, असिजत, ह्मणिजत, पाविजत, करिजत, इत्यादि.

## प्रयोजक वर्तमान कृदन्तें

हसवित, ह्मणवित, करवित, इ. इ. इ.

## भावे वर्तमान कृदन्तें

हसवत, ह्मणवत, करवत, इत्यादि.

हीं वर्तमान कृदन्तें वर्तमान मराठींत जशीचीं तशीं आहेत.

## ७३. भूत कृदन्तें

परोक्षानद्यतन भूताचीं कृदन्तें मराठींत नाहींत. कारण परोक्षानद्यतन भूत मराठींत नाहीं व महाराष्ट्रींत बहुतेक नाहीं च.

सामान्य भूतकालार्थक कृदन्तें संस्कृतांत क्त ( त ) व क्तवतु ( तवत् ) हे दोन निष्ठा-प्रत्यय धातूला लागून होतात. पैकीं क्तवतु प्रत्यय कर्तरि होतो आणि क्त प्रत्यय कर्मणि व भावे होतो. तो च प्रकार मराठींत होतो. इतकें च कीं मराठी, महाराष्ट्री व अपभ्रंश ह्यांत भूत-कृदन्तांना जे आदेश होतात, त्यांवर आपली इमारत रचते. कधीं महाराष्ट्रींतील रूपें जशीचीं तशीं च घेते व कधीं महाराष्ट्रींतील रूपांच्या शेवटला अ गाळते. परंतु सदा निष्ठाप्रत्ययांन किंवा त्यांच्या महाराष्ट्रींतील रूपांना ' ल ' हा स्वार्थी प्रत्यय जोडते. §

---

§ या स्वार्थी ' ल ' प्रत्ययाचें अधिक विवेचन राजवाडे यांनी अन्यत्र केलें आहे. ( पहा : विश्ववृत्त १९०७, अं. १ ) तेथें भ विष्यार्थी ल व भूतार्थी ल यांमधील भेद स्पष्ट करतांना ते म्हणतात :– " हा स्वार्थी ' ल ' प्रत्यय विशेषणाला लागला म्हणजे तो लिंगा प्रमाणें फिरतो; परंतु त्या त्या क्रियापदांच्या रूपांना लागला म्हणजे सहजच फिरत नाहीं. कारण विधिलिङाचीं रूपें कांहीं विशेषणें नाहींत. तेव्हां भविष्यकालीन ' ल ' प्रत्यय भूतकालीन स्वार्थी ' ल ' प्रत्ययाहून निराळा नाहीं. ( राजवाडे लेखसंग्रह, भा. २, पृ. २०८ ).

## अनिट्

### ( १ )

जेथें महाराष्ट्रींतील अंत्य कायम रहातो

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| तप्त | तत्त | तात + ल = तातल |
| खात | खत्त | खातल |
| गुफित | गुत्थ | गुथल |
| त्रुटित | तुट्ट | तुटल |
| पतित | पडु | पडल |
| कृष्ट | कड्ढ | काढल |
| खात | खण्ण | खाणल, खणल |
| सिक्त | सित्त | सीतल |

### ( २ )

जेथें महाराष्ट्रींतील अ चा लोप होतो

| | | |
|---|---|---|
| जात | जाअ | जाअल = जाइल = जाल ( जाअ + ल ) |
| आगत | आअअ | आल |
| कृत | किअ | केल ( किअ + ल = कयल = केल ) |
| नीत | णिअ | नेल ( णिअ + ल ) |
| मृत | मिअ | मेल ( मिअ + ल ) |
| स्नात | न्हाअ | न्हाल |
| स्थित | ट्ठिअ | ठेल |

### ( ३ )

जेथें संस्कृतांतील त रहातो

| | | |
|---|---|---|
| गृहीत | गेण्हिअ | घेतल |
| उपात्त | पात्त | पातल |
| आत्त | आत्त | आतल |
| हित | हिअ | हितल |
| जित | जिअ | जितल |
| भूत | होअ | भूतल ( ला-ली-लें ) |
| उदित | उदिअ | उदेल ( उदिअ + ल )§ |

§ हें उदाहरण ' त ' राहिल्याचें होऊं शकत नाहीं.

## भेद

( १ ) जेथें महाराष्ट्रींतील अंत्य अ विकल्पानें कायम रहातो.

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| कारापित | कराविअ | करवियल, करविल |
| विज्ञापित | विण्णविअ | विनवियल, विनविल |
| मानित | माणिअ | मानियल, मानिल |
| लिखित | लिहिअ | लिहियल, लिहिल |
| अर्पित | अप्पिअ | अर्पियल, अर्पिल |

करवियल इत्यादि रूपें ज्ञानेश्वरीच्या तीनशें वर्षें पूर्वींचीं आहेत.

( २ ) जेथें संस्कृतांतील अंत्य त विकल्पानें कायम रहातो

| | | |
|---|---|---|
| भणित | भणिअ | ह्मणितल, ह्मणियल ( काव्य ) |
| संख्यापित | संघविअ | सांघितल, सांघियल ( काव्य ) |
| हारित | हारिअ | हारितल, हारियल ( काव्य ) |
| ज्ञात | — | जाणितल, जाणियल |

ह्मणितल = ह्मणतल ∽ ह्मंटल असें रूप वर्तमान मराठींत झालें आहे. ( 'ह्मंतल' अशिष्ट )

( ३ ) जेथें महाराष्ट्रींतील अंत्य अ कायमचा गेला आहे

| | | |
|---|---|---|
| बंधित | बांधिय | बांधिल ( बांधियल ) |
| रक्षित | रक्खिअ | राखिल ( राखिअल ) |
| उत्तारित | उतारिअ | उतारिल |
| | उतरिअ | उतरिल |
| योजित | जोड्डिअ | जोडिल |
| विहित | विहिअ | विहिल |

( ४ ) कित्येक रूपें महाराष्ट्रींतील किंवा संस्कृतांतील रूपांना ल प्रत्यय लागून बनलीं आहेत. त्यांत तकार किंवा अकार दिसत नाहीं, त्यामुळें सकृद्दर्शनीं तीं विचित्र वाटतात इतकें च.

| संस्कृत | महाराष्ट्री–अपभ्रंश | मराठी |
|---|---|---|
| दाः– दत्त | दिन्न | दिन्नल, दिन्हल, दिधल, दिल ( वर्तमान ) |
| धाव्ः– धावित | धाविण्ण | धाविन्नल |
| भण्ः– भणित | भणिण्ण | ह्मणिन्नल |
| उड्डीः– उड्डीन | — | उडिन्नल, उडल (वर्त.) |

| संस्कृत | महाराष्ट्री–अपभ्रंश | मराठी |
|---|---|---|
| शॄः– शीर्ण | सिण्ण | सिनल |
| स्तॄः– स्तीर्ण | तण्ण | ताणल |
| मीः– मीन | — | मिनल |
| पच्ः– पक्व | पक्क, पिक्क | पिकल, पाकल (प्रयोजक), पिकेल (पिकविल = पिकइल) |
| भिद्ः– भिन्न | — | भिनल |
| फण्ः– फांट | — | फाँटल |
| अव्ः– ऊत | — | उतल |
| उत्पद्ः– उत्पन्न | उप्पण्ण | उपनल |
| नीः– नीत | — | नीणिल |
| युध्ः– युद्ध | — | जुझिन्नल |

( ५ ) कित्येक धातू ल प्रत्ययाच्या आधीं उच्चारसौकर्यार्थ आ लावतात.

| | | |
|---|---|---|
| भी | बिह् | बिहाल, भियाल, भ्याल |
| गिरी | गिगा, रिगा | निगाल, रिगाल |
| बुड् | — | बुडाल |
| भण् | — | ह्मणाल ( वर्तमान ) |
| जी | — | जीआल |
| पा | — | पिंआल |
| जॄ | — | जिराल |
| वी | — | विआल |

वी–वीत–वीअ पासून, पाहिलें तर, विअल, वियल असें रूप व्हावें. परंतु उच्चारदार्ढ्यार्थ अ ची वृद्धी करून विआल असें रूप बनलें आहे.

वरील रूपांवरून दिसून येईल कीं अनिट् धातूंच्या रूपांच्या ल प्रत्ययामागें इ नसते व सेट् धातूंच्या रूपांच्या ल प्रत्ययामागे इ असते. इकारयुक्त रूपें नियमानें सकर्मक धातूंचीं आहेत. तेव्हां असा नियम पडला कीं सकर्मक धातूंचीं निष्ठारूपें इकारयुक्त करावयाचीं व अकर्मक धातूंचीं निष्ठारूपें इकारविरहित करावयाचीं; जसें,

| अकर्मक | सकर्मक |
|---|---|
| बांधल | बांधिल |
| जोडल | जोडिल |

| अकर्मक | सकर्मक |
| --- | --- |
| विशेषल | विशेषिल |
| विकरल | केल |
| आकलल | आकलिल |

येथें त्रुटित–तुट्ट–तुटल प्रमाणें जोडु, विशेष, विकर, आकलल अशीं निष्ठारूपें अकर्मक धातूंचीं कल्पून व्यवहार केलेला आहे. त्यामुळें केवळ धातूला च 'ल' प्रत्यय जोडल्याचा भास होतो. हीं सर्व कृदन्तें कर्मणि व भावे होतात.

क्वचित् स्वराघातार्थ द्वित्त ल्ल ज्ञानेश्वरींत आढळतो; जसें, पाइल्ला.

हीं भूतकृदन्तें वर्तमान मराठींत कवितेंत जशींचीं तशीं आहेत. धाविन्नल वगैरे रूपें वर्तमान मराठींत बोलण्यांत व गद्यांत सध्या नाहींत.

## कर्मणि भूतकृदन्तें

कर्मणि जकारान्त रूप घेऊन व त्याला सेट् समजून इकार लावतात व नंतर ल ( तल = अल = ल ) प्रत्यय लावतात.

अनुभविज + इ + ल = अनुभविजेल ( ला–ली–लें )
दीज + इ + ल = दीजेल ( ला–ली–लें )
जुझ + इ + ल = जुझेल ( ला–ली–लें )

तुदादि वर्गांतील धातूंस कर्तरि व कर्मणि य आगम होतो, तेव्हां

युध्यते ( कर्तरि ) = जुज्झए = जुझल ( ला–ली–लें )
युध्यते ( कर्मणि ) = जुज्झए = जुझेल ( ला–ली–लें )

पिकल–पिकेल; उपजल–उपजेल; दिसल–दिसेल; लोपल–लोपेल; वगैरे कर्तरि व कर्मणि रूपें होतात.

वर्तमान मराठींत कवितेंत हीं रूपें क्वचित् आढळतात; बोलण्यांत नाहींत.

## प्रयोजक कृदन्तें

करवियल = करविल ( ला–ली–लें )
पांगुलवियल = पांगुलैल ( ला–ली–लें )
निरोपियल = निरोपिल ( ला–ली–लें )
आभारवियल = आभारैल ( ला–ली–लें )
शिक्ष्यापियल = शिक्षापिल ( ला–ली–ले )

### कर्मणि

करविजेल ( ला–ली–लें ); निरोपिजेल ( ला–ली–लें ) इ. इ. इ.

### भावे भूत कृदन्तें

करव–करवल ( ला–ली–लें ); हसव–हसवल ( ला–ली–लें )

### प्रयोजक भावे

करविव–करविवल ( ला–ली–लें );हसविव–हसविवल ( ला–ली–लें )

हीं सदा प्रथमपुरुषीं चालतात.

### प्रयोग

हीं कृदन्तें मराठींत कर्मणि व भावे योजतात; ह्मणजे प्रथमपुरुषाच्या एकवचनीं व अनेकवचनीं योजतात. कर्ता सदा तृतीयान्त असतो.

| | | |
|---|---|---|
| मियाँ; तुवाँ, तेणें, तिया<br>आह्मीं, तुह्मीं, तेहीं, तिहीं | = | काम केलें, कामें केलीं<br>स्त्री केली; स्त्रिया केलिया<br>खांबु केला, खांब केले |

वर्तमान मराठींत ह्या कृदन्त विशेषणांची सता तृतीया व सति सप्तमी किंवा सते चतुर्थी होते :—

### ७४. सता तृतीया, सति सप्तमी व सते चतुर्थी*

| एकवचन | अनेकवचन |
|---|---|
| त्यानें काम केलेन | त्यानीं काम केलेनीं |
| त्यानें कामें केलींन | त्यानीं कामें केलींनीं |
| त्यानें स्त्री केलीन | त्यानीं स्त्री केलीनीं |
| त्यानें स्त्रिया केल्यान | त्यानीं स्त्रिया केल्यानीं |
| त्यानें खांब केलान | त्यानीं खांब केलानीं |
| त्यानें खांब केलेन | त्यानीं खांब केलेनीं |

### सति सप्तमी*

( ज्ञानेश्वरी मराठी ) कामें, काम केलेयां, केलियां = कामें, काम केल्यां ( वर्तमान मराठी ).

* यांचीं ज्ञानेश्वरींतील उदाहरणें :–( सता तृतीया ) सेंदे द्रुति राहे कापुरें। वेचलेनि हि ॥ ( १८·४२० ); ( सति सप्तमी ) जैसें प्रगटलेयां नभस्ती । अशेषही मार्ग दीसति । ( २·२६१ ). मोडकशास्त्र्यांच्या मतें स्वयंवर्ती ( Absolute ) सप्तमी ज्ञानेश्वरींत नाहीं; मराठींतील स्वयंवर्ती तृतीयेचा संस्कृतांतील सप्तमीशीं घोटाळा होऊन ती आली. श्री. नेने मात्र राजवाड्यांच्या प्रमाणें या दोन्ही स्वयंवर्ती विभक्ती मानतात. त्यासाठीं त्यांनीं प्राकृत–अपभ्रंशांतून सति सप्तमीचीं उदाहरणेंही दिलीं आहेत (भा इ सं मं. त्रै. १५·१; १६·१). युरोपीय वैयाकरणांपैकी कोणीही अशा प्रकारच्या रचनेचा विचार केलेला नाहीं. तो प्रथम राजवाड्यांनीं केला. पण त्यांचें वरील सर्वच विवेचन संस्कृतमूल आहे.

## सतें चतुर्थी

कामें, काम केलेया, केलिया = कामें, काम केल्या, केल्यास ( व. म. )

हीं कृदन्तें कर्मणि असल्यामुळें कर्म पुं-स्त्री-नपुंसक असेल त्याप्रमाणें एकवचनी व अनेकवचनी आ-ए, ई-इया, एँ-ईं, हे प्रत्यय लागतात.

केला-केले; केली-केलिया; केलें-केलीं.

प्राकृतांत प्रयोजक कर्मणि कृदन्ताचीं दोन रूपें होतात, त्यावरून मराठींत हि दोन होतात.

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| कारित | कारिअ, कराविअ | करिवल ( कारिअल ), |
| | | करविल ( करवियल ) |
| हासित | हासिअ, हसाविअ | हसिवल ( हासिअल ), |
| | | हसविल ( हसवियल ) |
| शोषित | सोसिअ, सोसविअ | शोषिवल, शोषविल |
| तोषित | तोसिअ, तोसविअ | तोषिवल, तोषविल |

## ७'१. कर्त्तरि क्तवतु

क्तवतु प्रत्यय कर्त्तरि होतो.

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| कृतवान् | किअवां | किअ + ल + आँ = किअलाँ |
| | | = केलाँ† |

### पुल्लिंग

१. अहं स्नानं कृतवान् अस्मि = मीं स्नान केलाँ
२. वयं स्नानं कृतवन्तः स्मः = आम्हीं स्नान केलों
३. त्वं स्नानं कृतवान् असि = तूं स्नान केलाँसि, केलासि
४. यूयं स्नानं कृतवन्तः स्थ = तुम्हीं स्नान केलाँ, केला
५. स स्नानं कृतवान् अस्ति = तो स्नान केला
६. ते स्नानं कृतवन्तः सन्ति = ते स्नान केले

---

† उदा., 'मी बोलिलाँ' ( ज्ञा. २·५२ ). उत्तरकालीन प्रतींतून हेंच रूप 'बोलिलों' असें आढळतें.

अकारान्त पुल्लिंगी शब्दाप्रमाणें च ओंकारान्त पुल्लिंगी शब्दाचें प्रथमेचें अनेकवचन एकारान्त होतें : केलों–केले.

मीं स्नान केलों, हा प्रयोग सध्यां अशिष्ट लोकांत ऐकूं येतो; शिष्ट लोकांत नाहीं.

### स्त्रीलिंगी

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| कृतवती | किअवइ | किअ + ल + अइ = केल-<br>अइ = केल + ई + अइ<br>= केलीए = केल्ये |

१. अहं स्नानं कृतवती अस्मि = मीं स्नान केलीए
२. वयं स्नानं कृतवत्यः स्मः = आह्मीं स्नान केलों
३. त्वं स्नानं कृतवती असि = तूं स्नान केलीएसि
४. यूयं स्नानं कृतवत्यः स्थ = तुह्मीं स्नान केल्या, केलिया
५. सा स्नानं कृतवती अस्ति = ती स्नान केली
६. ताः स्नानं कृतवत्यः सन्ति = त्या स्नान केलिया

मराठींत स्वार्थे ल प्रत्यय लागून क्त व क्तवतु ह्यांचीं रूपें महाराष्ट्रीद्वारा कशीं उत्पन्न होतात, हें बीम्स व होर्न्ले यांना बिलकुल समजलें नाहीं.

वर्तमान मराठींत 'मी स्नान केलों' हा प्रयोग नाहीं व केलासि बद्दल केलास होतें.

### ७६. भविष्य कृदन्तें : कर्तरि

( १ ) होष्यमाण हें एक च भविष्य कृदन्त महाराष्ट्रींतून मराठींत आलें आहे.

( २ ) कर्तृ, भोक्तृ, यातृ वगैरे शब्दांतील तृ प्रत्ययाच्या ऐवजीं णृ–णार प्रत्यय लागून एक भविष्य कृदन्त मराठींत होतें. भर्तृ ह्या शब्दाचें अपभ्रंशद्वारा भत्तार, भातार, भर्तार, असें रूप मराठींत होतें. त त्या ऐवजीं ण करून भरणार असें रूप मराठींत होतें. हीं णार प्रत्ययान्त रूपें विशेषणें असतात तेव्हां त्यांना पुं–स्त्री–नपुंसकलिंगीं आ, ई, एँ हे प्रत्यय अनुक्रमें लागतात. जेव्हां विशेषणें नसतात, तेव्हां अनद्यतनभविष्यति लुट् प्रमाणें ह्याचा प्रयोग होतो. संस्कृतांत लुट् मध्यें तृ चें प्रथमेचें एकवचन प्रथमपुरुषाच्या अनेकवचनाव्यतिरिक्त सर्व लिंगीं, सर्व पुरुषीं व सर्व वचनीं योजतात. त्याप्रमाणें च मराठींत तर 'णार' सर्वत्र योजतात; जसें,

### लुट्

| संस्कृत | मराठी |
|---|---|
| १. कर्ता अस्मि | करणार |
| २. कर्ता स्मः | करणार |

| संस्कृत | मराठी |
|---|---|
| ३. कर्ता असि | करणार |
| ४. कर्ता स्थ | करणार |
| ५. कर्ता | करणार |
| ६. कर्तारः | करणार |

वाटल तर मराठींत 'आह' ह्या क्रियापदाचीं वर्तमान काळाचीं रूपें जोडतात. परंतु न जोडलीं असतां चालतें. ह्मणजे लुट्चे सर्व गुण ह्या 'णार' मध्यें आहेत. तेव्हां तें संस्कृत लुट्चें वंशज आहे ह्यांत संशय नाहीं.

तृ चा अपभ्रंश ता होऊन 'पुरविता' असें हि रूप होतें व त्याला हि लुट् चे सर्व गुण असलेले दिसतात. तेव्हां, ता आणि णार अशीं दोन रूपें मराठींत अनद्यतनभूते लुट् चीं विद्यमान आहेत. पैकीं णार हें रूप ज्ञानेश्वराच्या अभंगांत येतें. ह्या णार प्रत्यय मराठीनें कोठून आणिला किंवा नवा स्वयंस्फूर्तीनें बनविला, तें सांगतां येत नाहीं. बहुशः हा ज्ञानेश्वरीहून हि जुना आहे. ह्या लुट् चा पत्ता बीम्स व होर्न्ले यांना लागलेला नाहीं. हा भविष्य वर्तमानमराठींत फार योजतात.

## ७७. भविष्य कृदन्तें : कर्मणि व भावे

संस्कृतांत तव्यत् ( तव्य ), अनीयर् ( अनीय ), यत् ( य ), क्यप् ( य ), ण्यत् ( य ), आणि केलिमर ( एलिम ), असे प्रत्यय ह्या कर्मणि व भावेकृदन्ताचे आहेत. क्वचित् कर्तरि प्रयोग होतात.

### ( सं. ) तव्य = ( महा० ) अव्व = ( म० ) आव

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| कर्तव्य | करिअव्व | कराव |
| हसितव्य | हसिअव्व | हसाव |
| भवितव्य | होइअव्व | होआव |

अपभ्रंशांत इएव्वउँ, एव्वउँ, एवा असे प्रत्यय असून, त्यांचें अनुकरण मराठी करीत नाहीं; महाराष्ट्रीचें अनुकरण करते.

विशेषणें असल्यामुळें ह्यांना पुं–स्त्री–नपुंसकीं आ, ई, एँ हे प्रत्यय अनुक्रमें लागतात

कर्मणि

त्यानें काम करावें
त्यांनीं काम करावें
त्यानें कामें करावीं

त्यानीं खांब तासावा
त्यानीं खांब तासावे
त्यानें भुई उकरावी
त्यानीं भुया उकराविया–व्या

भावे

| | |
|---|---|
| त्यानें<br>तिनें<br>हिण<br>त्यानीं | जगावें, मरावें, रहावें, हसावें इ. इ.<br>बसावें, रडावें, पडावें, लवंडावें.<br>देयावें, घेआवें, सुआवें, गावें, यावें, जावें. |

कर्तरि

तो दूध प्यावा, असें मी इच्छितों
ती लुगडें नेसावी, असें तो म्हणतो इ. इ. इ.

ह्या कृदन्ताचा नामाप्रमाणें उपयोग होतोः–करावें लागे, सांगावें फावे, करावें होय, नाही. हें भविष्य कृदन्त वर्तमानमराठींत फार योजतात.

( संस्कृत ) अनीय = ( मराठी ) अणिय = णें

| | |
|---|---|
| दर्शनीय | दसणिय, देखण ( णा–णी–णें ) |
| कर्शनीय | कसणिय |
| शिक्षणीय | सिक्खणिय |

दसणिया, कसणिया, सिक्खणिया, वगैरे संबोधनात्मक प्रयोग नामदेव, तुकाराम, ज्ञानेश्वर यांच्या अभंगांत येतात.

करणीय = करणें; वल्हणीय = बोलणें; मरणीय = मरणें वगैरे रूपें ह्या प्रत्ययाचीं मराठींत आहेत. इदं कर्म मे करणीयमस्ति = हें काम मला करणें आहे. हा ल्युट् ( अन ) प्रत्यया-सारखा च भासतो, परंतु त्याहून भिन्न आहे. हा सकर्मक असल्यास कर्म घेतो; ल्युट् घेत नाहीं.

हें कृदन्त वर्तमान मराठींत फार योजतात.

य = ज

'य'पासून निघालेलीं जकारान्त कृदन्तें सध्या मराठींत नामें झालीं आहेत व कृदन्तत्वाची त्यांची ओळख बुझाली आहे.

| संस्कृत | प्राकृत | मराठी |
|---|---|---|
| पेय | पेज्ज | पेज ( स्त्री. ) |
| शय्य | सेज्ज | सेज ( स्त्री. ) |

| संस्कृत | प्राकृत | मराठी |
|---|---|---|
| खाद्य | खाज्ज | खाजें |
| गाद्य | माज्ज | माज |
| कार्य | कज्ज | काज ( ज्ञानेश्वरींत प्रश्नार्थक ) |
| बाह्य | बोज्झ | बोझें |
| मेय | मेज्ज | मेज ( मोजण्याचें ) |
| आर्य | अज्ज | अजा |
| वाद्ययंत्र | वज्जयंत्र | वाजंत्रें |
| वंध्य | वोज्झ | वांझ |
| गुह्य | गुज्झ | गुज |
| भोज्य | भोज्ज | भोजें |

## ७८. अव्ययी कृदन्तें : भूतार्थी

अव्ययी कृदन्तें भूतार्थी किंवा भविष्यार्थी असतात.

### भूतार्थी

क्त्वा ( त्वा ), ल्यप् ( य ) व णमुल् ( अम् ) हे प्रत्यय लागून संस्कृतांत भूतार्थी अव्ययी कृदन्तें होतात.

**( सं. ) त्वा = ( महा. ) ऊण = ( म. ) ऊन, ऊनि, उनि**

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| जी :–जित्वा | जेऊण | जिणून |
| भू :–भूत्वा | होऊण, होअऊण | होऊन |
| हस् :–हसित्वा | हसिऊण | हसून |
| दृश् :–दृष्ट्वा | दट्ठूण | दाटून |
| पा :–पीत्वा | पीऊण | पिऊन |
| दर्शय् :–दर्शयित्वा | दाऊण | दावून |
| गृह् :–गृहीत्वा | घेत्तूण | घेऊन |

अपभ्रंशांत करेवि, पलिवि वगैरे इकारान्त अव्ययें होतात, त्यांच्या धर्तीवर ऊन प्रत्ययान्त अव्ययाला ज्ञानेश्वरींत इकार हमेशा लागतो :–जिणूनि, हसूनि, इ. इ. केवळ अकारान्त ऊन प्रत्ययान्त अव्यय ज्ञानेश्वरींत नाहीं.

अपभ्रंशांत प्पिणु, पिणु, विणु असे उकारान्त प्रत्यय ह्या अव्ययाचे आहेत. त्यांच्या धर्तीवर ज्ञानेश्वरींत हि वारंवार ह्या अव्ययाला उकार पादपूरक लागतो :–करुनु, घेउनु, बसुनु, इ. इ.

केवळ य प्रत्यय लागून ज्ञानेश्वरींत भूतार्थी अव्ययी कृदन्तें होत नाहींत. मागधींत होतात. त्यांपैकीं कित्येकांत इया हा प्रत्यय लागतो; जसें, पेहिया, सँपेहिया, समुपेहिया, अणुपालिया. संप्रेक्ष्य = सँपेहिय = सँपेहिया.

क्ष्य = क्षिय. य = इय. इय+आ = इया. अशा परंपरेनें हा 'या' प्रत्ययोत्पन्न इया प्रत्यय झाला आहे. त्याचा उपयोग ज्ञानेश्वरींत ऊन प्रत्ययाला पादपूरक म्हणून होतो. हें इया पादपूरक अंतीं अनुनासिक घेऊन इयाँ असें रूप नियमानें धारण करतें.

घेऊन + इयाँ = घेऊनियाँ

म्हणून + इयाँ = म्हणूनियाँ

सारांश, त्वा प्रत्ययापासून झालेला ऊन व य प्रत्ययापासून झालेला इया असे दोन्ही प्रत्यय ज्ञानेश्वरी मराठींत एकामागून एक एकदम लागतात व दोन्ही चालींचा बोज एकदम राखतात.

एका 'कर' धातूच्या भूतार्थी अव्ययी कृदन्तांचीं रूपें इतकीं होतात :—

करून, करुन, करूनि, करुनि, करुनु, करुनु, करूनियाँ, करुनियाँ, करूनी, करुनी; पैकीं करून, करुन हीं रूपें ज्ञानेश्वरींत नाहींत; वर्तमान मराठींत आहेत. इ ज्ञानेश्वरानंतर सुटली.

प्रयोजक साधित धातूंचीं रूपें, म्हणौनि, म्हणवून; करौनि, करवून; हसौनि, हसवून; जागौनि, विकासौनि अशीं होतात व त्यांच्या शेवटीं इ, उ व इयाँ हीं पादपूरकें लागतात.

नोहुनि, नेंदुनि, वगैरे अकरणरूपें होतात.

धातूच्या मागें उपसर्ग असतां य प्रत्यय भूतार्थी अव्ययी कृदन्त होण्यास संस्कृतांत जरूर असतो. त्याचा मागमूस मराठींत कांहीं शब्दांत राहिला आहे.

झटकृत्य = झडकरिअ = झडकरि = झडकर ( वर्तमान मराठी )

झाकृत्य = झाकरिअ = झाकरि = झांकर ( ,, ,, )

धोकृत्य = धोकरिअ = धोकरि = धोकर ( ,, ,, )

## क्त्वा = त्ता = ताँ§

अर्धमागधींत क्ता चा अपभ्रंश त्ता होऊन हें कृदन्त होतें; जसें,

वंदित्वा = वंदित्ता

गंत्वा = गंत्ता

नीत्वा = नेत्ता

§ राजवाड्यांच्या मतें हीं भूत० कृदन्तें त्यांनीं अन्यत्र ( ज्ञा. अध्याय १, पृ. ४७ ) दिलेल्या वर्त० वाचक 'णमुल्' रूपांहून भिन्न आहेत. पण या दोहींच्या अंतीं 'ताँ' येत असल्यानें तीं बाह्यतः सारखीं दिसतात. ( मागें ६० व्या परिच्छेदांतील तळटीप पहा. )

ज्ञानेश्वरींत धातूच्या पुढें तां प्रत्यय लागून भूतार्थी अव्ययी कृदन्त होतें; जसें,

वंदित्वा = वंदितां
यात्वा = जातां
नीत्वा = नेतां
कृत्वा = करितां
युद्ध्वा = जुझतां

उदाहरण,

" कां कामना हि न करितां । अवसांत घडे पांडुसुता ।
परि वायकांड न जुझतां । लागे जैसें ।। १०३ ।।
गुळ नेणतां तोंडीं । घातला दे चि गोडी ।। १०४ ।।
( अध्याय १८ वा )

हें रूप वर्तमान मराठींत फार येतें.

**क्त्वा = त्ताणं = तानां**

अर्धमागधींत क्त्वा चा त्ताणं अपभ्रंश होतो.

भूत्वा = भवित्ताणं
कृत्वा = करेत्ताणं

त्या च धर्तीवर मराठींत क्त्वा, त्ताणं, तानां अशा परंपरेनें आलेला तानां प्रत्यय धातूंना लागून भूतार्थी अव्ययी कृदन्तें होतात.

भूत्वा = होतानां
यात्वा = जातानां
नीत्वा = नेतानां इ. इ.

हें रूप वर्तमान मराठींत अति येतें.

## ७९. भविष्य अव्ययी कृदन्त

### तुम् = उम् = उँ, ऊँ

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| जेतुं | जिणिउं | जिणूँ |
| गृहीतुं | घेत्तुं | घेउँ |
| रमितुं | रमिउं | रमूँ |
| मर्तुं | मरिउँ | मरूँ |
| ज्ञापयितुं | जाणावेउं | जाणवूँ |

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| निर्मापयितुं | णिम्मावेउं | निर्मवूँ |
| निर्मातुं | णिम्माउं | निँमूँ |
| कर्तुं | काअउं | करूँ |

जिणौँ, येओँ, रमौँ, जाणवौँ, करौँ अशीं हि रूपें सांपडतात.

करुँ, मरुँ, अशीं र्‍हस्व रूपें हि होतात. हें कृदन्त वर्तमान मराठींत अति येतें.

## ८०. संयुक्त क्रियापदें

व्ययी कृदन्ताच्या पुढें अस् व भू वगैरे धातूंच्या रूपांची जोड देऊन संयुक्त क्रियापदें होतात. तेव्हां प्रथम अस् व भू ह्या धातूंचे लकार देतों.

### अस्

लट् :– १ असें, २ असूँ, असौं, ३ अससि, ४ असा–सौं, ५ असे, अथि, ६ असंति, असति, आथि.

विधिलिङ् :– असिजे, असज्जा.

लोट् :– १ असौं–सूँ, २ असौं, ३ अस, ४ असा–सौं, ५ असो, ६ असतु.

लङ् :– १ असें, २ असौं, ३ असस, ४ असा–सौं, ५ असे, ६ असत.

लुट् :– असता, असणार.

लृट् :– १ असैन, २ असूँ, ३ असतील, ४ असाल, ५ असैल ६ असतील.

कर्मणि :– असिजे, असिजो, असिजैल, असिजत, असिजेलें.

प्रयोजक :– असविणें.

व्ययी कृदन्त :– असत ( ता–ती–तें ), सांत ( सांता–ती–तें ), आथिल ( ला–ली–लें ) असल ( ला–ली–लें ), (लौं–ल्यें–लैं), असाव ( वा–वी–वें )

अव्ययी कृदन्त :– असूनि, असतां, असूनियां, असूँ.

भावे, शक्यार्थक :– असवें.

### नस्

वरच्या प्रमाणें

आह्§ ( अस् चें इकारान्त रूप )

---

§ याशिवाय सं. आभा या धातूपासून झालेलें ' आहा ' हें भिन्न क्रियापद राजवाडे मानतात. ( ' भूताभासु आहे '–सं. भूताभासः आभाति. ज्ञानेश्वरी ९ वा अध्याय, ओ. ७८ टीका ).

लट् :– १ आहें, २ आहों, ३ आहासि, आहेसि, ४ आहा–हां, ५ आहे, ६ आहाति.
इतर लकार नाहींत.

१ नास्मि = नाहिँ–हीँ

५ नास्ति = नाथि = नाहिँ–हीँ

६ नसन्ति = नाथि = नाहिँ–हीँ

ज्ञानेश्वरींत 'नाहीं' ह्या शब्दाचा क्रियाविशेषणाप्रमाणें हि उपयोग होतो.

'नाहींत' हा शब्द ज्ञानेश्वरींत नाहीं, आधुनिक आहे. "दोन्ही नाहीं" असा अनेकवचनी प्रयोग अध्याय २ ओवी १०४ येथें आला आहे. हा क्रियाविशेषण नाहिँ–हीँ 'नापि'–पासून निघालेला आहे.

## भू†

लट् :–१ होईँ–ईं, होएँ, येँ. २ होऊँ–वोँ. ३ होसि. ४ होआ–वा, व्हा. ५ होइ–ई, होए–ये. ६ होँति ( व्हाँति )

विधिलिङ् :–होज्जा, होइजे.

लोट् :–१ होँ, होऊँ–वोँ. २ होऊँ–वोँ. ३ हो, होँई. ४ होआँ–वाँ, व्हाँ. ५ हो, होवो. ६ होँतु.

लङ् :–१ होईँ–ईं, होएँ–येँ. २ होऊँ–वोँ. ३ होस. ४ होआ–वा, व्हा. ५ होइ–ई, होए–ये. ६ होँत.

लुङ् :–( होत्या ) होता ( ता–ती–तें )

लुट् :–होता, होणार.

लृट् :–१ होईन. २ होऊँ. ३ होँसील. ४ होआल. ५ होईल. ६ होँतील

कर्मणि :–होइजे, होइजो, होइजैल, होइजत, होइजेलेँ

प्रयोजक :–होविणेँ

व्ययी कृदन्त :–होँत ( ता–ती–तें ), भूतल ( ला–ली–लेँ ), होआव, व्हाव, इव ( लाँ–ल्येँ–लेँ ), ( वा–वी–वेँ )

अव्ययी कृदन्त :–होउनि, होनि–नु–नियाँ; होऊँ–होँ; होताँ.

भावे :–होववे.

## नभू

लट् :–१ नोहेँ, नव्हें. २ नहाँ, नोहोँ, नव्हाँ, न्हवोँ. ३ नव्हसि, न्हवसि, नोहोँसि

---

† हें सहाय क्रियापद कचित् तसें न राहतां तत्पूर्वशब्दाशीं जोड होऊन अखंड क्रियापद होतें असें राजवाडे म्हणतात; उदा., अखंडहो < सं. अखंडीभू ( ज्ञानेश्वरी ९.२२५, टीका )

४ नोहों, नव्हों. ५ नोहे, नव्हे, नव्हे, नव्है. ६ नोहोंति, नव्हेति, नव्हति, नव्हाति, नव्हैति.

लोट् :-१ नोहों. २ नोहों. ३ नोहों. ४ नोहो, नव्हों. ५ नोहो, नहो. ६ नोहोंतु, नव्हैतु, नवतु, इ. इ.

कर्मणि :-न्हविजे, न्हविजत, इ. इ.

व्ययी कृदन्त :-नहोंत-नव्हत ( ता-ती-तें ), न होआव-नव्हाव ( वा-वी-वें )

अव्ययी कृदन्त :-नोहोनि, नव्हतां, नोहोनियां, नोहूं.

## ८१. वर्तमान कृदन्ताचीं संयुक्त रूपें

### कर्तरि अस्

#### पुल्लिंगी अकारान्त

| एकवचन | अनेकवचन |
|---|---|
| १. मीं करितु आहें | आह्मीं करित आहों |
| २. तूं करितु आहेसि | तुह्मीं करित आहा |
| ३. तो करितु आहे | ते करित आहाति-आथि, करिताति (करितात) |

कंसांतील रूपें वर्तमान मराठींतील आहेत.

| | |
|---|---|
| १. करितु असें, करितुसें | करितसों, करित असों |
| २. करितु अससि, करितुसि | करितसा, करित असा |
| ३. करितु असे, करितुसे | करित असति-आथि, करिताति |

#### पुल्लिंगी आकारान्त

| | |
|---|---|
| १. करिता असें, आहें | करिते असों, आहों |
| २. करिता असि, आहेसि | करिते आहा, असा |
| ३. करिता असे, आहे | करिते आथि, करितेति ( करित्याति, वर्तमान अशिष्ट ) |

#### स्त्रीलिंगी ईकारान्त

| | |
|---|---|
| १. करिती आहें, असें | करितिया आहों, असों |
| २. करिती आहेसि, अससि | करितिया आहा-असा ( करिता ) |
| ३. करिती आहे, असे | करितिया आथि ( करित्याति, करिताति, करतात ) |

#### नपुंसक एँकारान्त

| | |
|---|---|
| १. करितें आहें, असें ( करितें ) | करितीं आहों, असों ( करितों ) |
| २. करितें आहेसि, अससि (करितेंस) | करितीं आहां, असा ( करिता ) |
| ३. करितें आहे, असे ( करितसे ) | करितीं आथि, करिताति ( करतात ) |

**कर्मणि**

| | |
|---|---|
| ३. करिजत आहे, असे, करिजतसे | करिजत आथि, करिजताति |

**प्रयोजक**

| | |
|---|---|
| ३. करावा आहे, असे | करावे आथि, करावेति, बोळगावेति इ. इ. |
| करावी आहे | कराविया आथि |
| करावें आहे | करावीं आथि |

**प्रयोजक कर्मणि**

३. करविजत आहे – असे, करविजतसे, करविजताहे.

३. करविजत आहाति – आथि, करविजताति.

**भावे**

३. करवत आहे–असे, करवतसे, करवताहे

३. करवत आथि, करवताति

अस् चीं भूतकाळीन व भविष्यकाळीन रूपें वर्तमान कृदन्तांना वर प्रमाणें लागतातः– करीत, करिता, करिती, करितें असे, असेल, इ. इ.

वर्तमान मराठींत तो, ती, तें करीत आहे, असें नुसतें ' करीत ' रूप येतें.

ज्ञानेश्वरींत अकारान्त पुल्लिंगी वर्तमान कृदन्ताचीं अशीं हि रूपें येतात–

| एकवचन | अनेकवचन |
|---|---|
| १. मी करितु | आम्ही करित |
| २. तूं करितु | तुम्ही करित |
| ३. तो करितु | ते करित |

अपभ्रंशांत वट्ट हा धातु लट् मध्यें असा चालतो :–

| | |
|---|---|
| १. वट्टउँ | वट्टहुँ |
| २. वट्टसि | वट्टह |

म्हणजे उत्तमपुरुषाचे उँ व हुँ प्रत्यय व मध्यमपुरुषाचे सि व ह प्रत्यय अपभ्रंशांत आहेत. ते घेऊन वर्तमान मराठी येणेंप्रमाणें रूपें करते :–

**पुल्लिंग**

१. करितु + उँ = करितों

२. करितु + हुँ = करितों

३. करितु + सि = करितोसि–स

४. करित + ह = करिता

५. करितु = करितो

६. करित + आथि = करिताथि = करिताति = करितात.

### स्त्रीलिंग

१. करिती + ँ = करितीएँ = करित्येँ = करितेँ
२. करितिया + हुँ = करितियाँ = करित्याँ = करिताँ
३. करिती + सि = करितीस
४. करितिया + ह = करित्या = करिता
५. करिती = करितीए = करित्ये = करिते
६. करितिया + आथि = करितियाथि = करित्याथि = करित्यात = करितात.

### नपुंसक

१. करितेँ
२. करितीँ + हुँ = करित्युँ = करिताँ
३. करितेँ + सि = करितेँस
४. करितीँ + ह = करिता
५. करितेँ
६. करितीँ, करतात.

लट् च्या ऐवजीं हा संयुक्त प्रकार वर्तमान मराठींत प्रचलित आहे.

### भू कर्तरि

### वर्तमान-भूत-भविष्य

१. मी करितु, करिता, करिती, करितेँ होईँ-एँ, होईन, इ. इ. इ. अस् प्रमाणें.

### भूत

१ { मी करीत होँताँ
मी करिती होँतीएँ
मी करित होँतेँ }

३ { राजा होँता
राणी होँती
माकड होँतेँ }

'होता' (लुङ्)§ भूतकाळाचें प्रथमपुरुषाचें एकवचन आहे. राजा होता, राणी होती, ह्या वाक्यांत होता, होती, हे भूतकाळ आहेत; वर्तमानकाळ नाहीं. होँता-ती-तेँ हीं वर्तमान कृदन्तें हि आहेत. परंतु त्यांपासून वरील वाक्यांतील होता, होती, हीं भिन्न आहेत. मूळ ( लुङ् )

§ मराठींत लुङ् नाहीं हें पूर्वीं सांगितलेच आहे. पण ' होता ' हें त्याचें एकमेव अवशिष्ट रूप राजवाडे मानतात.

होता = अभूत्. अनुकरणानें वर्तमान कृदन्ताप्रमाणें लिंगप्रत्यय मराठीनें ह्या लुङ्च्या रूपाला लावले.

## ८२. भूत व्ययी कृदन्ताचीं संयुक्त रूपें

### कर्मणि

१. त्यानें केलें, केला, केली
२. त्यानें केलें आहे, केला आहे, केली आहे
३. त्यानें केलें असे, केला असे, केली असे
४. त्यानें केलें होतें, केला होता, केली होती

### भावे

१. मला जालें, जालें आहे, जालें असे, जालें होतें, इ. इ. लङ्च्या-बरोबरीनें वर्तमान मराठींत हीं रूपें प्रचलित आहेत. अथवा, खरें पहातां, लङ् पेक्षा ह्यांचा च प्रयोग वर्तमान मराठींत फार होतो.

### कर्तरि

६१ ह्या कलमांत भूत व्ययी कर्तरि कृदन्ताची व्युत्पत्ति दिली आहे. येथें प्रकार देतों:-

( १ )

१. मीं केलाँ + उँ = केलोँ
२. आह्मीं केलाँ + हुँ = केलोँ
३. तूँ केलाँ + सि = केलाँसि
४. तुह्मी केलाँ + ह = केलाँ
५. तो केला = केला
६. ते केले आथि = केलेति, आणिलेति

( २ )

मी केलाँ आहे, आह्मी केले आहोँ, तुह्मीं केले आह्म

( ३ )

मी केलाँ असे

( ४ )

मी केलाँ होँतोँ, इ. इ. इ.
वर्तमान मराठींत (३) केलास, (६) केलेत, अशीं रूपें होतात.

### संयुक्त कृदन्त विशेषणें

| पुल्लिंग | स्त्रीलिंग | नपुंसकलिंग |
|---|---|---|
| होँत साँता | होँत साँती | होँत साँतेँ |
| जाला साँता | जाली साँतीं | जालेँ साँतेँ |

वर्तमान मराठींत ' होत्साता ' एवढें एक च संयुक्त कृदन्त विशेषण राहिलें आहे.

८३. इतर सहायधातू

( १ ) जाल †

( जन् ) जात = जाअ+ल = जाअल, जाइल, जाल ( ला–ली–लें ). हें रूप वर्तमान कृदन्तांना लागतें :—

तो बोलता जाला.
ती बोलती जाली.
तें बोलतें जालें.

( २ ) या = जा

जा ह्या धातूचीं रूपें वर्तमान, भूत व भविष्य कृदन्तांना लागतात :—

तो होँतु जाए
तो धरिला जाई
तो धरूँ जाई
तो धरूनि जाई

( ३ ) ई = ए

ए धातूचीं रूपें भविष्य कृदन्तांना लागतात :—

घेऊनि ये
घेऊँ ये
घेवों नेए

( ४ )

बैस, दे, घे, राह, आवड, पाह, सर, लाग, सक, शक, लाभ, लाह, लहा, टाक, ठाक, घाल, ह्मण वगैरे धातूंचीं रूपें भविष्य कृदन्तांना अकरण व सकरण लागतात :—

होँ दे, होऊँ देईं, उरोँ नेँ दी; करूनि घे; होउनि राहिला; करूँ आवडे; शोचूँ पाहसि; होँ पाँतले; सांडूँ पाँती; उतरोँ सरला; देवोँ लागेँ; करूँ सके; देवोँ शकसि; कोपोँ लाभे; पव्हों न लहौंति; करूनि टाकिजे; करूँ ह्मणे इ. इ. इ.

पाह हें रूप महाराष्ट्रींतून पांच धातूंपासून निष्पन्न होतें :—

( दृश् ) पश् = पह. ( प्रयोजक ) पाह; त्याचें कर्मणि ' पाहिजे '.

प्रकाश् = पआह = पाह
प्रार्थ् = पाह ( अपभ्रंश ) = पा

† हा धातू नसून भूत. धातुसाधित विशेषण आहे.

प्राप् = पाव, ( कर्मणि ) पाविजे = पाइजे = पाहिजे.
प्राई = पाह

पश् धातूत्पन्न कर्मणि 'पाहिजे' देखिजे ह्या अर्थी योजतात. पश् = पह = पाह ( प्रयोजक ). तस्य रूपं अधुना पश्यसि = तेयानें रूप आतां पाहे ( ज्ञा. १८.३९९ ).

प्रकाश् धातूत्पन्न पाह धातु येणेंप्रमाणें योजतात :--

सूर्यो पाहे = सूर्य प्रकाशे
दिवो पाहे = दिवस प्रकाशे
सूर्यें पाहिजे = सूर्येण प्रकाश्यते.

प्रार्थ् धातूत्पन्न पा येणेंप्रमाणें योजतात :--

देऊं पाए = देण्यास प्रार्थितो, इच्छितो.
हों पातसे = होण्यास इच्छितो.
मिया तें पाहिजे = मया तत्प्रार्थ्यते.

प्राप् धातूत्पन्न पाहिजे येणेंप्रमाणें योजतात :—

मला तें पाहिजे = तन्मे प्राप्यते

प्राई धातूत्पन्न पाह येणेंप्रमाणें योजतात :--

त्वं कर्तुं अर्हसि = तूं करूं पाहसि
त्वया कृतं अर्ह्यते = तुवां केलें पाहिजे.

हे पांची प्रकार ज्ञानेश्वरींत आढळतात.

### ( ५ ) गम्

वर्तमान मराठींत ह्या धातूचीं भूतार्थी कृदन्तें वर्तमान, भूत व भविष्य कृदन्तांना लागतात.
( १ ) मी येऊन गेलों. ( २ ) मी येत गेलों. ( ३ ) मी मारिला गेलों.
आहे, असे, असेन, ह्यांचे आणीक जोड दिले तरी खपतात.
हे सर्व सहाय्य धातू वर्तमान मराठींत प्रचलित आहेत.

## ८४. कांहीं धातूंचीं एकटींदुकटीं रूपें

व्हल् ( चलने ) ह्या धातूचें कर्मणि 'भले' हें एक च रूप ज्ञानेश्वरींत सांपडतें व तें तें, तो, ती, तैसा, तैसें, तैसी ह्या सर्वनामाच्या रूपांशीं जोडलेलें आढळतें :—

भले तें, भले तैसा, इ. इ.

आवड् धातू भल्प्रमाणें च वागतो.

## ८५. अकरणरूप

धातूंच्या मागें न किंवा पुढें ना किंवा मागेंपुढें नाहिं-हीं हे निषेधार्थक शब्द लागून अकरणरूपें होतात. नव हा शब्द मागें लागतो.

न लगे = लागे ना = नाहिं लागे, लागे नाहीं, नव लगे.

न लगति = लागति ना = नाहिँ लागति, लागति नाहिँ, नव लागति

नापि = नाभि = नाहि. अनुनासिक आगंतुक आहे.

नैव = नव.

नैव गंतव्यं = नव जावें.†

नोहोनि, नोको, नको, नेँ घे, नेँ दे, नुबुझे, नेणिजे, नाकले, इ. इ. इ.

( महाराष्ट्री ) नकुण ( लोट् ) = नकु = नको ( नकुरु, मा कुरु )

जाऊँ नको = यातुं ( वैदिक द्वितीया एकवचन ) मा कुरु.

तेंहि नको = तदपि मा कुरु.

नको हें क्रियाविशेषण असतें तेव्हां तें नुकम् ह्या संस्कृत निपातापासून निघालें आहे, असें समजावें.

मूळ धातूचा किंवा त्याच्या रूपाचा आद्य स्वर नकार घेतो.

न+होउनि = नोहोनि. न+को = नोको

न+बुझे = नुबुझे. न+अकले = नाकले

हे सर्व प्रकार मराठींत कवितेंत व गद्यांत प्रचलित आहेत.

## ८६. कांहीं मराठी धातू

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| हस् | हस | हस ए |
| कृ | कर | कर ई |
| जी | जअ | जी ए |
| जी | जिण | जिण ए |
| संचि | संचि | सांच ए |
| सू | सव | सू ए |
| प्रसु | पसव | पसव ए |
| प्रस्नु | पण्हअ | पान्ह ए |
| आरु | आरव | आरव ए |
| नी | णे, णअ | ने ई |
| आनी | आण | आण ई |
| परिणी | परिण | पर्ण ई |

† ' नव जावें ' ही शब्दतोड बरोबर नाही. ' न वजावें ' असे पाहिजे. ( सं. व्रज्>वजणे )

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| उड्डी | उड्ड | उड ए |
| दा | दे | दे ई |
| भू | हो, हव | हो ई, हव ए |
| अनुभू | अनुभव | अनुभव ई |
| धृ | धर | धर ए, ई |
| वृ | वर | वर ई, ए |
| सृ | सर | सर ए |
| हृ | हर | हर ए |
| तृ | तर | तर ए |
| जृ | जर | जर ए |
| अवसृ | ओसर | ओसर ए |
| प्रसृ | पसर | पसर ए, ई |
| मृ | मर | मर ए |
| उत्तृ | उत्तर | उत्तर ए |
| उत्कृ | उक्कर | उरक ए, ई |
| उत्कृ | उक्किर | उकर ई |
| स्मृ | सर | सर, स्मर ए |
| विस्मृ | विसर | विसर ए |
| गै | गा | गा ए |
| निद्रा | निद्दा | नीद ए |
| जीव् | जिअ | जी ए |
| आरुह् | आरुह | आरोह ए |
| धू | धाव | धु ए |
| ( जि ) घ्रा | आइग्घ | चघल ए, ई |
| पा | पीअ | पी ए |
| स्था | ठा | ठा ए |
| उत्था | उट्ठ | उठ इ |
| दंश् | डस | डस ए |
| खाद् | खा | खाद, खा ए, ई |
| आलिप् | अल्लिव | आलिव, आलव ए, ई |
| मुच् | मुंच | मोच ई |

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
| --- | --- | --- |
| स्पृश् | फुस्, फास् | पुस ई, फाँस ए, ई |
| कृष् | करिस | करिष ए |
| वर्ष् | वरिस | वरिष ए |
| हर्ष् | हरिस–ख | हरिष, हरिख ए |
| आत्रुट् | आतुड | आतुड ए |
| त्रुटयति | तुट्ट, तोड | तुट ए, तोड ई |
| मील् | मेल, मिल्ल | मिल ए, मेळ ए |
| उन्मील् | उम्मिल | उमल ए |
| स्फुट् | फुट्ट | फुट ए |
| धा | धा | धा ए |
| जायते ( जन् ) | जाअ | जा ए |
| मा | माअ | मा ए |
| वा | वाअ | वा ए |
| निर्मा | णिम्मा | निम ए |
| निर्वा | णिव्वा | निव ए |
| प्रतिभा | पडिहाअ | पढिअ ए |
| प्रतिभास् | पडिहास | पडिहास ए |
| स्ना | ण्हा | न्हा ए |
| नृत् | णच्च | नाच ए |
| युध् | जुज्झ | जुझ ए |
| मन् | मण्ण | मण ए, ह्मण ए |
| कुप् | कुप्प | कोप ए |
| नश् | णस्स, णास | नश, नाश ए |
| रुष् | रुस | रुस ए |
| दुष् | दुस | दुष ए, दोष ए |
| पश् | पास | पाह ए |
| क्रुश् | कोक्क | कोक ए |
| चल् | चल्ल, चल | चल ए, चाल ए |
| परिचल | पअल्ल | पल ए |
| जेम् | जेम | जेव ए |
| रुच् | रुच्च | रुच ए |

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
| --- | --- | --- |
| लग् | लग्ग | लग, लाग ए |
| वच् | — | वच ए |
| विश्रम् | वीसम | विसंब ए § |
| गण् | गण | गण ई |
| वेष्ट् | वेढ | वेढ ई |
| प्रकाश् | पअआस | पाह ए |
| प्रार्थ्यते | पाह | पाहिजे ( कर्मणि ) |
| संख्या | संघ | सांघ ए |
| आविकर्ण् | आइकण्ण | आइक ए |
| इ | ए | ए, ई ( एइजे, कर्मणि ) |
| उदि | उदे | उदे ई ( उदैजे, कर्मणि ) |
| स्वस् | सस | सास ए |
| उच्छ्वस् | ऊसस | उसस ए |
| संधा | संढ | सांड, संड ए, ई |
| भी | बिह | भी, बिह ए |
| चि | चिण | चिण ई |
| परिश्रु | परिसुण | परिस ए |
| प्राप् | पाव, पाअ | पाव ए, पा ए |
| व्याप् | वाव | वाव ए |
| तक्ष् | तच्च | टांच ई |
| शक् | सक | सक ए |
| स्तृ | ठर | ठर ए |
| छिद् | छिंद | छिंद ए, छिद ए |
| भंज् | भंज् | भांज ए |
| भुज् | भुंज | भुंज ए |
| युज् | जुज्ज | जुग ए |
| प्रयुज् | पउंज | पुंज ए |
| ज्ञा | जाण | जाण ए, ई |
| नज्ञा | णआण | नेण ए, ई |

§ मूळ प्रतींत ' विसंघ ए ' असे आहे. अर्थात् मुद्रणदोष.

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| विक्री | विक्किण | विक ए, ई |
| ग्रंथ् | गंठ | गांठ ई |
| ग्रह् | गेण्ह | घे ई |
| भण् | भण | म्हण ए |
| चमत्कृ | — | चमकव ( प्रयो. ) ई |

## ८७. ज्ञानेश्वरीच्या आठव्या अध्यायांतील मराठी धातू

महाराष्ट्रींतून मराठींत धातू कसे उतरले तें वरील यादीवरून स्पष्ट आहे. ज्ञानेश्वरीच्या आठव्या अध्यायांतील मराठी धातू कोणत्या संस्कृत धातूंपासून निघाले, त्याची यादी पहिल्या ओवीपासून शेवटल्या ओवीपर्यंत देतों :—

म्हणितलें ( भण् )
अवधारिलें ( अवधारि )
पूसिलें ( प्रच्छ् )
निरोपिजो ( निरूपि )
सांघां ( संख्या )
परियसें ( परिश्रु )
बोलो ( वल्ह् )
भरे ( भृ )
जाणिजसि ( ज्ञा )
देखां ( दृश् )
पवडला ( प्रवृत् )
होयें ( भू )
ओसणतां ( अवसद् )
वचे ( वच् )
आलें ( आगम् )
आहे ( अस् )
ओलगति ( अवलग् )
ओगरूनि ( अवगृ )
निगे ( निर्गा )
लागे ( लग् )
दे ( ( दा )
आइका ( आविकर्ण् )
जाला ( जन् )
कोंदलें ( कुन्द् )
पावें ( प्राप् )
गाळूनि ( गल् )
घेतलें ( गृह् )
हालवलें ( हल् )
निमणें ( निमा )
उठीति ( उत्था )
फूटे ( स्फुट् )
मोडौनि ( मुडि खंडने )
पाहिजे ( प्रकाश् )
प्रसवति ( प्रसू )
वाढे ( वृध् )
सांचला ( संचि )
रचे ( रच् )
पातां ( पश् )
दीसति ( दृश् )
करुं ( कृ )
नैये ( इ )
वियें ( वी )

निफजवी ( निष्पादि )
आणीति ( आनी )
मिळौनियां ( मील् )
अधिकरूनि ( अधिकृ )
भ्रंशे ( भ्रंश् )
भोगिजे ( भुज् )
उपार्जलें ( उपार्ज् )
सीणें ( शॄ )
आलविजे ( आलिप् )
उपशमी ( उपशम् )
गैलें ( गा )
झांकलें ( झष् संवरणे )
मानवें ( मन् )
फीटे ( स्फिट् )
तूटे ( त्रुट् )
आटे ( अट् गतौ )
ठेविली ( स्थापि )
भेदली ( भिद् )
गमेली ( गम् )
नेले ( नी )
सांधिले ( संधा )
धरूनि ( धृ )
दाविजतसे ( दश् )
शोधूनि ( शुध् )
पूजिजति ( पूज् )
तोषविजे ( तुष् )
अर्पे ( अर्प )
उरे ( उर्वर )
पातलें ( प्राप्त )
परिहसतु ( परिश्रु )
धाइजे ( धी )
सगातसे ( संगा )
संवरूनि ( संवृ )
जळौं ( ज्वल् )
पडिलीं ( पत् )
धूतली ( धू )
रूळे ( रूढ, महाराष्ट्री )
उतली ( व्ये )
बुडाला ( बुड्ड, महाराष्ट्री
 = बुन्द् निशामने )
सांडिलें ( संधा )
उबातेन ( उष्माय् )
विसकुसे ( विकुस् )
मेकलीति ( मेख, नामधातू )
आदललेया ( आदल् )
पलतां ( परिचल् )
चूकवावेया ( चुक्क, महाराष्ट्री )
ठाकें ( स्था )
भले ( व्हल् )
जागतां ( जागृ )
भीजे ( भिद् )
जीतेन ( जीव् )
आठवे ( आस्तु )
स्मरावें ( स्मृ )
भावावें ( भ्राव् )
धालावें ( ग्रह् )
वर्ततु ( वृत् )
अभ्यासूनि ( अभ्यास् )
कोप ( कुप् )
टाकी ( टक् )
लावि ( लू )
मीनले ( मिल् )
चले ( चल् )
नीमणें ( निमा )

जिए ( जीव् )
भिए ( भी )
चरे ( चर् )
सिरे ( श्रि )
थिरावले ( स्थिराय )
बैसोनि ( उपविश् )
सूनि ( सू )
संभ्रमे ( संभ्रम् )
आकळलेनि ( आकल् )
मांडतु ( मंड् )
फुडें ( स्फुट् )
उमाणलें ( उन्मा )
उलंडुनि ( उल्लंड् )
बुधुकलले ( बुध् ( बुज्झ ) +कल् )
घडे ( घट् )
कलासति ( खिल, नामधातु )
कोंडलें ( कुड् वैकल्ये )
राहलेयां ( रह् )
विलसे ( विलस् )
सरे ( सृ )
पूरे ( पृ )
त्यजी ( त्यज् )
उघडलेयां ( उद्घट् )
निरुंधी ( निरुध् )
सेविला ( व्से )
वाउनि ( वह् )
भेटणें ( भिड् )
एकावटणें ( एक, नामधातु )
लिंगटले ( लग्, नामधातु )
उपासिति ( उपास् )
वाखाणावा ( व्याख्या )
साहावे ( सह् )
उपाइली ( उत्पद् )
झाडूनि ( झट् )
निवडूनि ( निवट् )
अव्हेरुनु ( अवधीर् )
आवडे ( आवृत् )
वाढतें ( वृध् )
दुभतें ( दुह् )
उसिटा ( उच्छिष् )
सांसिनले ( संसद् )¶
ओलले ( आवल् )
दूखे ( दुःख् )
चेइलेया ( चित् )
सिंपती ( स्पृश् )
लोटती ( लुट् )
जिरति ( जृ )
सूचत ( सूच् )
नश् ( नश् )
पूसे ( स्पृश् )
संपडे ( संपत् )
विसंचे ( विसंचि )
उपजे ( उत्पद् )
ठके ( ठक् )
पांढलेयां ( प्रहुड् प्रावरणे )

¶ राजवाड्यांनींच अन्यत्र हा धातू पाणिनीय धातुपाठांतील ' सिन्व् ' या धातूपासून व्युत्पादिला आहे व त्यावरून ' पाणिनीय धातुपाठांतील धातू काल्पनिक नाहींत ' असा निष्कर्ष काढला आहे. ( ज्ञानेश्वरी, अ. ३, ओ. ४, पृ. ६ ).

| | |
|---|---|
| गिवसित ( गवेष् ) | ओळखावे ( अवलक्ष् ) |
| अचिंतें ( चित् ) | रिगत ( निर्गा ) |
| वरिपडिला ( उपरिपत् ) | शके ( शक् ) |
| भ्रमुनि ( भ्रम् ) | पारिखावे ( परीक्ष् ) |
| अनुभवलेया ( अनुभू ) | जुंतलेयां ( युज् ) |
| आतें ( अत् बंधने ) | प्रतिभासे ( प्रतिभास् ) |
| विश्वोनि ( विध्मै ) | आप्लवे ( आप्लु ) |
| उदितें ( उद्यम् ) | पेलुनि ( प्रेर् ) |
| थरे ( स्तृ ) | गाजति ( गर्ज् ) |
| सांभालावें ( संभाल् ) | डावली ( द्राघीयस = डाघीय = डावा, नागधातू ) |
| लाहुनि ( लभ् ) | पीकलें ( पच् ) |
| गवली ( गवेष् ) | जोडलें ( युज् ) |
| दाटे ( दट् ) | वीटे ( विट् ) |
| टाकी ( टक् ) | आंवगणें ( वग् गतौ ) |
| वोडवति ( अवकर्ष् ) | अनुमानिति ( अनुमन् ) |
| बहुडे ( प्रहुड् ) | आरूढति ( आरुह् ) |
| वसता ( वस् ) | |

वरील दोनही याद्यांवरून दिसतें कीं ज्ञानेश्वरींतील बहुतेक सर्व धातू संस्कृतांतून साक्षात् किंवा महाराष्ट्रीद्वारा आले आहेत. अठरा हि अध्यायांत हा च प्रकार आहे.

## अष्टमाह्निक समाप्त

## नवमाह्निक

### ८८. तद्धितप्रक्रिया

संस्कृतांतील सर्व तद्धित प्रत्यय स्वता किंवा महाराष्ट्रीद्वारा अथवा अपभ्रंशद्वारा प्रतिनिधि-रूपानें ज्ञानेश्वरींत येतात. त्यांचा सामग्र्यानें विचार आदेशप्रक्रियेंत करणार आहे. येथें पांच चार प्रत्ययांचा च तेवढा निर्देश करतों.

#### ( त्यप् ) त्य = च्च = च

हा प्रत्यय संस्कृतांत अमा, इह, क, तसिल् – प्रत्ययान्त व त्रल् – प्रत्ययान्त अव्ययांपुढें होतो. तसिल्प्रत्ययान्त व त्रल्प्रत्ययान्त अव्ययें पंचम्यर्थी व सप्तम्यर्थी आहेत, तेव्हां मराठींत, शब्दांच्या पंचमीला व सप्तमीला हा प्रत्यय लागून, शिवाय अनुकरणानें प्रथमेला व षष्ठीला लागतो.

| संस्कृत | मराठी |
|---|---|
| इहत्य | इँच |

| | |
|---|---|
| तत्रत्य | तेथच |
| अत्रत्य | एथच |
| ततस्त्य | तेथूनच |
| यतस्त्य | जेथूनच |
| यत्रत्य | जेथच |
| कुत्रत्य | कोठच |
| नित्य | निच्च* नीच इ. इ. इ. |

मराठींत प्रथमा, पंचमी, षष्ठी व सप्तमी ह्यांच्या रूपानें हा प्रत्यय येणेंप्रमाणें लागतो :—

प्रथमा :- घर–घरच, गांवच, रामच, नदीच, रमाच, सुंदरच

पंचमी :- घराहूनच, गांवाहूनच, नदीहूनच, सुंदराहूनच

षष्ठी :- घराच, गांवाच, रामाच, नदीच, रमेच, सुंदराच

सप्तमी :- घरिँच, रामिँच, नदीँच, रामिँच, सुंदरिँच.

नामांच्या व अर्थात् विशेषणांच्या प्रथमा, पंचमी, षष्ठी व सप्तमीप्रमाणें च क्रियाविशेषणांच्याहि सप्तमीखेरीज विभक्ती ह्या त्य = च प्रत्ययामागें होतात :—

| | |
|---|---|
| प्रथमा ( कल्पित ) | तेथच |
| पंचमी | तेथूनच |
| सप्तमी | तेथिँच |

हा त्यज‡ प्रत्यय सर्व नामांना लागतो. पैकीं वर्तमान व भूत व भविष्य ह्यांचीं कृदन्तांना येणेंप्रमाणें लागतो.

व. कृ. करता–करतेयाच ( चा, ची, चें ), करत्याच ( व. म. )
करती–करितियेच ( चा, ची, चें ), करतीच ( व. म. )
करतें–करतेयाच ( चा, ची, चें ), करत्याच ( व. म. )

भू. कृ. केल–केलेयाच ( चा, ची, चें ), केल्याच ( व. म. )
केली–केलियेच ( चा, ची, चें ), केलीच ( व. म. )
केलें–केलेयाच ( चा, चो, चें ), केल्याच ( व. म. )

भ. कृ. कराव–करावेयाच ( चा, ची, चें ) करावयाच ( व. म. )
करावी–करावियेच ( चा, ची, चें ), करावियेच ( व. म.!)
करावें–करावेयाच ( चा, ची, चें ), करावयाच ( व. म. )

भ. कृ. करण–करणेयाचे ( चा, ची, चें ), करण्याच ( व. म. )

---

* प्राकृत रूप ' णिच्च ' पाहिजे.

‡ त्य-ज म्हणजे ' त्य 'पासून झालेला.

ह्या चान्त नामांना व विशेषणांना सर्व विभक्तिप्रत्यय लागतात :—

करतेयाचेन, करतेयाचेया, करतियाचिया, करतेयाचिये, करतियेचेन, करतियेचेया, करतियेचिया, करतेयाचिये इ. इ. इ.

त्व = त्तण = प्पण = पण

वैदिक त्वन = संस्कृत त्व = महाराष्ट्री प्पण = मराठी पण.

| संस्कृत | महाराष्ट्री | अपभ्रंश | मराठी |
|---|---|---|---|
| दलपतित्व | दलवइत्तण | दलवइप्पण | दळवैपण |
| सादृश्यं | सरिसत्तण | सरिसप्पण | सरिसेपण |
| कोमलत्व | कोंवलत्तण | कोंवलप्पण | कोंवलेपण |
| दासीत्व | दासित्तण | दासिप्पण | दासीपण |
| मदीयत्व | मज्झत्तण | मज्झप्पण | माझेपण |

मराठींत 'पण' प्रत्ययाच्या मागें कित्येक पुल्लिंगी शब्दांना एकारादेश विकल्पानें होतो, व नपुंसकलिंगी शब्दांना प्राचुर्यानें होतो.

आत्मन् ह्या शब्दाचें भाववाचक 'आपणपें' होतें.

आत्मन्+आत्मन् = आत्मात्मन् = ( भाव. ) आत्मात्म्यं.

संस्कृत त्म्य = महाराष्ट्री प्प; जसें, माहात्म्यं = माहप्पं ( महाराष्ट्री )

तसें, आत्मात्म्यं....अप्पणाप्पं ( महाराष्ट्री ) = आपणापें = आपणपें ( मराठी )

वार्द्धक्यं ( वृद्धात्म्यं ) = वृद्धाप्पं ( महाराष्ट्री ) = वृद्धाप्य ( मराठी )¶

'पण' ह्या प्रत्ययाला पुल्लिंगी आ प्रत्यय लागून 'पणा' होतो :— दळवैपणा, माझेपणा, इ. इ.

'पण' हा प्रत्यय ज्ञानेश्वरींत तत्ता,* भाव ह्या अर्थी नामाप्रमाणें योजिलेला आढळतो.

( तल् ) ता = ई = पें

बहुचकै, सदयैं, चक्रवर्ती, निश्चिंते, चावटे, एकवंकै, ग्राहकै वगैरे भाववाचक नामें ज्ञानेश्वरींत सापडतात.

¶ याच धर्तीवर राजवाडे अधिक ( सं. आधिक्यम् ) हे भाववाचक नाम मानतात. ते म्हणतात—"विशेषण अधिक व भाववाचक नाम अधिक या दोन्ही शब्दांचीं रूपें ज्ञानेश्वरकालीन मराठींत सारखीं च दिसतात. परंतु सूक्ष्म अभ्यासानें त्यांचें भिन्नत्व ओळखतां येतें. ( उदा; " अहो तान्हेयांची लागे झटे । तरि तेणें अधिकें चि पान्हा फुटे । "
ज्ञा. ९, १८ टीका )

* तल्–त्व, किंवा तें–पण ( भाववाचकत्व )

ग्राहकता = ग्राहकई ( आ च्याबद्दल मराठींत स्त्रीलिंगी ई प्रत्यय नियत आहे ) = ग्राहकै = गिन्हाइकी.,

संस्कृतांत ( तल् ) ता प्रत्यय भाव, धर्म किंवा समुदाय दाखवितो.

चक्रवर्त्ती, चक्रवर्ती म्हणजे चक्रवर्त्तिपण, चक्रवर्त्तिता.

गुरुता = गरुवती ह्या भाववाचक शब्दांत ता बद्दल ईकारान्त ती ज्ञानेश्वरींत आहे. ह्या ती ची ई मराठींत झाली.

ग्राहकता = ग्राहकती = ग्राहकई = ग्राहकै = गिन्हाइकी.

पीनता ह्या शब्दाचें पीणआ असें महाराष्ट्रींत रूप होतें; परंतु त्याचा स्वीकार मराठीनें केलेला दिसत नाहीं.

गरिवँ, लघिवँ, द्दावँ, मैत्र, वैराग, धीरं, वीरं, साहाज, कौवलिक वगैरे भाववाचक शब्दांचा विचार आदेशप्रक्रियेंत येईल.

## ८९. स्वार्थे ल

मतुबर्थक ( लच् ) ल प्रत्यय ( फेन = फेनल ) संस्कृतांत आहे. तो महाराष्ट्रींत व मराठींत स्वार्थक झाला आहे. स्वार्थक म्हणजे मूळ अर्थात फेर न करणारा. जसें :—

( संस्कृत ) अंध = ( महाराष्ट्री ) अंधल = ( मराठी ) अंधल ( ला-ली-लें )

( „ ) एक = ( अपभ्रंश ) एकल = ( मराठी ) एकल ( ला-ली-लें )

ह्या ल प्रत्ययाची व्याप्ति मराठींत इतकी विलक्षण आहे कीं महाराष्ट्री व अपभ्रंश ह्यांच्यापासून भिन्नत्वेंकरून ओळखण्यास मराठीची ही एक च एक नियत खूण आहे. हा प्रत्यय मराठींत व ज्ञानेश्वरींत ( १ ) क्रियापदें, ( २ ) कृदन्तें, ( ३ ) नामें, ( ४ ) सर्वनामें, ( ५ ) विशेषणें, ( ६ ) क्रियाविशेषणें, व ( ७ ) निपात, ह्या साऱ्यांना लागतो. म्हणजे मराठींतील शब्दोदधीच्या सर्व शाखा ह्या प्रत्ययानें व्यापिल्या आहेत. संस्कृतांत व महाराष्ट्रींत हा प्रत्यय नामांना व विशेषणांना तेवढा लागे. मराठीनें संस्कृतापासून व महाराष्ट्रीपासून हा धर्म घेऊन, शिवाय इतर अवशिष्ट शब्दवर्गांना हा धर्म लावण्याची लकब ज्ञानेश्वरांच्या पूर्वी तीनशें वर्षांपासून नवीन स्वतः निर्माण केली आहे.

### ( १ ) क्रियापदांना ल प्रत्यय

भविष्यति लृट्च्या व लृङ्च्या सर्व रूपांना ल प्रत्यय कसा लागतो तें ५२ व्या कलमांत दाखविलें आहे.

### ( २ ) कृदन्तांना ल प्रत्यय

कर्मणि क्त व कर्त्तरि क्तवतु ह्या दोन्हीं कृदन्तांना ल प्रत्यय कसा लागतो तें ६० व ६१ ह्या दोन कलमांत दाखविलें आहे.‡ हा ल प्रत्यय शक ९०५ तील चामुंडरायाच्या शिलालेखांत,

‡ हें ६१ व्या कलमातच दाखविलें आहे. कलमांना क्रमांक देण्यात मूळ प्रतींत घोटाळा झालेला आहे.

म्हणजे शक १०१० पासून शक १०९४ पर्यंत असलेल्या हेमचंद्राच्या पूर्वी विद्यमान होता. हेमचंद्र ज्या अपभ्रंशाचें (प्राकृताचा तर उल्लेख करावयाला च नको) व्याकरण देतो तो अपभ्रंश निदान महाराष्ट्रांत तरी त्याच्या काळीं विद्यमान नव्हता, हें सिद्ध करण्यास एवढी एक च बाब पुरे आहे. कृदन्तांना ल प्रत्यय लागल्याचें हेमचंद्र एक हि सूत्र देत नाहीं. बाकी त्याच्या पूर्वीं-पासून तो मराठींत होता, हें शक ९०५ तील शिलालेखावरून स्पष्ट आहे.

( ३ ) नामांना ल प्रत्यय

विष्णु = विह्नु = विष्ठुल = विठ्ठल
कृष्ण = कन्ह = कान्हुल
गोविंद = गोंदु = गोंदुल
दादु = दादुला
बाबु = बाबुल
काकु = काउ = काउला
राजा = राउ = राउल
पादुका = पाउ = पाउल
छाया = साअ = सावळी

( ४ ) विशेषणांना ल प्रत्यय

चांग = चांगल ( ला–ली–लें )
पीत = पीअ = पिवळ ( ळा–ळी–ळें )
श्याम = सांव = सांवळ ( ळा–ळी–ळें ) इ. इ. इ.

( ५ ) क्रियाविशेषणांना ल प्रत्यय

जेंव्ह+ल = जेव्हल = जेव्हलिँ ( सप्तमी )
तेंव्ह + ल = तेव्हल = तेव्हलिँ ( ,, )
केंव्ह+ल = केव्हल = केव्हलिँ ( ,, )
एव्ह+ल = एव्हल = एव्हलिँ ( ,, )

( ६ ) सर्वनामांना ल प्रत्यय

इव+ल = इवळ; तिवळ; जिवळ; किवळ

( ७ ) निपात §

अम् ( थोडेंसें )+ल = अमळ ( अमळ इकडे ये )
द्राक् = द्राक = टाक+ल = टाकलें ( घाईनें ). सद्रागागतः = तो टाकलें आला.
अत्र+ल = एथल
तत्र+ल = तेथल

§ मुळांत या आंकड्यांतील + व = या खुणा नजरचुकीनें विपर्यस्त पडल्या आहेत.

### मतुबर्थक ( इलच् ) इल प्रत्यय

संस्कृत इल = महाराष्ट्री इल्ल = मराठी इल

| संस्कृत | अर्धमागधी महाराष्ट्री | अपभ्रंश | मराठी | |
|---|---|---|---|---|
| प्रथम | पढमिल्ल | पहिल | पहिल | ( ला-ली-लें ) |
| उपरि | उवरिल्ल | — | वरिल | ( ,, ) |
| पुरस् | पुरिल्ल | — | पुढिल, पुढैल | ( ,, ) |
| पूर्व | — | — | पुर्विल | ( ,, ) |
| दक्षिण | दक्खिणिल्ल | — | दक्षिणिल | ( ,, ) |
| बहिस् | बाहिरिल्ल | — | बाहिरिल | ( ,, ) |
| आदि | आदिल्ल | — | आदिल | ( ,, ) |
| मध्य | मज्झिल्ल | — | माझिल | |

वरिल, पहिल, बाहिरिल वगैरे ज्ञानेश्वरकालीन शब्द वर्तमान मराठींत वरल, पुढल, बाहेरल असे उच्चारतात. त्यामुळें वर्तमान मराठींत नुसता ल प्रत्यय लागलासें दिसतें. परंतु हा ल ज्ञानेश्वरकालीन इल प्रत्ययाचा अपभ्रंश आहे.

आल, आलु वगैरे प्रत्ययांचा विचार आदेशप्रक्रियेंत होईल.

### ( मतुप् ) मत्, वत्

हे प्रत्यय महाराष्ट्रींत व ज्ञानेश्वरींत वन्त व मन्त होतात व अकारान्त पुल्लिंगी व नपुंसकलिंगी शब्दाप्रमाणें व आकारान्त स्त्रीलिंगी शब्दाप्रमाणें चालतात.

| संस्कृत | महाराष्ट्री | मराठी |
|---|---|---|
| भक्तिमत् | भक्तिवन्त | भक्तिवन्त किंवा मन्त |
| धनवत् | धनमन्त | धनवन्त |
| हनुमत् | हणुमन्त | हणमन्त |
| गुणवत् | गुणमन्त | गुणवन्त |

### ( प्राकृत ) इम = इवँ

घोटिवँ, गाळीवँ, भरिवँ वगैरे तद्धितांचा विचार आदेशप्रक्रियेंत करणें प्रशस्त आहे.

### ( तसि ) तः = ता-ताँ

अतः = आताँ

उभयतः = उभयता-ताँ

स्वभावतः = स्वभावता-ताँ

स्वतः = स्वता-ताँ

**इल्ल = एल**

वर्तमान मराठींत एल प्रत्यय निष्ठाप्रत्ययान्त भूतकृदन्तांना लागतो.

गेल+एल = गेलेल ( ला-ली-लें )

मेल+एल = मेलेल, इ. इ. इ.

द्याणितल, द्याणिअल, द्याणियल, द्याणाल, द्यांतल, द्याठलें ह्या रूपांत संस्कृत, महाराष्ट्री, अपभ्रंश, ज्ञानेश्वरी मराठी, एकनाथी मराठी व वर्तमान मराठी ह्यांचें प्रतिबिंब दिसतें.

## ९०. कृत्प्रत्यय

**आ-ई-इर**

हे कृत्प्रत्यय धातूंना लागून मराठींत नामें होतात :—

लपी, थपी, सांडी, विलुरी, पाडी, तोडी, मोडी.

यावा, जावा, निगा, चावा, लाजिर, हसिर, नाचिर, इ. इ. इ.*

बाकी जे अनेक कृत्प्रत्यय ज्ञानेश्वरींत आढळतात त्यांचा विचार आदेशप्रक्रियेंत करणें सोईचें आहे.

जे शब्द पदार्थवाची नव्हत ते निपात अथवा अव्यय. † ते दोन प्रकारचे :—विकृत आणि अविकृत. ज्यांना विभक्तिकार्य होतें ते विकृत; होत नाहीं ते अविकृत. संस्कृतांतून जसेचे तसे जे आले ते तत्सम; अपभ्रंश होऊन आले ते तद्भव. कित्येक निपात क्रियेचीं विशेषणें असतात. कित्येक शब्दांचा किंवा वाक्यांचा अन्वय करतात. कित्येक उद्गारवाचक असतात; व कित्येक केवळ पादपूरक असतात. हे प्रकार अशास्त्रतेस्तव संस्कृत व्याकरणांत नाहींत. येथें लौकिकार्थानें दिले आहेत.

## ९२. पादपूरक निपात

| | संस्कृत | महाराष्ट्री | अपभ्रंश | ज्ञानेश्वरी | वर्तमान मराठी |
|---|---|---|---|---|---|
| ( १ ) | चित् | चिअ | — | चि, ची | च |
| ( २ ) | अपि | भि | — | हि, हिं, ही, हीं | हि |
| ( ३ ) | त्वै | प्पइ | — | पैं | पैं पाँ |
| ( ४ ) | किम् | — | — | कीं | कां |
| ( ५ ) | उ | — | उ | उ ( घेउनु ) | |
| ( ६ ) | इ | — | इ | इ ( घेउनि ) | इ |

* हे शब्द ज्ञानेश्वरींत लपीथपी ( १४.९ ), सांडीविलुरी ( ९.३९ ), यावाजावा ( १४.३३७ ) याप्रमाणें सामासिक स्वरूपांत येतात.

† अव्ययाची वरील व्याख्या कितपत बरोबर आहे ?

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (७) — | इयां(मागधी) | — | इयां | इयां |
| (८) किल | किर | — | किर, कीर,<br>कीर, कीँ | की ( आलों की ),<br>की |
| (९) किन्तु | किणो | — | — | किनी, कनी |
| (१०) हन्त | -- | — | हान | आन्, आणि, न्, नी,<br>तो आन् तसा बोलेल !<br>ब्राह्मण नि दारू पीईल?<br>अशा प्रकारची व्यवस्था<br>आणि सरकारनें केली ! |
| (११) तावत् | — | तवँ | तवँ | तवँ,तों, तर(तअ बद्दल) |
| (१२) तर्हि | — | — | — | तर |

### ९३. उद्‌गारवाची

| | संस्कृत | महाराष्ट्री | अपभ्रंश | मराठी |
|---|---|---|---|---|
| १. | जय | — | — | जय |
| २. | आर्य | अज्ज | — | जी |
| ३. | ॐ | — | — | ॐ |
| ४. | नमो | णमु | — | नमो |
| ५. | अंग | — | — | अगा, आगा, हांगा, गा |
| ६. | हंहो | — | — | हाँहो |
| ७. | हे | — | — | हे |
| ८. | अहो | — | — | अहो, आहो |
| ९. | रे | — | — | रे |
| १०. | अरे | — | — | अरे, अरेरे |
| ११. | ए. | — | — | ए |
| १२. | अये | — | अइ | अयि ( संभावनायाम् ) |
| १३. | रै | — | — | रया |
| १४. | बत | — | — | बा, पाँ |
| १५. | ओ | — | — | ओ, वो |
| १६. | अवे | — | — | अवो |
| १७. | धिक् | — | — | धिक्-ग्,धिगि ( इ पादपूरक) |
| १८. | हंहो जय | — | — | हाँ जी |
| १९. | ओ किम् | — | — | हो काँ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २०. | वप्तर् | बप्पु | — | बापु |
| २१. | वप्त्री | बप्पी | — | बाई |
| २२. | हा धिक् हा धिक् च भागिनेय | हध्धी हध्धी च बाहिणीअ | — | हात् तिच्या बहिन ! |
| २३. | हा धिक् हा धिक् च हद्धि | | | हात् तिच्या |
| २४. | न्हीच्छ(लज्जायां) — | | — | इश्श् |
| २५. | हालिक | — | — | हल्या |
| २६. | गर्दभ | — | — | गाढव |
| २७. | — | — | थू | थूत् |
| २८. | — | — | हुं | हुँ |
| २९. | — | — | आग | यावँ, यँव (निमंत्रणे, आश्चर्ये) |
| ३०. | — | — | तं | त ( वाक्योपन्यासे ) |
| ३१. | — | — | नु | न् ( काम करतो न् ) |
| ३२. | — | — | ऊ | ऊँ ( गर्हायाम् ) |
| ३३. | — | — | वले | व्हले, भले ( निर्धारणे ) |
| ३४. | — | — | मामि | माइ, मामि ( आमंत्रणे ) |
| ३५. | — | — | मणे | मणे, ह्मणे ( विमर्शे ) |
| ३६. | — | — | जेण, तेण | जेत्ते, जेहेत्ते ( लक्षणे ) |
| ३७. | — | — | जणु | जणु ( इवार्थे ) |
| ३८. | अह | — | — | अहा |

## ९४. उभयान्वयी

कित्येक अन्वयी निपात शब्दाशब्दांचा अन्वय करितात; कित्येक शब्दांचा व क्रियापदांचा अन्वय करितात; कित्येक गौण व मुख्य वाक्यांचा अन्वय करितात आणि कित्येक स्वतंत्र वाक्यांचा अन्वय करितात.

| | संस्कृत | महाराष्ट्री | अपभ्रंश | मराठी |
|---|---|---|---|---|
| १. | इदानीम् | इदाणिं (सौरसेनी इदंची सप्तमी) | दाणिँ | दाणि-णिँ-णी-णीँ |
| २. | — | — | इथि | इथेँ |
| ३. | — | — | जिथि | जियेँ |
| ४. | — | — | तिथि | तियेँ |
| ५. | — | — | कुध्र | कुठेँ |
| ६. | — | — | एत्थ | एथि, एथ, एथेँ, येथेँ, येथ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ७. | — | — | तेथ | तेथि, तेथ, तेथें |
| ८. | — | — | जेत्थ | जेथ, जेथें, जेथि |
| ९. | — | — | कोध्र | कोठें |
| १०. | अत्र | अत्थ | — | अथे, इथे |
| ११. | तत्र | तत्थ | — | तत्थ,* तथे |
| १२. | यत्र | जत्थ | — | जत्थ,* जथे |
| १३. | *कत्र | कत्थ | — | कठें |
| १४. | कुत्र | कुत्थ | — | कुथे |
| १५. | अतः | अता | — | आताँ |
| १६. | एवमपि | — | एवँइ-हिँ | एविँ, येविँ |
| १७. | कथमपि | — | केवँइ | केविँ |
| १८. | तथापि | — | तेवँइ | तेविँ |
| १९. | यथापि | — | जेवँइ | जेविँ |
| २०. | इतरथापि | — | एरवँइ | एरविँ-एन्हविँ<br>यन्हविँ-येन्हविँ |
| २१. | यावत् | — | यावँ | जवँ, ( जोँ ) |
| २२. | तावत् | — | तावँ | तवँ, ( तोँ ) |
| २३. | इयत् | — | *इवँ | *इवँ |
| २४. | एतावत् | — | — | एवँ |
| २५. | कियत् | — | — | *केवँ |
| २६. | इयत् वारम् | *एद्दहवा | — | एधवाँ |
| २७. | कियत् वारम | *केद्दहवा | — | केधवाँ |
| २८. | यावत् वारम् | *जेद्दहवा | — | जेधवाँ |
| २९. | तावत् वारम् | *तेद्दहवा | — | तेधवाँ |

३०. एधवाँ = एहवाँ = एव्हाँ

३१. तेधवाँ = तेहवाँ = एव्हाँ

३२. जेधवाँ = जेहवाँ = जेव्हाँ

३३. केधवाँ = केहवाँ = केव्हाँ

३४. एव्ह+ल = एव्हल = एव्हलिँ ( सप्तमी )

३५. तेव्ह+ल = तेव्हल = तेव्हलिँ ( „ )

* हीं रूपें ( तत्थ, जत्थ ) अपभ्रंशांतील आहेत; मराठी नाहींत.

३६. जेल्ह्+ल = जेल्हल = जेल्हळिँ ( सप्तमी )
३७. केल्ह्+ल = केल्हल = केल्हळिँ ( ,, )
३८. कैसें, कैसेनि, कैसाँ, काइसेनि, काइसाँ, काइसेँ ( कासया, काइया, काशा )
३९. जैसें, जैसेनि, जैसाँ
४०. तैसें, तैसेनि, तैसाँ
४१. ऐसें, ऐसेनि, ऐसाँ
४२. जैँ ( ज ची सप्तमी )
४३. तैँ ( त ची सप्तमी )
४४. कैँ ( क ची सप्तमी )
४५. नकैँ, नकहिँ ( क ची सप्तमी )
४६. काहि–हिँ–ही–हीँ ( काह ची सप्तमी )
४७. काइ–ई–य–यी–ये–ई–इँ, ईँ
४८. काँ ( कैँ = काइँ = काँय = काँअ = काँ )
४९. तेथौनि, तेथुनि, तेथौनियाँ, तेथूनियाँ, तेथुनु
५०. जेथौनि इ. इ.
५१. कोठौनि इ. इ.
५२. येथौनि, एथौनि इ. इ. इ.
५३. ( यर्हि ) जन्हिँ, जन्हीँ, जन्हैँ ( यर्हि अपि ), जरि, जर
५४. ( तर्हि ) तन्हिँ, तन्हीँ, तन्हैँ ( तर्हि अपि ), तरि, तर
५५. ( एतर्हि ) एरि, एन्हीँ इ. इ.
५६. यन्हविँ तन्हिँ
५७. ना ( न )
५८. ना तरि, ना तन्हिँ
५९. ना यन्हविँ तन्हिँ
६०. जवँ जवँ–तवँ तवँ

| | संस्कृत | महाराष्ट्री | अपभ्रंश | मराठी |
|---|---|---|---|---|
| ६१. | न, नञ्† | — | — | न, ना* |

† राजवाडे–व्युत्पादन : सं. नञ् ( ज्ञाने. अ. ९ वा, ओ. ५२ टीका ).

* एक ' ना ' या अव्ययांत दोन्ही Neither–nor हे अर्थ व्यक्त होतात हें राजवाड्यांनीं ज्ञानेश्वरीच्या ९ व्या अध्यायांतील पुढील ओव्यांवरील टीकेंत दाखविलें आहे :— " करी ना करवी " ( ९.१२६ ); " नियमी ना निवारी " ( ९.१२७ ); " घेपे ना दीजे " ( ९.१७४ ).

| | | | |
|---|---|---|---|
| ६२. नुकम् | — | — | नको |
| ६३. नाम | नावँ | — | नाँ ( येतोस नाँ ? ) |
| ६४. नह-नह | — | — | ना-ना |
| ६५. नान्यथा | — | ण अण्णह | नाना ( तसेंच ) |
| ६६. अपि | भि | — | हि–ही–हिँ–हीँ–ँई–इँ |
| ६७. किं ( वा ) | — | — | किँ, कीँ ( अथवा ), कीं ( किंआ = क्यां = कां ) |
| ६८. पुनः | — | पुणु | पुणु, पण |
| ६९. यत् | ज्ज | ज्जा | जें, जेँ |
| ७०. माङ् ( निषेध ) | — | — | मा, मंग ( अशिष्ट ), मग ( विधि ). तो आला; मग, मी गेलों = तो आला; नाहीं, मी गेलों = तो आला; नंतर, मी गेलों. |
| ७१. अनंतर | — | — | नंतर, नंतरि |
| ७२. अम् | — | — | अमळ ( अम + ल ) ( वर्तमान ) |
| ७३. सपदि | सअइँ | — | सइँ–ईँ |
| ७४. मध्य | मज्झ | — | माझि–जि ( सप्तमी ) |
| ७५. मध्यगृहे | मज्झअरम्मि | — | माझारि–रिँ |
| ७६. उपरि | वरि | — | उपरि, वरि, वर, वरौनि, वरौनियाँ इ. इ. |
| ७७. साह्ज्येन | — | — | साह्याजेँ, साह्याज |
| ७८. नापि | — | — | नाहि–हिँ–हीँ–ही, नहि |
| ७९. बहिस् | बाहिर | — | बाहिर, बाहिरी, बाहिरौनि, |
| ८०. अभ्यन्तरा | भितरा | — | भितरा |
| ८१. नाम एकं | — | — | नावँ एक, नावेक † |
| ८२. एकवेलम् | — | — | एकोल, येकोल |
| ८३. सपदि इ | — | — | सइँघ = सैँघ |

† याचें व्युत्पादन राजवाडे पुढीलप्रमाणें करतात :–नव्यकम् ( अव्यय ) = नव्यानें ( नावेक ); नव्यनव्यकम् = नावांनावां ( नव्यानव्यानें )–ज्ञाने. अ. ९ वा, ओ. ७१ टीका.

| | | | |
|---|---|---|---|
| ८४. आदौ | — | — | आदिँ–धिँ–दीँ§ |
| ८५. झट् | — | — | झडकरि, झाकरि |
| ८६. *भणित्वा | — | — | झणौनि,झणुनि,झणुनु इ.इ. |
| ८७. परंतु | — | — | परंतु, परि¶ ( सप्तमी ) |
| ८८. अद्यापि | अज्जुइँ | — | अझुइँ, अझुही, अझुईं, आझुँ ( अजून, वर्तमान ) |
| ८९. नकिर् | — | — | नकिरे, नाहीं किर ( अशिष्ट ), नाहीं की ( शिष्ट ) |
| ९०. सहसा | — | — | सहसा |
| ९१. बलें | — | — | बलें |
| ९२. दूरे | — | — | दूरिँ, दूरौनि–नियां |
| ९३. पुरस् | पुढ | पुढ | पुढेँ, पुढां, पुढौनि, पुढारां, पुढौतें, पुढुतें, पुढुतीं ( सप्तमी ) |
| ९४. मार्ग | मग्ग | — | †मागें, मागां, मागौनि, मावारां, मागुती-मापौती –तें–ता. |
| ९५. अन्त | — | — | आंतु, आंतौनि, आंतौत ( विशेषण ) |
| ९६. कदापि | कइँभि | — | कधीं |
| ९७. — | — | वहिल्ल | वहिलें–ला–ली |
| ९८. सर्वदा | — | — | — |

§ ज्ञाने. ९.७९ मध्यें ( " ते चि कल्पिती प्रकृति पुरे। आणि भूताग्रामु आदि चि सरे" ) राजवाडे हें 'तमभावदर्शक अव्यय' मानतात. व्युत्पत्ति : आदिँ < सं. आदौ–तमो हीयते ( ज्ञा. ९.७९ टीका ).

¶. राजवाडे व्युत्पादन : परि = परं अपि = परं भि = परं हि = परं इ = परिँ–परि. पर = परं ( ज्ञाने. अ. ९ वा, ओ. २ टीका ).

† मागां व मावौतें हीं रूपें राजवाडे अनुक्रमें ( सं. ) मा + अग्रं व मा + अग्रभूत यांपासून व्युत्पादितात. त्यांच्या मतें अग्रे = आगां, म्हणजे पुढें, व त्याच्या उलट मागां. मराठींत आगें-मागें असें म्हणतातच. ( ज्ञानेश्वरी, अ. ९. ओ. ६८, १०० वरील टीका ).

| | | | |
|---|---|---|---|
| ९९. सदा | — | — | — |
| १००. किम् | — | कै | काय, काज |
| १०१. नैव | — | — | नव |
| १०२. मुधा ( उगीच, निष्फळ ) | — | — | मुद्धां ( तो मुद्धां आला = तो विनाकारण आला = तो देखील नको असतां उगीच आला ) |
| १०३. समम् | — | — | सवें, सगें |
| १०४. साम्येन | — | — | सवियाँ, सावियाँ |
| १०५. एकसर | — | एक्कसरिअँ | एकसरें |
| १०६. नियमेन | — | णेम | नेहमीं |
| १०७. तत्काल | *तात्काल | तालौं | तात्काल |
| १०८. कल्य | कल्ल | — | काल |
| १०९. अद्ये | अज्जि | — | आजि, ( आज ) |
| ११०. उदये | — | — | उदयाँ, ( उद्या ) |
| १११. परेद्यु | — | — | परवाँ¶ |
| ११२. तदितरेद्यु | — | — | तेरवाँ |
| ११३. इतरेद्यु | — | — | एरवाँ |
| ११४. पूर्वेद्यु | — | — | ( पुरवाँ ) परवाँ¶ |
| ११५. प्रभात | — | — | पहाट |
| ११६. दिवा | दिअ | — | दिआ, दिहा |
| ११७. द्विप्रहर | दुप्पहर | — | दुपार |
| ११८. संध्या | — | — | सांझ-ज |
| ११९. उषसि औषसे | — | — | औपीं-पी-शी अवशीं-शीं |
| १२०. अर्वाक्, आरात् | — | — | अरौतें |
| १२१. प्राक्, पारात्* | — | — | परौतें |
| १२२. सनात् | — | — | झनें, झणीं |
| १२३. सांप्रतं, सांप्रत्यम् | — | — | सँपें, सांपेंं |
| १२४. इतरवेलायाम् | — | — | एरवेळीं |

¶ परेद्यु>परवाँ = उद्याच्या परवां; पूर्वेद्यु>परवाँ = कालच्या परवां ( राजवाडे )

| | | | |
|---|---|---|---|
| १२५. अन्यत् | अण्णिअ | — | आणि |
| १२६. भ्राम्यत् | — | — | भवंत ( ता, ती, तें ) |
| १२७. मुखर | मोहर | — | मोहर, ( मोन्द ) |
| १२८. संमुखर | — | — | सँमोहर, सामोर |
| १२९. खात | खाअ | — | खाल ( खाअ+ल ), खालीं, खालौनि इ. इ. |
| १३०. वारयित्वा | — | — | वारून-नि इ. इ. |
| १३१. वचित्वा | — | — | वांचूनि इ. इ. |
| १३२. लगित्वा | — | — | लाग, लागौनियाँ, इ. इ. |
| १३३. विना | — | — | बिण, बीण, बिना |
| १३४. प्रति | — | — | प्रति |
| १३५. अड्डित्वा | — | — | आडौनि, इ. इ. |
| १३६. स्तव | तव | — | तव, स्तव |
| १३७. कारणेन | — | — | कारणें |
| १३८. कट | — | — | कड, कडें, कडाँ, कडौनि |
| १३९. पार्श्व | — | — | पासि-सिँ, पासौनि,पासाव |
| १४०. कृते | — | — | करितां |
| १४१. सार्धम् ( सधीम्, वैदिक ) | सद्धिम | — | साठिँ(स्य अर्थे पासून हा शब्द आला नाहीं. ) |
| १४२. यम | — | — | जवल-लि ( सप्तमी ) |
| १४३. पर्यंत | — | — | वेन्हिँ, वेरि ( सप्तमी ) |
| १४४. भर | — | — | भर, भरि ( सप्तमी ) |
| १४५. हीन | — | — | हीन |
| १४६. क्षेम | खेवँ | — | खेॐ ( देखतखेॐ ) |

वांचौनि हें अव्यय वाक्यांना हि जोडतें; जसें,

“ वारा आभाळ चि फेडी । वांचौनि सूर्यातें न घडी ॥ १२२५ ॥ ( अध्याय १८ वा )

९५. ( आणखी कांहीं निपात )

तव हें शब्दयोगी अव्यय तवँ, तव या क्रियाविशेषणाहून निराळें आहे. होन्र्ले साठिँ हें अव्यय ( त ) स्यार्थे पासून व्युत्पादितो. परंतु, तसा प्रकार नाही. कारण, ‘ तेया साठि ’ या स्थळीं तेया हें षष्ठीचें रूप असून शिवाय स्यार्थे यांतील स्य हि षष्ठीचा प्रत्यय आहे. म्हणजे

षष्ठीच्या स्य ला आणिक एक स्य लागल्यासारखा होतो. तस्य = तस्स = तहो = तेया अशी परंपरा आहे.

रामस्य = रामस्स = रामह = रामा

रामा + स्यार्थे = स्सात्थे = साठिँ

असें होऊं लागेल. सबब स्यार्थे पासून साठिँ निघालें नाहीं.

सार्त्री हें वेदांत व सार्धम् हें संस्कृतांत अव्यय आहे. त्यापासून साठिँ निघालें असें मानणें च उचित आहे.

अव्ययांची परंपरा आदेशप्रक्रियेंत येणार असल्यामुळें, महाराष्ट्रींतील व अपभ्रंशांतील रूपें येथें क्वचित् दिलीं आहेत.

अधिँ, पैकीं, वारि वगैरे रूपें अध ( अधस् ), पैक ( समुदाय ), वार ( पाव ) वगैरे शब्दांच्या सप्तम्या असल्यामुळें येथें दिलीं नाहींत.

' झनेँ ' नकारार्थी असतें तेव्हा तें ' सनात् न ' या दोन अव्ययांपासून निघालेलें असतें.

सनात् ( निरंतर )

न सनात्, किंवा सनात् न ( निरंतर नाहीं, निश्चयानें नाहीं )

झनें ह्या अव्ययाचे अर्थ ज्ञानेश्वरींत दोन च आहेत :-निश्चयानें आहे किंवा निश्चयानें नाहीं, ह्या अर्थी.*

अधस् ह्या शब्दाचें महाराष्ट्रींत हेट्ठ असें रूप होतें. त्यावरून मराठी हेँट.

अपभ्रंशांत करेवि असें भूतार्थी अव्ययी कृदन्त आहे, त्यापासून करवि-वि हा निपात ज्ञानेश्वरींत झाला आहे. तेया करविं = त्याच्या करून. ' र ' चा ' ड ' होऊन त्याच्याकडून.

चतुर्थीचा ते-तेँ प्रत्यय वस्तुतः निपात आहे व तो अर्थे ह्या रूपापासून निघाला आहे. ' थ ' चा ' त ' मराठींत इतर स्थलीं हि झालेला आहे; उदाहरणार्थ,

करित+आथि = करिताथि = करितातिः होत्था = होता.

चतुर्थीचा सि-सिँ प्रत्यय हि निपाताचा च शेष आहे. पासिँ = वासिँ = आसिँ = सिँ. मग * ' आर्थ ' हा कल्पित शब्द हि कल्पावयाला नको.

वर्तमान मराठींतील चतुर्थीचा ला प्रत्यय लागोनि ह्या निपाताचा अवशेष धरल्यास, त्याचा हि निर्देश येथें करणें उचित आहे. हा ' ला ' प्रत्यय रामदास व शिवाजी ह्यांच्यानंतर प्रचलित झाला. त्याच्यावर फारसी द्वितीयेचा व चतुर्थीचा प्रत्यय जो ' रा ' त्याचा

---

* झनें किंवा झणीं हें अव्यय ज्ञानेश्वरींत नेहमीं नकारार्थीच येतें. त्याचीं होकारार्थी उदाहरणें राजवाड्यांनी दिलीं असतीं तर बरें होतें.

अनुकरणात्मक संस्कार घडला, यांत संशय नाहीं.*

## ९६. विशेषणविशेष्य

ज्ञानेश्वरींत बहुतेक सर्व विशेषणें विशेष्यनिघ्न आहेत. म्हणजे विशेष्याचें जें लिंग, वचन व विभक्ति असेल तें च विशेषणाचें असतें. अविकृत विशेषण कचित् आढळतें. तेथें तें विशेष्याशीं समस्त आहे, असें समजावें. अविकृत विशेषणें प्रायः तत्सम व कचित् तद्भव असतात. तरतम-भाव प्रत्यय ज्ञानेश्वरींत नाहींत. पंचमीनें व सप्तमीनें तारतम्य दाखविलें जातें.† संस्कृत तरतम-भाववाचक विशेषणें मराठींत तद्भावानें येऊन सामान्य विशेषणें झालीं आहेत. लघीयान् = लहान; नवतर = नवथर; पापिष्ठ = पापिट ( ठ ). तारतम्यभावाचा गुण मराठीनें महाराष्ट्री-पासून घेतला आहे. संस्कृतांत हि तरतमप्रत्ययावांचून नुसत्या पंचमीनें तरतमभाव दाखविल्याचीं उदाहरणें आहेत.

## ९७. संधि

महाराष्ट्रीप्रमाणें च मराठींत हलन्त● शब्द नाहींत. तेव्हां हल्संधि मराठींत नाहींत. स्वतंत्र शब्दांतील आद्यन्त स्वरांचे संधि महाराष्ट्रीप्रमाणें च मराठींत विकल्पानें होतात. ँइ(हि) ह्या अव्ययाचा मागील शब्दाच्या अन्त्य स्वराशीं कचित् संधि होतो.

भलतें+ँइ = भलतैं

एथें कौरवां भलतैं जालें ॥ १८१ ॥ अध्याय २ रा ॥

समासांत अच्संधि§ विकल्पानें होतो.

( १ ) उदोअस्तुंचा किंवा उदयास्ताचा

( २ ) देहअहंतेचें किंवा देहाहंतेचें

---

* या ' ला ' प्रत्ययाचा फारसी ' रा ' शीं संबंध नसून तो सं. √लग् धातूपासून असल्याचें मागें म्हटलेंच आहे.

† उदाहरणार्थ, " जें सकळ गुह्यां गोसावी। पवित्रां रावो ॥ " ( ज्ञा. ९.४७ ). परंतु यापेक्षां चान्त षष्ठीचा उपयोग अधिक दिसतो; "धर्माचें निजधाम। तेविंचि उत्तमाचें उत्तम।" ( ज्ञा. ९.४८ ). पण त्याहिपेक्षां परिस, परौत, पसि, पासाव, पासौनि व हूनि हीं शब्दयोगी अव्ययें वापरून तरतमवाचक भाव अधिक व्यक्त होतो; उदा., गुरुसेवेपरौता मार्गु (१३.४४४); चंद्रापासौनि निवविती ( ९.२४ ); रंभेहुनि बरविपा ( १८.१२४ ); इ.

● येथें मुळांत नजरचुकीनें ' अजन्त ' असें पडलें आहे. पण राजवाड्यांना ' हलन्त ' अभिप्रेत आहे हें उघड आहे. ( अजन्त = स्वरान्त; हलन्त = हकारान्त, व्यंजनान्त )

§ दोन स्वरांचा संधि; स्वरसंधि.

( ३ ) प्रियउपकारु किंवा प्रियोपकारु
( ४ ) दीनउदो किंवा दिनोदय
( ५ ) संसारअडवी किंवा संसाटवी
( ६ ) फळअभिलाषी किंवा फलाभिलाषी

ज्ञानेश्वरींत प्रातिपदिकाला किंवा पदाला विभक्तिप्रत्यय लागतांना कोठें अन्त्संधि होतात व कोठें होत नाहींत, त्यासंबंधानें साद्यन्त विचार आदेशप्रक्रियेनंतर करणें योग्य होईल.

## ९८. समास

वैदिककालापासून आर्यांचें बोलणें दोन प्रकारचें असलेलें आढळतें; ( १ ) विभक्तीनें विकृत शब्दांची योजना करून व ( २ ) अविकृत शब्द जसेचे तसे च ठेऊन. पैकीं दुसऱ्या बोलण्याला सामासिक बोलणें म्हणतात. ह्या भाषेंत एक अविकृत शब्द दुसऱ्या अविकृत शब्दाच्या पुढें किंवा मागें बोलून विभक्तीचा अध्याहार केलेला असतो. शेवटीं अस् किंवा नास् धातूचीं रूपें योजतात

समस्त व्यस्त
गृह द्वार प्रवेशः = गृहस्य द्वारि प्रवेशः अस्ति
कृत गृह द्वार प्रवेशः अयम् = गृहस्य द्वारि प्रवेशः अनेन कृतः अस्ति
अर्वाचीन व नैय्यायिक संस्कृतांत ह्या समस्त भाषेचा प्रचार अति आढळतो.
व्यस्त बोलणें हि मूळचें समस्त च होतें.
गृह स्य द्वार् इ प्रवेश स् अन् एन कृ त स् अस् ति.

अशा निरनिराळ्या शब्दांचा समास करून ही भाषा झाली आहे. तात्पर्य, मूळचें बोलणें समस्त, म्हणजे अविकृत शब्दांनीं च आर्य चालवीत, असें दिसतें. सशास्त्र विचार करणारे जे नैय्यायिक त्यांनीं हा मूळचा प्रकार स्वीकारिलेला दिसतो.

मराठींत हि संस्कृतांतल्या प्रमाणें अत्यल्प प्रमाणावर समस्त बोलणें आहे.

द्वंद्व = तनुमनजीवें
बहुव्रीही = दोवाडसिंग गाई
तत्पुरुष = तलहात
कर्मधारय = ज्ञानडोला
अव्ययीभाव = हातलग

हसतखेळत, बसताउठता = खादतमोदता
बोलबाल ( बोलला ) = वाचं वाचं

इत्यादि बहुतेक सर्व प्रकारचे समास ज्ञानेश्वरींत आढळतात.

## ९९. उपसर्ग

तद्भव धातूंना उपसर्ग लावण्याची चाल ज्ञानेश्वरी मराठींत नाहीं. गतिसंज्ञक अव्ययें मराठी स्वतंत्रपणें धातूंना लावीत नाहीं. संस्कृत सगतिक धातू मराठींत तद्भावानें आले आहेत.

अनुभविजे ( अनु )
सांठणें ( सम् )
पडिभासणें ( प्रति )
उद्धणें ( उत् )
निगे ( निर् )
ओलंबणें ( अव ) इ. इ.

## १००. प्रयोग

संस्कृतांतल्या प्रमाणें ज्ञानेश्वरींत कर्तरि, कर्मणि व भावे असे तीन प्रयोग आहेत. त्यांची उदाहरणें नवव्या अध्यायांतील देतों. * कारकप्रक्रिया मध्यकालीन भ्रष्ट संस्कृतांतील किंवा महाराष्ट्रींतील आहे असें समजावें.

( १ ) अवधान देइजे ( कर्मणि विधिलिङ् ) अवधानं दीयेत । ( १ )
( २ ) प्रतिशोत्तर आइकौ ( कर्तरि सकर्मक लोट् † ) प्रतिशोत्तरं आकिर्णयत । ( १ )
( ३ ) न बोलें ( कर्तरि अकर्मक लट् ) न वल्हामि । ( २ )
( ४ ) मले सांसिनले ( कर्तरि क्तवति कृदन्त ) मालाः संखिद्धवन्तः । ( ४ )
( ५ ) गाउली बालक रिझवी ( णिचि कर्तरि ) माता बालकं अर्जयति ( ६ )
( ६ ) पढियो हो ( कर्तरि लोट् ) प्रेम भवतु । ( ७ )
( ७ ) ( आह्मीं ) सलगी करित आहों ( कर्तरि लट् + वर्तमान सकर्मक कृदन्त ) संलग्नतां कुर्वन्तः स्मः । ( ७ )
( ८ ) सारस्वतें पढों सिकिजे ( कर्मणि लट् + भविष्य कृदन्त ) सारस्वतेन पठितुं शिक्ष्यते । ( ८ )
( ९ ) परिमलें काइ तुरंबावें ( कर्मणि तव्यति भविष्य कृदन्त ) किं परिमलेन तर्पितव्यम् । ( ११ )
(१०) ( मी ) ह्मणों ( कर्तरि लट् अपभ्रंश उँ प्रत्यय ) अहं भणामि ( १२ )
(११) विचारिजो ( भावे लोट् ) विचार्यताम् ( १२ )
(१२) बोलु स्वीकराल ( कर्तरि लृट् सकर्मक ) वचनं स्वीकरिष्यथ । ( १४ )
(१३) तुह्मीं संतोषिजे ( कर्तरि विधिलिङ् ) यूयं संतुष्येत । ( १६ )

~~~~~~~~~~

* उदाहरणांपुढील कंसांत दिलेले ओव्यांचे आकड मुळांत नाहींत. अभ्यासकांच्या सोयीसाठी ते संपादकानें मुळांत पाहून घातले आहेत.

† मुळांत 'लट्' असें आहे ती नजरचूक असावी. कारण रूप आज्ञार्थी, म्ह. लोट्चें आहे.
~~~~~~~~~~

(१४) तुम्ही घेतलें आहा ( कर्तरि क्तवति + लट् ) गृहं गृहीतवन्तः स्थ । ( १७ )

(१५) हें जाणावलें ( णिच् क्त ) इदं ज्ञापितम् । ( १९ )

(१६) ( मी ) बोलिलों ( कर्तरि क्तवति उत्तमपुरुष एकवचन ) अहं उक्तवान् । ( १९ )

(१७) चांदणें ‖ पिकविजत आहे ( कर्मणि णिचि वर्तमान कृदन्त + लट् ( आह ) चंद्रिमा पाच्यमाणः अस्ति । ( २० )

(१८) पाणी थिजवावें § न लगे ( णिचि तव्यति + लट् ) पानीयं अवोस्त्यापयितव्यं न लगति । ( २१ )

(१९) (मी) लाजिलों ( कर्तरि क्तवति+अपभ्रंश ॐ लट् ) अहं लज्जितवान् । ( २१ )

(२०) शब्दब्रह्म निदिजे ( कर्तरि विधिलिङ् ) ब्रह्म निद्रेत् ( २२ )

(२१) शब्दु भावळेयी (मावळा ह्या आकारान्त शब्दाची सप्तमी) शब्दे मापिते (२२)

(२२) ( मियां ) पढियंतेंवी होआवें ( कर्मणि तव्यति. पढियंत+वत् = पढियंतेंवी )मया प्रियवत् भवितव्यम् । ( २३ )

(२३) अर्थु वाट पाहे (पश्–पश् सकर्मक कर्तरि लट् अनिट्) अर्थो मार्गं पश्यति ।(२७)

(२४) अभिप्राऊ अभिप्रायातें बिये ( सकर्मक कर्तरि लट्. अभिप्रायातें = अभिप्रायातें ) अभिप्रायः अभिप्रायं प्रतिवेति । (२७)

(२५) आम्हां गोडी करावें ( कर्मणि तव्यति. गोड+वत् गोडी ) युष्माभिः अस्मान्प्रति गुडवत् कर्तव्यम् । (३०)

(२६) बीज तुज सांघिजैल ( कर्मणि लृट् ) बीजं ते संस्थापिष्यते । ( ३४ )

(२७) कापडाची होंति काय पेटी ( कर्तरि लुङ् ) पेटिका अभूत् । (७५)

(२८) आहिं दीसति ( कर्मणि लट् ) दृश्यः दृश्यन्ते । ; भूतें गमति ( कर्मणि लट् ) भूतानि अधिगम्यन्ते । (८०)

(२९) भूतजात मातें भावी ( णिचि लट्. मातें चतुर्थीचा अर्थ कर्म ) भूतजातं मां भावयति । (८४)

(३०) उपपत्ती तुज सांघितलिया (कर्मणि सकर्मक) मया उपपत्तयः ते संस्थापिताः ।(६८)

(३१) कोंभ निगताति ( कर्तरि सकर्मक+कृदन्त ) नवपल्लवाः निर्यन्तः सन्ति । (७३)

(३२) दूधातें विख म्हणति ( कर्तरि सकर्मक लट् ) दुग्धं विषं मन्यन्ते । ( १४१ )

(३३) मातें मानुष मानीति ( ,, ,, ,, ) मां मानुषं मानयन्ति । (१४१)

(३४) यया अभिप्राया विसरसि ( कर्तरि लट् ) इमं अभिप्रायं विस्मरसि । (१४२)

(३५) स्थूलदृष्टी देखिजे मातें ( भावे लट् ) मां प्रति स्थूलदृष्ट्या दृश्यते । (१४३)

---

‖ राजवाडे-ज्ञानेश्वरींत ' चांदिणें ' असा पाठ आहे.

§ रा. ज्ञानेश्वरींत ' थोथिजवावें ' असा पा ठ आहे.

(३६) अमृतें अमरां न्हाविजे * ( भावे लट् ) अमृतेन अमरत्वात् न भूयते। (१४३)

(३७) सिंहें कुडी घातलें ( भावे भूत कृदन्त ) सिंहेन कूर्दे दत्तम्। (१४८)

(३८) साउली न पातीं ( भावे भविष्य कृदन्त ) छाया न द्रष्टव्या (१४८)

(३९) कोण्हीयेकु कांही पिआला ( कर्तरि क्तवत् ) कोऽपि कांचित् पीतवान् अस्ति। ( १५० )

(४०) घेपे ना दीजे ( भावे लट् ) गृह्यते न दीयते। (१७४)

(४१) इयें वायाणीं असतु ( कर्तरि लोट् अकर्मक ) इमानि व्यर्थानि सन्तु। ( १८५ )

(४२) आपुलें उत्तमत्व नाठवे ( भावे लट् ) आत्मीयं उत्तमत्वं न आस्तूयते। (२२२)

(४३) काइ पुरे ह्मणवे ( भावे लट् ) अलं इति कथं भण्यते। ( २२९ )

(४४) ऐसें एकत्वें मानवे। भिन्न तेया ( भावे लट् ) तस्मै भिन्नं मान्यते। ( २४६ )

(४५) कोणें कें उपासिला नोहे ( क्तवति कर्तरि + आहे कर्तरि ) केन कदा अहं उपासितवान् नास्ति। ( २६१ )

(४६) आकाशें वसावें, वायू नसावें, पावकें दाहावें, जळें वर्षावें = आकाशेन वस्तव्यं, वायुना नास्तव्यं, पावकेन दग्धव्यं, जलेन वर्षितव्यम्। ( २८० )

(४७) जे आपण चि होत ( कर्तरि लङ् ) ये स्वयं अभवन्। ( ३०४ )

(४८) मातें चि जेणें पाविजे ( भावे लट् ) मां प्रति येन प्राप्यते तत्पुण्यम्। ( ३१३ )

(४९) मी न पविजे ( कर्मणि लट् ) अहं न प्राप्ये। ( ३१६ )

(५०) जें आघिलेंपण मिरवी ( णिचि लट् ) यत् संपन्नतां मंडयति। ( ३६४ )

(५१) जेणें पेटी निक्षेपिली ( कर्मणि क्त ) येन पेटिका निक्षिप्ता। ( ४९० )

(५२) तेणें मातें स्मरिलें ( भावे क्त ) तेन मामुद्दिश्य स्मृतम्। ( ४३८ )

(५३) जे जन्मले ( कर्मणि क्त ) ये जन्म प्राप्तवन्तः। ( ४३९ )

(५४) जिहिं मी ओलावा केला ( कर्मणि क्त ) यैरहं आश्रयः ( आर्द्रस्थानं ) कृतः। ( ४४४ )

(५५) कोण कोणा पाहतसे जाणवे ना ( भावे लट् ) कः कं पश्यति न ज्ञायते। ( १८·१५८० )

(५६) परि तेया हि हें क्षेत्र नेणवे चि ( भावे लट् ) परं तस्यापि एतत् क्षेत्रं न ज्ञायते। ( १३·६९ )

---

* या विशिष्ट भावे प्रयोगातील ' अमरां ' हें रूप राजवाडे व नेने तृतीयान्त, तर मोडक-शास्त्री प्रथमान्त मानतात. या वादाचा उल्लेख प्रस्तावनेत ' भाषेच्या जुनेपणाचीं कांही गमकें ' या शीर्षकाखाली पृ. २१ वर केला आहे.

### वर्तमान मराठी

| ज्ञानेश्वरी मराठी | वर्तमान मराठी |
|---|---|
| ( सकर्मक कर्तरि ) रामु गाये मारितु | रामा गाय मारितो |
| ( अकर्मक कर्तरि ) रामु गाईतें मारितु | रामा गाईस मारितो |
| ( कर्मणि ) रामें गाये मारिली | रामानें गाय मारिली |
| ( भावे ) रामें गाईतें मारिलें | रामानें गाईस मारिलें |

पंतोजी मुलास मारितो व पंतोजी मूल मारितो ह्या दोन वाक्यांत अर्थभेद आहे. दुसऱ्यांत मारितो ह्मणजे जीव घेतो आणि पहिल्यांत मारितो ह्मणजे छडया, काठया, बुक्के, चपराका मारितो.† रामा गाय मारितो ह्मणजे ठार करितो आणि रामा गाईस मारितो ह्मणजे काठी, तरवार, इत्यादींनीं प्रहार करितो.

पहिलें क्रियापद सकर्मक आहे व दुसरें अकर्मक आहे. रामानें गाईस मारिली, हें वाक्य ऐतिहासिक दृष्टया अशुद्ध आहे. श्रेष्ठ ग्रंथकारांच्या प्रचारांत आल्यास शुद्ध मानून कसा तरी निर्वाह करावा लागेल. मराठींत भावे क्रियापद चतुर्थीप्रत्ययान्त नामाच्या लिंगाप्रमाणें चालतें, असा नियम करावा लागेल. हा सर्व घोंटाळा दादोबानें केला आहे. त्यानें स, ला, तें हे चतुर्थीचे प्रत्यय द्वितीयेचे कल्पिले. तसे कल्पिण्यास ऐतिहासिक आधार कांहीं एक नाहीं.

| संस्कृत | ज्ञानेश्वरी | वर्तमान मराठी |
|---|---|---|
| मह्यं, मे पानीयं रोचते | मज, मातें पाणी रुचे | मातें, मला, पाणी रुचतें |

येथें मातें, मला ह्या चतुर्थ्या आहेत. 'सि' व 'तें' हे चतुर्थीचे प्रत्यय ज्ञानेश्वरकाळीं होते. त्यांचा अर्थ कधीं कर्म असे, कधीं संप्रसारण असे. वर्तमान मराठींत हि तो च प्रकार आहे. स, ला, तें हे द्वितीयेचे प्रत्यय मानणें अनैतिहासिक आहे. दादोबानें आपलें व्याकरण इंग्रजी व्याकरणावरून रचिलें आहे. संस्कृत, महाराष्ट्री व अपभ्रंश ह्यांच्या व्याकरणावरून च मराठी व्याकरण रचिलें पाहिजे. इंग्रजी डेली प्रेयर्मधील प्रयोग संध्येंतील न्यासांना लावण्यासारखें च दादोबाचें कृत्य होतें. पाणिनीसारखा सूर्य सोडून, इंग्रजी कंदील घेतल्यामुळें दादोबा जागोजागीं उपहसनीय झाला आहे.

---

† हे वाक्य मुळात नजरचुकीने उलटे छापले गेले आहे. म्हणजे 'पहिल्यांत' व 'दुसऱ्यांत' या शब्दांची उलटापालट झाली आहे.

होणें नाहीं ( भवनीयं नास्ति ) व होआवें नाहीं (भवितव्यं नास्ति) असे प्रयोग ज्ञानेश्वरींत येतात. येथें होणें व होआवें हीं भविष्य कृदन्त नामें आहेत. हीं एँकारान्त नपुंसक शब्दाप्रमाणें चालतात. होणेया, होआवेया, इ. इ. इ.

## नवमान्हिक समाप्त

## ( समारोप )

येणेंप्रमाणें ( १ ) वर्णेतिहास, ( २ ) शब्दविभक्तिप्रत्ययेतिहास, ( ३ ) क्रियाविभक्ति-प्रत्ययेतिहास व ( ४ ) निपातेतिहास, असे चार भाग येथपर्यंत संपले. ¶ त्यांत ज्ञानेश्वरी मराठी भाषेचा सांगाडा ज्या शिरांनीं व स्नायूंनीं व धमन्यांनीं व मांसपेशींनीं ताणून धरिला व आच्छादिला आहे, त्यांचा मागमूस व पूर्वस्वरूप अपभ्रंशांत, महाराष्ट्रींत व संस्कृतांत कसें होतें तें दाखविलें आहे. त्यावरून असें दिसतें कीं ज्ञानेश्वरी मराठीपर्यंत सर्व बाबींची परंपरा अव्याहत लागली आहे. कित्येक वैदिक बाबी संस्कृतांत गळाल्या; कित्येक संस्कृत बाबी महाराष्ट्रींत व अपभ्रंशांत नाहींशा झाल्या व कित्येक महाराष्ट्री बाबी ज्ञानेश्वरी मराठींत लुप्त झाल्या. परंतु कोणत्या बाबी कोठें लुप्त झाल्या, हें आतां नक्की कळलें. शंकेला जागा राहिली नाहीं. वर्ण, शब्द, धातू व निपात ह्यांतली अशी एक हि प्रधान बाब राहिली नाहीं कीं जिचें मूळ दाखविलें गेलें नाहीं.* तसें च, हेमचंद्र ज्या अपभ्रंशाचें व्याकरण देतो, त्याहून निराळ्या अपभ्रंशापासून † मराठी निघाली, असें म्हणण्याकडे प्रवृत्ति होते. इतकें च नव्हे, तर मराठी ज्या अपभ्रंशापासून निघाली तो अपभ्रंश महाराष्ट्रीहून फारसा भिन्न नसावा, असें हि म्हणणें प्रशस्त वाटतें. गोडबोले, होर्न्ले, बीम्स वगैरे वैय्याकरणांनी ज्या शेंकडो बाबींची परंपरा दाखविली नव्हती किंवा चुकीची दाखविली होती; ती येथें पायाशुद्ध दाखविली आहे.

७८ कलमापर्यंत संस्कृत, महाराष्ट्री, अपभ्रंश व मराठी रूपें जीं दिलीं त्यांवरून आदेश-

---

¶ वरील विवेचनांतून वाक्यरचनेचा विचार, प्रयोगविचाराचा अपवाद केल्यास, सुटला आहे.

* वरील विधान अतिव्याप्त आहे. कारण प्रस्तुत व्याकरणांत शब्दांचीं मूळें दाखविलेलीं नाहींत. या बाबीचा विचार च येथें केलेला नाहीं.

† हा 'निराळा' अपभ्रंश म्हणजे 'जैन माहाराष्ट्री' या नावानें ओळखला जाणारा अपभ्रंश होय हे प्रस्तुत लेखकानें आपल्या 'यादवकालीन मराठी भाषा' या ग्रंथांत दाखविलें आहे. ( पृ. २९–६७ ).

प्रक्रिया सिद्ध व्हावयाची आहे.¶ परंतु, प्रातिपदिक व धातू महाराष्ट्रींतून व अपभ्रंशांतून कोणत्या रूपानें आले, तें अद्याप विवेचिलें नाहीं. सबब आदेशप्रक्रिया येथें इतक्यांत देतां येत नाहीं. ज्ञानेश्वरींतील एकोन एक शब्द व धातू अपभ्रंशांतून किंवा महाराष्ट्रींतून किंवा संस्कृतांतून कसे आले तें दाखविल्यावर, मग आदेशप्रक्रियेचे सामान्य व विशेष नियम देणें सोईचें होईल. ह्या खटाटोपाला पांचचारशें अष्टपत्री पृष्ठें लागावीं, असा अदमास आहे. करतां, आदेशप्रकरणाचें विवेचन एखाद्या स्वतंत्र पुस्तकांत च करणें भाग आहे. होर्न्ले, बीम्स, भांडारकर, स्टेन कोनौ व ग्रीयरसन यांनीं आदेशप्रकरणावर जें कांहीं लिहिलें आहे त्याचा विचार तेथें केला जाईल.

संपूर्ण

———

¶ आधीं रूपविचार किंवा व्याकरण व नंतर आदेशप्रक्रिया हा क्रम येथें उलटा झाला. वास्तविक पहाता रूपविचार आदेशप्रक्रियेच्या पायावर उभा केला पाहिजे. आधीं Phonology, व त्याच्या आधारावर Morphology, असा नियम आहे.

# विषयसूचि

[ आकडे पृष्ठांचे आहेत. ]

• • •

# शब्दसूचि

( महत्वाचे शब्द सूचींत दिले आहेत. संक्षेपांचा खुलासा :—अं = अव्यय; टी = टीपा; तप्र = तद्धितप्रत्यय; धा = धातु; प्र = प्रत्यय; भूधासा = भूतकालवाचक धातु-साधित; सर्व = सर्वनाम )

• • •

# मंडळाची प्रकाशने

(१) **धर्मरहस्य**

(द्वितीयावृत्ती) लेखक श्री. के. ल. दप्तरी, पृष्ठे १६ + २०८, किंमत रु. १६-००

(२) **आसरा**

लेखक श्री. वि. भा. उजगरे, पृष्ठे १६ + १६९, किंमत रु. ११-००

(३) **हुतात्मा दामोदर हरी चापेकर यांचे आत्मवृत्त**

संपादक - श्री. वि. गो. खोबरेकर, पृष्ठे ११५, किंमत रु. ३-००

(४) **Letters & Correspondence of Pandita Ramabai**

संपादक - प्रा. अ. भि. शहा, पृष्ठे ४६१, किंमत रु. ३५-००

(५) **दलित साहित्य : एक अभ्यास**

संपादक - श्री. अर्जुन डांगळे, पृष्ठे २८६, किंमत रु. २८-००

(६) **सेनापती बापट समग्र वाङ्मय**

लेखक कै. पां. म. बापट, पृष्ठे ५०६, किंमत रु. ५६-००

(७) **लिळा चरित्र**

संपादक - डॉ. वि. भि. कोलते, पृष्ठे ५५ + ९३५, किंमत रु. ३०-००

(८) **जातक कथा, भाग १, २ व ३**

कै. धर्मानंद कोसंबी, पृष्ठे ३२० + १७, किंमत रु. २१-००

(९) **पंचोपाख्यान**

संपादक - डॉ. वि. भि. कोलते, पृष्ठे ७० + २७०, किंमत रु. ३१-००

